अशी वर्गवारी टांचण-संख्या पडते. म्हणजे काय ठरलें कीं, दोन्ही शाखांकडे संशोधक सभासदांचें सारखें च लक्ष्य आहे; वर्गीकरणाचा उपक्रम झाला म्हणजे त्या त्या शाखेच्या अभ्यासकांची सोय होईल.

**ग्रंथ, पोथ्या, पत्रें इ० :**—मंडळाचे संग्रहीं जे छापिल व हस्तलिखित ग्रंथ, दर्शनीय वस्तु, पोथ्यापत्रें वगैरे आहेत, त्यांच्या सविस्तर यादी सध्यां तयार होत आहेत. त्या झाल्यावर सादर करूं मंडळ आज सात वर्षें रा. मेहेंदळे यांचे घरांत वाढलें. आतां तें मौंजीबंधनाला योग्य झालें असून त्याला ॐभवति हा पक्ष त्यास रक्षिण्यास लाविलें पाहिजे. म्हणजे **स्वतंत्र मंदिर** बांधून त्यांत आपला संसार सुखानें थाटता येईल. मंडळांतील संशोधक सभासदांजवळ खरोखर च इतकी प्रचंड साधनसामग्री आहे कीं ती जर सर्व ते आज मंडळांत आणून टाकतील तर रा. मेहेंदळे यांचें संबंध घर पार भरून शिगेला लागेल ! ही अतिशयोक्ति नाहीं. यंदा रां. वा. वि. जोशी व मिया आतार वगैरे सभासदांनीं बरे च कागद वगैरे पाठविले ते सर्व संग्रहीं आहेत.

**पुढें:**—सर्व च कागदपत्रें प्रसिद्ध करण्याच्या लायकीचीं नसतात; आणि आपण झालों तरी किती प्रासिद्ध करणार ? परं पूर्वकालीन समाजाच्या बौद्धिक, तात्त्विक, धार्मिक, सामाजिक, यौद्धिक, वैय्यापारिक, राजकीय, मानसिक, शैक्षणिक, औद्योगिक वगैरे सर्व प्रकारच्या हालचालींची इत्थंभूत माहिती मिळवून देणारे सर्व कागद सुरक्षितपणें संग्रहीत करून ठेवणें फार महत्त्वाचें काम आहे; आपल्या मंडळाला तो भार उचलण्यास हळुहळू लागलें च पाहिजे; व त्यासाठीं **सरस्वतीमंदिर** उभारण्यास कंबर कसली पाहिजे. आपण आजवर युद्धामुळें जरा चालढकल करीत होतों; पण शत्रूचा पुरा निःपात होऊन सर्व स्थिरस्थावर होईपावेतों दम खाणें आतां अयोग्य होईल. मोठी उडी आतां धरूं नये. छोटेसें च मंदिर तूर्त उभारून कामाला सुरवात करूं. काल अनुकूल होईल तसा पसारा वाढवितां येईल. पण तोंवर ' खाईन तर तुपाशीं नाहीं तर उपा[illegible] बसणें वाजवी होणार नाहीं.

कागदपोथ्या, नाणीं, शिलालेख वगैरेंचा संग्रह आपण वाढवी[illegible] त्याबरोबर च त्यांचें **वर्गीकरण** करून संगतवार **संदर्भोपयोगी** य[illegible] करणें हें हि काम आपण केलें पाहिजे. सर्व च कांहीं संशोधक ह[illegible] नाहींत; आणि रा. देव, रा. राजवाडे यांसारख्या एकनिष्ठ संशो[illegible] आपल्या अफाट पुंजीचा सर्व परिपाक जातीनें च करून ओगरण्याची नसते. इतर अभ्यासी लोकांना हि संशोधकांच्या श्रमापासून ला[illegible] घेऊन घरबसल्या पुष्कळ चर्चात्मक व निर्णयात्मक काम करितां येईल. देशांत इतिहासाचा अभ्यास वाढवावयाचा असला तर हें इतिहाससाधन-

संग्रहाचें व साधनवर्गीकरणाचें व संदर्भयादी करण्याचें काम अवश्य केलें पाहिजे. मंडळाला ही सर्व जाणीव आहे; परंतु **मुख्य अडचण** काम करणाऱ्यांची कमताई ही होय. या इतिहासाच्या कामाची आवड धरून हें वाह्यतः रुक्ष भासणारें व गिचगिचीचें काम करणारीं माणसें पुढें येतील तर हें हि काम घडून येईल. मंडळाच्या कार्याविद्दल सहानुभूति असणाऱ्या मंडळांतल्या व मंडळावाहेरच्या सद्‌गृहस्थांनीं मंडळास वहुत सूचना केल्या आहेत; मंडळाच्या चालकांना हि अनेक कल्पना सुचतात. परंतु कामकरी कोणी च आणून देत नाहींत! तोंवर ' उत्पद्यन्ते विलीयन्ते ' हा क्रम टळणार कसा?

आतां ओघानें च आलें म्हणून लिहितों. आपल्याकडलि विद्यापीठां-कडून अद्याप या संशोधनाच्या विषयाचा गौरव व पुरस्कार केला जात नाहीं. पहिल्या च संमेलनांत भारतीय समाजशास्त्र, भारतीय अर्थशास्त्र इत्यादि विषयांचा समावेश विद्यापीठांच्या व शिक्षणसंस्थांच्या अभ्यासक्रमांत कर-ण्यावद्दल त्यांना विनंति करण्याचा ठराव येऊन त्याची वाटाघाट हि आपण त्या वेळीं केली होती. तो च प्रश्न तसा च न सोडतां पुनः हातीं घेतला पाहिजे. ऐतिहासिक संशोधनाची गोडी व अभ्यास वाढविण्याचा एक मुख्य उपाय म्हटला म्हणजे या विषयांचा अभ्यास प्रौढ विद्यार्थ्यांना करावा लागेल **असा अभ्यासक्रम** त्यांचेसाठीं ठेविला पाहिजे. महाराष्ट्रेतिहाससारस्वताच्या संशोधनाचा वहुतेक प्रयत्न एतद्देशीय विद्वानांनीं आपल्या **स्वभाषेंतून** म्हणजे मराठींतून च केलेला आहे. त्यामुळें मराठीकडे दृष्टि न वळलेल्यांच्या तो नजरेला येत नाहीं. संशोधकांनीं कामगिरी मात्र अचाट करून ठेविली आहे; व तिचें स्वयंभू तेज च इतकें वलिष्ठ आहे कीं तिचा छाप हळुहळू वरिष्ठ शिक्षणावर वसणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत! मराठी भाषेचा अभ्यास जसजसा वरिष्ठ शिक्षणक्रमांत शिरेल तसतसें संशोधकांच्या ग्रंथांचें व लेखांचें **ऊर्जित** होईल. आपल्याकडे **खाजगी** मंडळ्यांनीं चालविलेल्या ...मांकित पाठशाला आहेत त्यांच्या चालकांचें हि लक्ष्य या आपल्या ...नांकडे खेंचून आणिलें पाहिजे. असें वळ आपण लाविलें म्हणजे च ...मान् **तरुणांचें** लक्ष्य या पूर्वजेतिहास-संशोधनाच्या **महत्कार्याकडे** ...ल. हें कार्य **राष्ट्रोपयोगी** आहे इतकें च नव्हे तर सूक्ष्म विचार केल्यास स्वत...धारणेचा योग्य मार्ग दर्शविण्यास तें खरें उपकारक होणारें असल्यामुळें ...द्धसर्वस्वाचा व अर्थसर्वस्वाचा वेंच करण्याइतकें लायख व फलदायी हि आहे, हें शिक्षितसमाजाच्या मनावर पक्कें ठसविण्याचा हि उद्योग मंडळानें नेटानें केला पाहिजे. दिवस कठिण असले तर श्रम व चिकाटी जास्त लागतील. पण ' कर्मामध्यें च वर्तायाचें ' पाहिजे!

देशांत एवढी सहानुभूति प्रादुर्भूत झालेली पाहून मात्र आम्हांला भावी कालाविषयीं फार सुखमय स्वप्नें पडूं लागलीं आहेत.

**शके १८३९ चें अंदाजपत्रकः**–परिशिष्ट (ल्ट) त दिलें आहे. त्याबावत जी वर्गणी थकली आहे ती वसूल होऊन जसजसा पाय मोकळा होईल तसतसा बाकीचा बोजा उठवावयाचा असें धोरण कारभारी मंडळानें ठरविलें आहे. एक ऐतिहासिक स्थल संरक्षणाची बाब नवीन घातली आहे. श्री. थोरले शहाजी महाराज यांचें वृंदावनस्थल रा. पटवर्धन यांनीं शोधून काढले त्याची व इतर प्रसिद्ध स्थलांची अनिर्वचनीय दुर्दशा दिसून येते ! योग्य अधिकाऱ्यांमार्फत ती दूर करून घेण्याबद्दल खटपट करण्याचा ठराव मागें एका संमेलनप्रसंगीं आपण च मजूंर केलेला आहे. यंदां त्याकरितां प्रसंग पडल्यास थोडी रक्कम खर्ची घालण्यास आपली अनुमती मागत आहों. बाकीच्या बाबींचें विवेचन फार करण्याची जरूरी नाहीं. पुस्तकांकरितां ५०० रु. मागितले आहेत. ते तर आपण च फार थोडे म्हणाल ! आपणाला पुष्कळ गोष्टी पाहिजेत. उत्तम संग्रहशाला पाहिजे, उत्तम पुस्तकसंग्रह पाहिजे उत्तम साधनसामग्री पाहिजे, उत्तम संशोधक पाहिजेत. परंतु काल व परिस्थिती आपल्या इच्छांना वेसण घालीत असतात. ती सोसून च आपला रथ आपण हाकारला पाहिजे.

येणेंप्रमाणें शके १८३८ च्या कामगिरीचा वृत्तांत आपणांस सादर करीत आहोंत. या सालीं टांचणें लिहून, पोथ्यापत्रें पाठवून, चित्रें वगैरे वस्तू संपादून, पुस्तकें खुर्च्या इ. नजर करून इ. इ. प्रकारांनीं ज्या सभासदांनीं व सभासदेतरांनीं मदत केली त्यांचे मंडळातर्फे अंतःकरणपूर्वक **आभार** येथें मानतों. रा. पांडुरंग नरसिंह पटवर्धन व रा. शंकरराव जोशी व त्यांच्या बरोबरचे स्वयंसेवक तरुण यांनीं हि फार मेहनत घेऊन पुष्कळ मदत केली व करावयाचें आश्वासन दिलें आहे, त्याबद्दल त्या सर्वांचे उपकार स्मरून शेवटीं हें सर्व ज्याच्या कृपाप्रसादाचें च फल होय त्या श्रीसंशोधनेश्वरास अनन्यभावानें शरण जाणारे,

पुणें,
ज्येष्ठ शु. १ शके १८३९
भा. इ. सं. मं. चें कार्यालय.

**खंडेराव चिंतामण मेहेंदळे,**
**दत्तो वामन पोतदार,**
चिटणीस–भा. इ. सं. मं.

# परिशिष्ट (अ)

## शके १८३८

### जमाखर्च

| जमा रु. | |
|---|---|
| * ११७६-९-७ | शिल्लक सालगु॥ |
| १०३२-३-० | वर्गणी वसूल |
| ५०९-०-० | वर्गणी १८३८ |
| ३५-०-० | ,, १८३५ |
| १०४-०-० | ,, १८३६ |
| ३७२-०-० | ,, १८३७ |
| १२-३-० | ,, १८३९ |
| १०३२-३-० | एकूण |
| ७६-१-० | ग्रंथविक्री |
| ३-०-० | देणगी |
| २-१-० | किरकोळ जमा |
| २२८९-१४-७ | एकूण |

*...शके १८३८ सालचे आरंभास शिल्लक रु. ११७६-९-७ रक्कम रुपये निघत आहे.

(सही) **प. व्ही. पटवर्धन**

( ,, ) **जी. एन्. मुजुमदार**

| खर्च रु. | |
|---|---|
| ७०-१३-३ | टपाल खर्च |
| ९७-३-६ | कारकून पगार |
| १३३५-७-० | छपाई खर्च |
| १८-३-० | इंदुप्रकाश तृ. सं. |
| ६५०-०-० | आर्यभूषण १८३७ इतिवृत्त इ० |
| १७-४-० | आर्यभूषण किरकोळ |
| ६५०-०-० | आत्माराम छाप० |
| १३३५-७-० | एकूण |
| १-८-० | टाइपरायटिंग |
| २३-१२-९ | दप्तरखर्च (कागद शाई इ.) |
| ६३-११-९ | सादिलवार |
| ५१ | कपाटे (२) व टपालपेटी |
| १२-११-९ | रंगणावळ इ. |
| ५८-५-० | संशोधन खर्च |
| ७-४-९ | मजुरी |
| २५-११-० | ग्रंथ खरेदी |
| २-४-० | इमारत खर्च |
| ३१-११-० | चित्रखातें |
| २२-६-० | चतुर्थसंमेलन खर्च |
| १७४०-३-० | एकूण |
| ५४९-११-७ | शिल्लक शके १८३९ करितां |
| ३०३-०-० | इमारतनिधि |
| २४६-११-७ | इतर |
| ५४९-११-७ | एकूण |
| २२८९-१४-७ | एकूण |

# परिशिष्ट ( क )

## पुस्तकदेणगी

रा. ह. च. हुरकडली, मुधोळकर यांजकडून:—

( १ ) हिंदू पीरिअड

( २ ) दि टू सीजेस् ऑफ् भरतपूर

( ३ ) दि हिस्टरी ऑफ् मण्डू

रा. ग. स. खरे यांजकडून:—

( १ ) शिर्क्षेतील एका श्लोकाचा अर्थ

मियां शिकंदरलाल आतार:—

( १ ) अमेरिकेच्या व्यवसायोन्नतीचा इतिहास

रा. भा. वि. फडके व रा. वा. बर्वे:—

( १ ) रामतीर्थ ग्रंथावलीचे खण्ड

रा. रा. ह. मणूरकर:—

( १ ) विद्यारण्य स्वामींचें संक्षिप्त चरित्र

नामदार केशवराव वकील:—

( १ ) हैदराबाद् अफेअर्स्–तीन भाग

प्रो. जदुनाथ सरकार:—

( १ ) इंडिया ऑफ् औरंगजेब्

( २ ) हिस्टरी ऑफ् औरंगजेब्–भाग तीन

( ३ ) ॲनेक्डोट्स् ऑफ् औरंगजेब्

( ४ ) चैतन्याज् पिल्ग्रिमेज् ॲन्ड् टीचिंग्ज्

रा. वा. वि. जोशी:—

( १ ) पुनर्विवाहखंडनाचा साद्यंत इतिहास–आवृत्ति पहिली

## खुर्च्या

ठाण्याचे रा. विनायकराव भावे यांजकडून सुमारें ७५ लाकडी खुर्च्या मंडळास नजर आल्या आहेत.

## कागदपत्रें इ०

रा. वा. वि. जोशी, रा. पां. न. पटवर्धन, मिया शिकंदरलाल आतार, श्री मिरीकर, श्री. मुजुमदार, रा. गो. वि. आपटे, रा. द. वा. पोतदार, रा. वि. का. राजवाडे यांचेकडून कागदपत्रें, पोथ्यापत्रें वगैरे वेळोवेळीं आलेलीं आहेत. खेरीज रा. वा. वि. जोशी यांजकडून कांहीं नाणीं व मिया आतार यांजकडून एक ताम्रपट आला आहे.

# परिशिष्ट ल

## शके १८३९ चें अंदाजपत्रक

### जमा

| रक्कम | तपशील |
|---|---|
| ५४९-११-७ | शके १८३८ अखेर शिलक |
| २६०० | मागील बाकी वसुली |
| १४०० | १८३९ ची वर्गणी वसुली |
| ५०० | ग्रंथविक्री |
| ५०४९-११-७ | |

### खर्च

| रक्कम | तपशील |
|---|---|
| ४० | आत्माराम छापखान्याचें देणें |
| ३०० | इतिवृत्त १८३८ ची छपाई |
| २५० | चतुर्थसंमेलनवृत्त छपाई |
| १२० | स्थलसूची राजवाडेखंड |
| २५० | कारकून |
| २५० | लांकडी सामान खुर्च्या, कपाटें वगैरे |
| १०० | टपाल खर्च |
| ३० | दिवाबत्ती |
| ७० | कागद, शाई |
| १०० | मागील बाकी वसुलीकरितां |
| १५० | किरकोळ छपाई |
| १२५ | पाक्षिक सभापत्र छपाई |
| १५० | चित्रखरेदी |
| ३५० | इतिवृत्त १८३९ ची छपाई |
| ३५० | पंचमसंमेलनवृत्त छपाई |
| १०० | एक शिपाई |
| २०० | नकलनवीस |
| ५०० | संशोधनखर्च |
| ५०० | पुस्तकखरेदी |
| २०० | इमारत |
| २०० | ऐतिहासिक स्थलसंशोधन |
| २०० | अनपेक्षित खर्च |
| ४५३५ | |
| ५१४-११-७ | १८३९ अखेर शिलक |
| ५०४९-११-७ | |

# परिशिष्ट ए

## सभासदांची यादी शके १८३८

### आश्रयदाते सभासद

नों. क्र.

४१ श्रीमंत सर परशरामराव भाऊसाहेब पटवर्धन, के. सी. आय्. ई. जमखंडी — जमखंडी

### हितकर्ते सभासद

३३ श्रीमंत नारायणराव गोविंद ऊर्फ बाबासाहेब घोरपडे, इचलकरंजीकर — इचलकरंजी

१९७ श्रीमंत सरदार विनायकराव धुंडिराज ऊर्फ बाबासाहेब विंचूरकर — मुंबई

### सभासद वर्ग १

२५२* रा. रा. रामदास कृष्ण अलाहाबादकर — अलाहाबाद

२०० श्री. रा. वामन श्रीधर आपटे — मुंबई

५ रा. रा. नरसिंह चिंतामण केळकर, बी. ए. एल् एल्. बी. — पुणें

१८५ श्रीमती कृष्णाबाई खरे, बी. ए. — पुणें

४२ रा. रा. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर, बी. ए. — पुणें

२२७ श्री. रा. गणेश श्रीकृष्ण ऊर्फ दादासाहेब खापर्डे, बी. ए. एल् एल्. बी. — उमरावती

४३ श्री. मार्तंड त्र्यंबक गद्रे, इनामदार — पुणें

४४ श्री. व्यंकटराव तात्यासाहेब गुजर, जहागिरदार — नागपूर

४५ रा. रा. जगन्नाथ रघुनाथ घारपुरे, बी. ए. एल्. एल् बी. हायकोर्ट वकील — मुंबई

३४ रा. रा. गोविंद काशीनाथ चांदोरकर, बी. ए. एल् एल्. बी. — धुळें

७७+ ना. महादेव भास्कर चौबळ, बी. ए. एल् एल्. बी. — मुंबई

४६ रा. रा. मुकुंद रामराव जयकर, एम्. ए. बार-ॲट-लॉ. — मुंबई

२६६* डॉ. कृष्णाजी केशव जोशी, एम्. ए. पी. एच्. डी — मुंबई

१८१ रा. रा. बाळ गंगाधर टिळक, बी. ए. एल् एल्. बी. — पुणें

४८+ श्रीमंत रामराव अमृतराव ऊर्फ आबासाहेब डफळे जतकर — जत

१४+ रा. रा. शंकर श्रीकृष्ण देव, बी. ए. एल्. एल्. बी. — धुळें

| | |
|---|---|
| १०८ श्री. रा. पंजाबराव बाजीराव देशमूख | सेंदुरजना |
| ३ श्री. रा. विनायक नीलकंठ नातू, इनामदार | पुणें |
| १६ रा. रा. अनंत विनायक पटवर्धन, बी. ए. | पुणें |
| ४९+ श्री. सरदार गोविंद बळवंत पटवर्धन शास्त्री | सावली |
| ५० रा. ब. सीताराम विश्वनाथ पटवर्धन, बी. ए. | पुणें |
| २५ रा. रा. दत्तो वामन पोतदार, बी. ए. ( चिटणीस ) | पुणें |
| ५१ रा. रा. अनंत सखाराम फडके | भुसावळ |
| २०३ रा. ब. नरहर गदाधर फडके | पुणें |
| ५२ रा. रा. सदाशिव रामचंद्र बखले, बी. ए. एल् एल्. बी. हायकोर्ट वकील | मुंबई |
| ११० श्री. सरदार परशुरामराव कृष्ण बिवलकर | अलिबाग |
| ५३ रा. रा. नारायण मल्हार वेद्रकर, बी. ए. एल् एल्. बी. | उमरावती |
| ३७ रा. रा. भास्कर वामन भट, वकील | धुळें |
| २६ रा. रा. विनायक लक्ष्मण भावे, बी. एस्. सी. | ठाणें |
| ५४ रा. ब. विष्णु मोरेश्वर महाजनी, एम् ए. | अकोला |
| १० श्रीमंत सरदार गंगाधर नारायण मुजुमदार | पुणें |
| २ श्रीमंत सरदार खंडेराव चिंतामण मेहेंदळे, बी. ए. ( चिटणीस ) | पुणें |
| १८ रा. रा. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे, बी. ए. इतिहाससंशोधक | पुणें |
| ५५ श्रीमती रमाबाई रानडे | पुणें |
| २६४*+ श्री. रा. विश्वनाथ खंडेराव रास्ते | पुणें |
| १५+ प्रो. हरि गोविंद लिमये, एम्. ए. | पुणें |
| ७ रा. ब. चिंतामण विनायक वैद्य ( एम्. ए. एल्. एल्. बी. | कल्याण |
| ५६ ना. रा. ब. गणेश कृष्ण साठे, सी. आय्. ई. | सोलापूर |
| ६ रा. ब. काशिनाथ नारायण साने, बी. ए. | पुणें |

## सभासद वर्ग २

नों. क्र.

| | |
|---|---|
| ५७ रा. रा. बळवंत रामचंद्र अनगळ ॲडव्होकेट | उमरावती |
| २७१+* रा. रा. गोविंद तात्याजी अफजलपुरकर | हैद्राबाद |
| ५८ रा. रा. जयराम केशव असनारे, बी. ए. बी. एल. | उमरावती |
| १११ रा. रा. सदाशिव खंडो अळतेकर वकील | कऱ्हाड |
| २२२ रा. रा. नारायण रंगनाथ अळेकर, बी. एलएल. बी. | नागपूर |
| २२१ रा. रा. परशराम सदाशिव आपटे | अहमदनगर |
| ५९ रा. रा. गोपाळ नारायण उक्डिवे, सराफ | सांगली |

नों. क्र.

| | |
|---|---|
| ११२ ना. रा. श्रीधर बाळकृष्ण उपासनी, बी. ए. एलएल. बी. | धुळें |
| २८ श्री. सरदार मोरेश्वर चिंतामण ओंकार | पुणें |
| ११३ रा. रा. अनंत रामचंद्र कवडे, फोटोग्राफर | अहमदाबाद |
| ११४ रा. रा. मनोहर विष्णु काथवटे, बी. ए. एलएल. बी. | सातारा |
| ११५ रा. रा. दत्तात्रेय बळवंत काळसेकर | शिराळें |
| २६७* रा. रा. श्रीधर गोविंद काळे, हेडमास्तर | गुलबुर्गा |
| ११६ राव. रावजी रामचंद्र काळे, बी. ए. एलएल. बी. | सातारा |
| २४७+* रा. रा. गोविंद विष्णु कुकडे, बॅरिस्टर | नागपूर |
| ११७+ प्रो. वामन गोविंद काळे, एम्. ए. | पुणें |
| २७७* रा. रा. गणेश विठ्ठल कुलकर्णी | मुंबई |
| ११८ श्री. नामदार केशवराव, वकील | हैदराबाद |
| ११९+ रा. रा. श्रीनिवास व्यंकटेश कौलजगी, बी. ए. एल्‌एल्. बी. | विजापूर |
| ७२ रा. रा. पी. व्ही. कृष्णस्वामी नाईक, | तंजावर |
| ९ रा. रा. गणेश सखाराम खरे, इंजिनीयर | पुणें |
| ६१ रा. रा. लक्ष्मण जनार्दन खरे, एम्. ए. एल्‌ एल्. बी. | उमरावती |
| १८६ रा. रा. विनायक गोपाळ गाडगीळ | सांगली |
| ३१ गोपाळ रावजी गोगटे, वकील | भुसावळ |
| २५०* रा. रा. श्रीधर गणेश गोखले, एम्. ए. | पुणें |
| ३२ रा. रा. हरि गणेश गोडबोले, आय्. सी. एस्.<br>सब डिव्हिजनल मॅजिस्ट्रेट | बऱ्हाड |
| २१२ रा. रा. यशवंत अनंत गडबोले | पुणें |
| १२० रा. रा. हरि केशव गोळे, बी. ए. | " |
| ६२ रा. रा. नरहर रामचंद्र घुडे | कारंजा |
| ६३ रा. रा. नारायण गोविंद चाफेकर, बी. ए. एल्‌ एल्. बी. | अलिबाग |
| १२२ रा. ब. गणेश कृष्ण चितळे, बी. ए. एल्‌ एल्. बी. | अहमदनगर |
| १८२+ रा. रा. विनायक बळवंत चौकर | अहमदनगर |
| ६४ रा. रा. रामकृष्ण रावजी जयवंत, बी. ए. वकील | उमरावती |
| ६५ रा. रा. विश्वनाथ गणेश जावडेकर, बी. ए. एल्. एल्. बी. | धुळें |
| २५५* रा. रा. गजानन सदाशिव जोशी, असिस्टंट इंजिनियर | गोध्रापंचमहाल |
| २५८*+ रा. रा. पांडुरंग वासुदेव जोशी, बी. ए. एल्‌ एल्. बी. | हैदराबाद |
| १२४ रा. रा. मंगेश रामचंद्र टाकी | मुंबई |
| ६६ रा. रा. अनंत विश्वनाथ टिळक, बी. ए. एल्‌ एल्. बी. | धुळें |

नों. क्र.

२२० रे. नारायण वामन टिळक — सातारा

२६७ रा. रा. रामचंद्र उमाकांत ढमढेरे — बडोदें

६८ रा. रा. यशवंत स्वामीराव तिळगुळकर, बी. ए. एल् एल्. बी. — विजापूर

६९+ रा. रा. हरी विठ्ठल तुळपुळे, बी. ए. एल् एल्. बी. — पुणें

१२५ रा. रा. सीताराम केशव दामले, बी. ए. एल् एल्. बी. — पुणें

१२६+ रा. रा. हरी श्रीकृष्ण देव, एल्. एम्. एस्. — पुणें

७० रा. रा. सदाशिव महादेव दिवेकर — कल्याण

१२७ रा. रा. नरसिंगराव कोन्हेर देशपांडे — मुळेभावी

७१ रा. रा. यशवंत गोविंद देशपांडे, बी. ए. एल् एल्. बी. — उमरावती

२३५* श्री. सरदार विष्णु अमृत देशपांडे — जुन्नर

१२८ रा. रा. राधाकृष्ण गणपत धोकटे — मुंबई

१२९ रा. रा. बाबूराव हरी नाईक — इंदूर

२७०+* रा. रा. वामन रामचंद्र नाईक — गोलीगुडा

७३ रा. रा. गजानन घनःशाम नाडकर्णी, ॲडव्होकेट — मुंबई

७४+ श्री. रा. विनायक मोरेश्वर नातू इनामदार — पुणें

१३०+ रा. रा. दत्तात्रेय रामचंद्र पटवर्धन, एम्. ए. एल् एल्. बी. हायकोर्ट वकील — मुंबई

२३३ रा. रा. हरि केशव पटवर्धन, बी. ए. एल् एल्. बी. — अहमदनगर

२१७ श्री. रा. गणपतराव हरिहर ऊर्फ बाळासाहेब पटवर्धन — मंगळवेढे

२२ प्रो. शिवराम महादेव परांजपे, एम्. ए. — पुणें

२२६+ रा. रा. वासुदेव गोपाळ परांजपे, एम्. ए. एल् एल्. बी. — पुणें

१३१ डॉ. गोपाळ सदाशिव पळसुले, एल्. एम्. एस्. — पुणें

७५ रा. रा. केशव आपा पाध्ये, बी. ए. एल् एल्. बी. — ठाणें

७६ रा. रा. विनायक चिंतामण पांडे, बी. ए. एल् एल्. बी. — उमरावती

७७+ रा. रा. श्रीकृष्ण व्यंकटेश पुणतांबेकर, बी. ए., बार-ॲट-लॉ — उमरावती

७८ रा. रा. दत्तात्रेय शिवराम पुसाळकर, वकील — एरंडोल

१३२ रा. रा. रघुनाथ जगन्नाथ पेंडसे — एरंडोल

१३३ रा. रा. गोविंद नारायण पोतदार, बी. एस्. सी. — मुंबई

१३४ रा. रा. वामन विष्णु फडके, एम्. ए., बार-ॲट-लॉ — मुंबई

१३५ रा. रा. गणेश बल्लाळ फणसळकर, वकील — सातारा

१३६ रा. रा. नरहरी रघुनाथ फाटक — इंदूर

२५३* रा. रा. वामन शंकर फातरफेकर, बी. ए. — बेळगांव

वा. इ.***

| नों. क्रं. | | |
|---|---|---|
| १९४ | श्री. सरदार आनंदराव भाऊसाहेब फाळके | ग्वाल्हेर |
| १३७+ | रा. रा. गोविंद बजाजी बक्षी, बी. ए. | तंजावर |
| १३८ | रा. रा. रामकृष्ण वासुदेव बर्वे, बी. ए. | मुंबई |
| १८० | रा. रा. मुकुंद वामनराव बर्वे, जज्ज, स्मालकाज कोर्ट | इंदूर |
| २६१* | रा. रा. सदाशिव विनायक बर्वे | पापडी |
| २४०* | ना. दत्तात्रेय व्यंकटेश बेळवी | बेळगांव |
| ७९ | रा. रा. केशव वामन ब्रह्म, बी. ए. एल्. एल्. बी. | उमरावती |
| २२४ | रा. रा. सखाराम केशव भवाळकर, वकील | सावनेर |
| ८० | रा. रा. विष्णु काशिनाथ भागवत, वकील | अमळनेर |
| ८१ | रा. रा. राजाराम रंगनाथ भालेराव | पुणें |
| २०१ | रा. रा. दामोदर केशव भावे | मुंबई |
| ८२ | रा. रा. नारायण बळवंत भिडे, बी. ए. एल्. एल्. बी. | पुणें |
| २४६±* | रा. रा. रामचंद्र गणेश भिंगारकर, वकील | पुणें |
| ८३ | रा. रा. बळवंत सखाराम भुसारी | पुणें |
| २१९ | रा. रा. लक्ष्मण बळवंत भोपटकर, एम्. ए. एल्. एल्. बी. | पुणें |
| १९३ | श्री. रा. नारायणराव ऊर्फ रावसाहेब राजे, भोसले जिंतीकर | ग्वाल्हेर |
| १९८ | रा. ब. काशिनाथ बाळकृष्ण मराठे, बी. ए. एल्. एल्. बी. | पुणें |
| २०६+ | मि. डोसाभाई माणिकजी, वकील | सातारा |
| २२९ | श्री. रा. नारायण यशवंत मिरीकर, वकील | अहमदनगर |
| ३९+ | रा. रा. वासुदेव दामोदर मुंडले | इसलामपूर |
| २०८ | रा. रा. श्रीपत शंकर मुळे, बी. ए. | भिंगार |
| ८४ | रा. रा. कृष्णाजी बळवंत मोघे, कारभारी | जमखंडी |
| ८५ | रा. रा. महादेव विष्णु मोडक, बी. ए. एल्. एल्. बी. | नंदुरबार |
| १८७ | रा. रा. विनायक कृष्ण राजवाडे, वकील | अकोला |
| २३० | रा. रा. नागनाथ लक्ष्मण रानडे, बी. ए. एल्. एल्. बी. | अहमदनगर |
| २०४ | रा. अनंत दिनकर रास्ते | नाशीक |
| ४० | रा. रा. शंकर रामचंद्र राजे | पुणें |
| १०५ | प्रो. विष्णु गोविंद विजापूरकर, एम्. ए. | तळेगांव |
| २६९+* | रा. रा. दत्तात्रय कृष्ण लेले | हैदराबाद |
| १४० | डॉ. मोतीराम बाळकृष्ण वेलकर, एल. एम्. एस्. | मुंबई |
| २३७* | रा. रा. बाळकृष्ण रामचंद्र वैद्य | पुणें |
| १४१ | रा. रा. गोविंद पंढरीनाथ शिदोरे, बी. ए. | पुणें |

नों. क्र.

८६ रा. रा. वासुदेव विष्णु शिदोरे, वकील — धुळें

१४२ रा. रा. पांडुरंग केशव शिराळकर — कऱ्हाड

२४१+* रा. रा. कृष्णाजी आण्णाराव सरदेशपांडे — मणोली

१७६ प्रो शेख अबदुल कादर सर्फराज, एम. ए. — मुंबई

२४२* रा. चिंतामण रामचंद्र सहस्त्रबुद्धे — धारवाड

१४३ रा. रा. दिनकर धोंडो साठ्ये, एल. आर. सी. पी. — मुंबई

२०७ रा. रा. सदाशिव धोंडो साठे, एल. सी. ई. — वडोदें

१७ रा. रा. अच्युत सीताराम साठे, एम. ए. बी. एल. — अकोले

१४४ रा. रा. भालचंद्र गणेश साठे, बी. ए. एल एल. बी — धुळें

१४५ रा. रा. रामचंद्र धोंडदेव साठे, बी. ए. एल एल. बी. — कुंदगोळ

२६८ रा. रा. महादेव विष्णु साने — पुणें

२७३+* रा. रा. रामचंद्र शेषगीर सावनूर, बी. ए. एल एल. बी., सबजज्ज — तळेगांव सासवड.

१७८ रा. रा. रामचंद्र गणेश सोमण, वकील — सातारा

१९५ रा. रा. विनायक कृष्ण सोहोनी — पुणें

## सभासद वर्ग ३

१४ वैद्यपंचानन कृष्णशास्त्री नारायण कवडे, बी. ए. — पुणें

८८ रा. रा. पांडुरंग वामन काणे, एम. ए. एलएल. एम. — मुंबई

१४६ रा. रा श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, बी. ए. एलएल. बी. — खामगांव

९० रा. रा. वासुदेव वामन खरे शास्त्री — मिरज

२७५*+ रा. रा. शंकर रामचंद्र खळदकर, वकील — तळेगांव ढमढेरे

१४७ रा. रा. रघुनाथ हरि गद्रे, वकील — नाशीक

४७ रा. रा. बळवंतराय कल्याणराय ठाकोर, एम. ए — पुणें

२२३+ रा. रा. दत्तात्रेय परशराम चिंचाळकर, बी. ए. एलएल. बी. — अमळनेर

१४८ प्रो. महादेव मल्हार जोशी, एम. ए. — जुनागड

२८३*+ रा. रा. सखाराम गणेश जोशी — पुणें

९१+ रा. रा. वामन दामोदर तळवलकर, वकील — पुणें

९२ रा. रा. महादेव गंगाधर दामले, बी. ए. एलएल. बी. — उमरावती

२२५ रा. रा. माधव त्रिमलराव देशपांडे — हुन्नर

२५१* रा. रा. पुरुषोत्तम गणेश नानल शास्त्री वैद्य — पुणें

२७६*+ रा. रा. शंकरराव गोपाळ देशमुख, वकील — सासवड

९३ रा. रा. रामचंद्र विनायक पटवर्धन, बी.ए. एलएल. बी. — पुणें

१४९ रा. रा. नीळकंठ पांडुरंग पाटणकर, बी. ए. एलएल. बी. — नाशीक

नों. क्र.

| | |
|---|---|
| ३६ रा. ब. दत्तात्रेय बळवंत पारसनीस | सातारा |
| ९४+ रा. ब. विठ्ठलराव नारायण पाठक | सातारा |
| १३ रा. रा. महादेव मोरेश्वर फडणीस इनामदार | पुणें |
| २४८*+ रा. रा. कृष्णाजी गोविंद बहुलेकर, वकील | कऱ्हाड |
| २४९* सरदार त्रिंबकराव शिवराम बर्वे, मोकदम | पुणें |
| ४ प्रो. चिंतामण गंगाधर भानू, बी. ए. | मुंबई |
| ३८ रा. रा. हरी रघुनाथ भागवत, बी. ए. | पुणें |
| १९०+* रा. रा. विनायक नारायण मनोहर, बी. ए. एल् एल्. बी. | खांडवा |
| २०२ रा. रा. माणिकचंद किसनदास मुथा, बी. ए. एल् एल्. बी. | अहमदनगर |
| १७९ रा. रा. वामन परशराम मेहेंदळे | औंध |
| १५१+ रा. रा. दामोदर सावळाराम यंदे | मुंबई |
| ९५+ रा. रा. विष्णु नारायण वर्तक, एम्. ए. एल्. सी. ई. | पुणें |
| ९६* रा. रा. नारायण विनायक सरज्योतिषी | गोंवें |

## सभासद वर्ग ४

| | |
|---|---|
| १५३+ रा. रा. विष्णु बावा अक्कलकोटकर | अक्कलकोट |
| २३८* रा. रा. केशव रघुनाथ अवस्ती | पुणें |
| २५७+* रा. रा. श्रीपाद यशवंत अभ्यंकर, बी. ए. एल्एल्. बी. | मुंबई |
| ९७ रा. रा. कृष्णाजी विष्णु आचार्य कालगांवकर | पुणें |
| १५४ रा. रा. दामोदर वैजनाथ आठल्ये, बी. ए. | पुणें |
| १८९ मिया शिकंदर लाल आतार उर्दू शिक्षक | वाळवें |
| १५५ रा. रा. गोविंद विनायक आपटे | वांई |
| ८७+ रा. रा. दत्तात्रेय विनायक आपटे | पुणें |
| १५६ रा. रा. वासुदेव गोविंद आपटे, बी. ए. | इंदूर |
| १२ रा. रा. हरी नारायण आपटे | पुणें |
| १५७ रा. रा. जनार्दन विनायक ओक, एम्. ए. | पुणें |
| २८१* प्रो. रघुनाथ दामोदर करमरकर, एम्. ए. | पुणें |
| १५८ रा. रा. जनार्दन सखाराम करंदीकर, बी. ए. एल् एल्. बी. | पुणें |

नों. क्र.

| | |
|---|---|
| २९+ रा. रा. रघुनाथ पांडुरंग करंदीकर, हायकोर्ट वकील | सातारा |
| १५९ रा. रा. हरी नारायण किरपेकर | पुणें |
| ८९ रा. रा. केशव बाजीराव संत कुलकर्णी | इंदापूर |
| १६०± डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर, एम् ए. पी. एच. डी. | नागपूर |
| २७२+* रा. रा. विश्वनाथ अनंत केसकर, प्रिन्सिपाल | हैद्राबाद |

नों. क्र.

२७९+* रा. रा. रामचंद्र मार्तंड खत्री — जुन्नर

९९+ रा. रा. माधव विष्णु खरे, वकील — एरंडोल

२७८* रा. रा. गंगाधर दामोदर खिस्ती — पु

१२० रा. रा. अनंत हरी गद्रे — पुणें

१९१+ रा. रा. दामोदर विश्वनाथ गोखले, बी. ए. एलएल. बी. — पुणें

२७४+* रा. रा. माधव रंगनाथ गोखले — तळे गांव ढमढेरे

१६१+ रा. रा. रामचंद्र जनार्दन गोखले, बी. ए. — पुणें

१००+ प्रो. विष्णु दत्तात्रय गोखले, एम्. ए. — पुणें

१६३ प्रो. विनायक सखाराम घाटे, एम्. ए. — पुणें

२८२+* रा. माधव हणमंत घोरपडे — पुणें

२८०+* रा. रा. दामोदर रामचंद्र चिपळूणकर, बी. ए. — पुणें

२५९* रा. रा. वासुदेव गणेश चिरमुले, बी. ए. एल्एल्. बी. — सातार

२११ रा. रा. पांडुरंग मार्तंड चांदोरकर — जळगांव

१०१ रा. रा. मल्हारराव राघोबा जाधव — नेवासें

१८३ रा. रा. रघुनाथ कृष्ण जोशी, बी. ए. — जुन्नर

२४५+* रा. रा. वासुदेव विष्णु जोशी — सातारा

१६५ रा. रा. शंकर नारायण जोशी — वांई

२०५+ रा. रा. शिवराम नीळकंठ जोगळेकर — त्र्यंबक

२३६+* प्रो. विठ्ठल वामन ताह्मनकर, बी. ए. — जयपूर

२३१* रा. रा. रामचंद्र मार्तंड देशपांडे — अहमदनगर

२६५+ रा. रा. रामचंद्र त्र्यंबक देशमूख, शिक्षक — नागपूर

१६६ रा. रा. राजाराम दामोदर देसाई, बी. ए. — पुणें

२३२ रा. रा. नीळकंठ वामन नगरकर — पुणें

१६७ रा. रा. सी. ल. नाडकर्णी — इंदूर

१०२ ना. रघुनाथ पुरुषोत्तम परांजपे — पुणें

२०९ रा. रा. नरहर नारायण पटवर्धन — वांई

२४ रा. रा. पांडुरंग नरसिंह पटवर्धन — पुण

१८८ रा. रा. हरिहर सदाशिव पटवर्धन — पुणें

२३ रा. रा. रामकृष्ण दत्तात्रेय पराडकर — पुणें

१६८ रा. रा. गणेश लक्ष्मण पागे — मुंबई

२३९* रा. रा. हरी बळवंत पेशवे — जेजुरी

२१४ रा. रा. गोपीनाथ बालकृष्ण पोतनीस — पुणें

# अनुक्रमणिका

# भारत-इतिहास-संशोधक-मंडळ

# इतिवृत्त

श्री

## वैद्यघराणें

कानदखोरेंकर वैद्यघराण्याची वंशावलि राजश्री नरहर परशराम वैद्य यांचे येथें पुणें मुक्कामीं मिळाली. तिची नक्कल इतिहाससंशोधकांच्या सोयीकरितां हजर केली आहे. नशारनिल्हे नरहर परशराम हे मूळपुरुष कोंडप्रभु यांचे पासून १६ वे पुरुष आहेत. या वंशाचा विस्तार भोर संस्थानांत कानदखोऱ्यांतील. लशिरगांव, कोंडगांव, कोंडावळें बुद्रुक, कोंडावळें खुर्द व कोळवडी या गांवीं आहे.

मूळ पुरुष पहिले कोंडप्रभु यांनीं संस्थान भोर तालुके प्रचंडगड यांतील तर्फ कानदखोऱ्यांचीं कुलकर्णें, देशपांडे-हक्क, इनामें व जमीनी इत्यादि वतनें संपादन केलीं.

या वंशावळींतील ३ रे पुरुष गोविंद विसाजी प्रभु हे शिवकालीन असावेत असें वाटतें. चित्रगुप्तविरचित बखरींत ज्या गोविंद विश्वनाथाच्या देखरेखी-खालीं ' सिंधुदुर्ग ' नामक किल्ला बांधला असा उल्लेख आहे तेच हे गोविंद विसाजी प्रभु असावेत असें वाटतें.

या वंशावळींतील ५ वे पुरुष गोविंद प्रभु यांचे धाकटे चिरंजीव नानाजी प्रभु यांस पुत्र २ सजणाजी व शामजी; पैकीं वडील सजणाजी ह्यांनीं राजाराम महाराजांचे कारकीर्दींतील प्रसिद्ध पुरुष धनाजी जाधवराव यांचे बरोबर चंदीच्या मुकामास जाऊन कुलकर्णीपणाचें, देशपांडेपणाचे आणि इनामजमीनीचे हक्क परत मिळविल्याचा कागदोपत्रीं पुरावा आहे. त्याची अस्सल बरहुकूम नक्कल पाहण्यास आणली आहे.

सदरहू वैद्यघराण्यासंबंधीं अस्सल कागदपत्र कोंडावळें बुद्रुक व दापोडें वगैरे ठिकाणीं असून त्यांच्या कांहीं नकला दादर मुक्कामीं परशराम चिमणाजी वैद्य यांचे येथें असल्याबद्दल माहिती मिळते.

वर उल्लेख केलेल्या कागदपत्रावरून सजणाजी नानाजी यांचे करितां धनाजी जाधवराव यांनीं भीड खर्च केली असावी असें दिसतें. त्याचप्रमाणें छत्रपति शिवाजी महाराज यांचे कारकीर्दींत मुसलमानी अमलापासून चालत आलेलीं इनामें व देश-

पांडेपणाचीं व कुळकर्णेपणाचीं वतनें नष्ट केलीं होतीं, व त्या लोकांचें कामाबद्दल मुशाहिरे चालू असत. असा स्पष्ट उल्लेख आहे.

वतनदार पद्धतीचा जीर्णोद्धार परत राजाराम महाराजांच्या कारकीर्दींत होऊन ती च पद्धत पुढें सर्व मराठेशाहींत रूढमूल होऊन राहिली. तिचे अवशेष अजून ही पाहण्यास सांपडत आहेत.

गोपीनाथ बाळकृष्ण पोतनवीस

---

## जगन्नाथकृत साम्राज्यपद

राजवाड्यांचे कऱ्हाडसंग्रहांत वरील प्रकरणाचें एक शेवटचें पान आढळलें. ओवीबद्ध आहे. शेवटची ओवी ७१ वी आहे, ती अशीः—

' साम्राजपद ते ऐसे ॥ आवलोकीता आत्मा प्रकाशे ॥ तो हा कृपीश्वर-कृपावसे॥ सफळ व्हावा श्रोतीया ॥७१॥ इति श्रीसाम्राजपद संपूर्णमस्तु ॥श्रीरामचंद्र॥'

हा हि कृपीश्वराचा च शिष्य. चांदो. यादी पृ. ३६ पहा.

चैत्र शु. ७।१८३७ }
पुणें. दत्तो वामन पोतदार

---

## जगन्नाथकृत महावाक्यभाष्यार्थ गद्यपद्य.

राजवाडे-कऱ्हाड-संग्रहांत मिळालें.

शेवट असाः— 'इपि आज्ञा अनुमोदें महावाक्य वर्णनछंदें ॥ जगनाथाची निमाली द्वंदे ॥ परमानंदे राहिले ॥ २ ॥ इति श्री०........................ शके १७६९ प्लवंग नाम संवत्सरे फाल्गून शु॥ ७ रविवारे ॥ '

जगन्नाथाचें नांव पृ. ३६ वर आहे. हा कृपीश्वराचा शिष्य हें उघड होतें. सदर प्रकरण त्यांत नाहीं. शके १७६९ हा वरील अष्टपत्री प्रकरणाचा लेखनकाल आहे.

चैत्र शु. ७।१८३७ }
पुणें. दत्तो वामन पोतदार

---

## केशवस्वामिकृत आत्मचिंतन.

राजवाड्यांच्या कऱ्हाडसंग्रहांत केशवस्वामिकृत ' आत्माचें अनुचिंतन ' अपूर्ण मिळालें. गद्यपद्य आहे.

चैत्र शु. ८।१८३७ }
पुणें दत्तो वामन पोतदार

---

# मानभावी कृष्णदास.

गेल्या संमेलनप्रसंगीं मी ' वालक्रीडे ' वर एक चर्चात्मक लेख मंडळापुढें वांचला होता; व त्यावेळीं त्या वालक्रीडेचा अथवा दशमस्कंदाचा ( कारण तो ग्रंथ दशमाचा एक भाग ह्मणून उपलब्ध झालेला होता ) कर्ता स्वतःस जरी ' एकनाथ ', ' जनार्दनाचा एका ' ह्मणून ह्मणवीत होता तरी तो वस्तुतः एकनाथ नसून नामधारी दुसरा च कोणी तरी असावा असें मी सिद्ध केलें होतें व असें ही सुचविलें होतें कीं बहुधा तो कोणी मानभाव असावा.

या ' मानभावां ' च्या संबंधीं जो माझा ग्रंथव्यासंग झाला आहे त्यावरून यांनीं मराठी वाङ्मयांत सदृशनामें धारण करून अत्यंत घोटाळा उडवून दिलेला आहे असें माझें मत झालेलें आहे. तथापि यांचे बद्दल साशंक होण्याचा एक साधारण नियम मी घालतों व तो पुष्कळसा अपवादरहित हि आहे. नियम असा कीं श्रीकृष्ण-चरित्राचा अथवा श्रीदत्तचरित्राचा प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष जेथें संबंध आला नाहीं अशी कोणती हि रचना मानभावानें केलेली बहुधा उपलब्ध होत नाहीं. हा नियम अर्थात पौराणिक ग्रंथांस लागू आहे.

नामसादृश्यानें श्रीकृष्ण व श्रीदत्त या दोन च पौराणिक व औपनिषदिक देवतांस मानभाव मानतात इतरां कोणास हि ते मानीत नाहींत.

आज हे विचार सुचण्याचें कारण मानभावाचें नुकतेच उपलब्ध झालेलें ' रुक्मिणीस्वयंवर ' हें होय. यांत ग्रंथकारानें आपणा स्वतःस ' कृष्णदास ' हें नांव घेतलें आहे. श्रीनाथांच्या नांवाचा उपयोग करून एका मानभावानें 'वाळक्रीडा' केली, यांनीं श्रीनाथांच्या समकालीन कृष्णदासाचें ( मुद्गल ) नांव धारण करून रुक्मिणीचें स्वयंवर लाविलें. आज वाळक्रीडेचा ग्रंथ अगर त्यावरील टिपणें मजजवळ नसल्यानें मला जरी असें कांहीं त्या संबंधानें लिहितां येत नाहीं कीं ज्या विचारा वरून या मानभाव ग्रंथकाराची मनोरचना स्पष्ट करितां येईल तरी इतकें स्मरतें कीं त्या ग्रंथांत " जनार्दनाच्या एकानें " (?) श्रीकृष्णाच्या तोंडून वसुदेव देवकी व वडिलबंधु बळिराम यांस मूर्ख ह्मणविलें आहे. मासल्या करितां ह्मणून ह्यांच्या कृष्णदासांचे हि विचार थोडेसें देतों. श्रीकृष्णकथा अत्यंत पावन आहे, कशावरून ? पूर्व दाखले पहाः—

हे चि श्रीकृष्णकथा श्री भागवतीं ।
सुक हरीवंसु बोलीला परिक्षिति ।
तें आईकतां तया जाली मुक्ति ।
सप्त अहोरात्री माजी ॥ २८ ॥
आणि हें चि कथा बोलतां भारथ ।
जयेमुनीचें कुष्ट गेलें निभ्रांत ।

अठरा हत्या फिटलीया त्वरित।
जन्मेजयाची ॥ २७ ॥

भारतीं कां भागवतीं ? असो.

आणि हे चि कथा आइकिली मंडोधरी।
तिचें कुष्ट गेलें जें होतें मुखावरी।
येक येका श्लोकाची थोरी। श्रीकृष्ण वाखाणितां ॥ २८ ॥

मंदोदरीचे मुखावर कुष्ट होतें हें मला अश्रुतपूर्व आहे. धन्य आहे या मानभावग्रंथकारांची ! हे कोणता दांडगा शोध लावितील याचा नेम च नाहीं.

या ग्रंथकाराचा आणखी एक शोध देऊन हें रुक्मिणीस्वयंवराख्यान आटपतें घेतों.

आजपर्यंतची आपली समजूत अशी कीं संस्कृत ही मातृभाषा असून महाराष्ट्री अथवा मराठी ही तिला कन्या स्थानीं आहे परंतु या कवींस (?) हें प्रमेय ग्राह्य वाटलें नाहीं ह्मणा अथवा याहून अधिक उच्च रूपक करणें बरें वाटलें ह्मणा त्यानें संस्कृत हें मराठीचें बालक आहे असें ठरविलें, कारण काय? तर 'मराठी' ही स्त्रीलिंगी व संस्कृत हें नपुंसकलिंगी ह्मणून माता व बालक यांचीं जीं लिंगें तींच मराठी व संस्कृत यांचीं. तेव्हां लिंगसादृश्यावरून संबंध ठरविण्यास कितीसा आवकाश ! असो. या ग्रंथाचे एकंदर २६ प्रसंग आहेत; व ओवी एकंदर ३२१३ आहेत. कवितेच्या स्वरूपाबद्दल विशेष लिहिण्यासारखें असें कांहीं च नाहीं.

आतां ग्रंथकारासंबंधीं थोडेसें लिहूं.

निरनिराळीं नांवें धारण करून ज्या मानभावांनीं ग्रंथलेखन केलें आहे त्यांची यादि खुद्द मानभावमठाधिपति यांस तरी माहित असेल कीं नाहीं याची शंका च आहे; व कदाचित् माहित असली तरी ती प्रसिद्ध होईल कीं नाहीं याची ही शंका च आहे.

प्रस्तुत ग्रंथकार स्वतःस कृष्णदास ह्मणवितो परंतु हें कांहीं त्याचें मूळ नांव दिसत नाहीं, हें उघड आहे. मूळ नांव काय असावें याचा कोठें हि सुगावा या ग्रंथांत दिलेला नाहीं.

रा. पाध्ये यांनीं आपल्या मानभावावरील लेखाचे अखेरीस त्यांच्या ग्रंथांची व ग्रंथकारांची यादी दिलेली आहे तींत 'रुक्मिणीस्वयंवर' हा ग्रंथ **नरेंद्र** याचे नांवावर आहे. परंतु एक तर ही यादी माझे स्वतःचे माहितीप्रमाणें अत्यंत अपुरी आहे व दुसरें असें कीं नरेंद्राचें जें रुक्मिणीस्वयंवर तें च हें असें समजण्यास मला कांहीं साधन ही नाहीं. रा. पाध्यांचे यादींत कांहीं ग्रंथकारांचे शक दिले आहेत. नरेंद्राच्या नांवापुढें शक नसल्यानें निश्चय करण्याचें तें हि एक साधन नाहींसें झालें आहे.

प्रस्तुतचे पोथीचे शेवटीं शक दिला आहे तो असा.

संवत १७७१ जये नाम संवत्सरे: गाघमासे शुक्लपक्षे: तीथौ २ द्वीतीया: भोमे दीने: ग्रंथ संपूर्न. नुभं भवेत: ॥

हा संवत् लेखनसंवत् असावा असा बराचसा संभव दिसतो. कारण या लेखाच्या वरील एक दोन ओवी अशा आहेत:—

**ग्राम गांधली माझारी। कल्यानपुरें अवधारी। श्रीदत्ततुळसी नीरंतरी। असे तेथ ॥ ११ ॥ तेथें गुरुमठामाझारीं। ग्रंथु लीहीला अवधारी। प्रीती पावो श्रीमुरारी। श्रीकृष्णरावो ॥ १२ ॥ हे हस्ताक्षर अवधारी। वीप्रपद्माजी मुढ नीरंतर। गेलें अक्षर वांचावे चातुरीं। चुक सेवकासि क्षेमा कीजे ॥ १३ ॥ संवत—इत्यादि.**

वरील सर्व लेख एका च वळगाचा व एका च शाईनें लिहिलेला आहे. तेव्हां शक १६३७ हा जर लेखनशक धरला तर रचनाशक केव्हां तरी त्या पूर्वी असला पाहिजे हें उघड आहे; आणि हा कृष्णदास केव्हां तरी शक १६३७ चे पूर्वी अगर त्या शकीं झाला असावा हें हि तितकें च स्पष्ट आहे.

येथपावेतों लेख लिहिल्यानंतर खानदेशांत एका गांवीं मानभाव मठांत मला कांहीं वाडें मिळालीं होतीं तीं आतां च हातीं आलीं. त्यांतील एका वाडांत ‘ रुक्मिणीस्वयंवर ’ नांवाचें एक प्रकरण आहे. तें व प्रस्तुत चें ताडून पहातां कांही पाठभेद वगळले तर दोन्हीं अगदीं एक च आहेत. या नवीन वाडांत ही प्रत्येक प्रसंगाचे अखेर ‘ कृष्णदास ’ हें च नांव दिलेलें आहे.

परंतु अखेरच्या ओवींत ग्रंथकर्त्याचें नांव संतोष मुनी ह्मणून दिलेलें आहे यावरून हा संतोष मुनी च स्वतःस ‘ कृष्णदास ’ ह्मणवीत होता असें दिसतें. त्या ओवी महत्वाच्या ह्मणून खालीं देतों:—

**कुंकुमठाण ग्राम गंगातीरी।**<br>
**तेथ ग्रंथ आरंभिला सींगेश्वरी।**<br>
**तो संपूर्ण सिद्धि गेला श्रीनगरीं।**<br>
**भिलमढीं जाणा ॥ ३१६५ ॥**<br>
**गुरुवार शुभ फाल्गुण।**<br>
**द्वितीये तिथी आनंद दिन।**<br>
**तै श्रीनगरी ग्रंथ जाला संपूर्ण।**<br>
**श्रीरुक्मिणी सैंवर ॥ ३१६६ ॥**<br>
**ऐसा तीन सहस्त्र दोनसे ग्रंथु।**<br>
**सिद्धि पावला मासा येका आंतु।**<br>
**कवि संतास मुनि ह्मणे श्रीकृष्णनाथु।**<br>
**पावे प्रीति स्वामि माझा ॥ ३१६७ ॥**

हस्ताक्षेर नागींद्र मुनीचंः पुस्तक दर्सत ठाकुराचें मौजे स्याहापूर.

येथें लेखनशक अगर रचनाशक दिला नाहीं परंतु वर दिलेल्या लेखनशकाचे अनुरोधानें शक १६३६ चे पूर्वी आनंद शक १५९६ मध्यें येतो. तेंव्हां या वरील उतार्‍यांत आनंद जो शब्द आला आहे तो जर संवत्सराचा दर्शक असेल तर शक १५३६ आगर १५९६ हा शक या संतोष मुनीचा असावा. प्रश्न इतकाच कीं शक १६३६ चे पोथींत ग्रंथकाराचें नांव कां नसावें ? कुंकुमठाण ग्राम जाऊन, गांधली कल्याणपूर हें आलें याचें कारण कदाचित् हें लेखकाचें गांव (आगर प्रांत) असेल, परंतु जो लेखक आपलें गांव देण्यास चुकत नाहीं त्यानें कवीचें (?) नांव गांव कां गाळावें ? अगर मागाहून तर कवीचें, ग्रामाचें वगैरे नांवें आलीं नाहींत ! परंतु हें मनास योग्य भावत नाहीं. अथवा शक १६३६ मध्यें संतोषमुनी इतका जुना झाला होता काय कीं कित्येक प्रतींतून त्याचें नांव ही नाहींसें व्हावें अगर त्याच्याच पंथांतील लेखकास ही त्याचें विस्मरण व्हावें ? ग्रंथांतर्गत भाषा तर इतकी जुनी दिसत नाहीं ! हें कोडें मला उकलत नाहीं.

धुळें
चैत्र शु॥ ७
१८३७

गो. का. चांदोरकर.

## चंद्रराव मोरे यांस आलेलें पत्र.

आषाढ वा॥ १ शके १५६८

मा॥ हा॥ राजमान्याविराजित राजमान्य
राजश्री चदरराऊ राजे गोसावि यासि

जाव सुद

॥ श्री ॥ श्रीमत प्रहुडीप्रताप अखडित लक्षमी आलकृत परोपकार मूर्ती माहामेरु राजमान्य राजश्री

प्रति स्नहआंकित गोमाजी नरसिह व रामाजी कृस्ण हवाले अफजलपूर महमूदशाही उरुफ का॥ बावधान पा॥ वाई रामराम विसेश येथील क्षेम तो ध र्म श्री

गोसावि स्वकीये कुशेल लिहि ती आज्ञा केली पाहिजे विसेश पिलाजी मालोजी विराजर देसाई इही वाडी कसबे मजकुरीची मारूनु वस्तभाव नेली व कुणवी २ धरूनु नेले होते त्यास मार करूनु व गोणिया मधे घालूनु त्या पासूनु कतबे लेहोनु घेतले व जमान घेतले तोंवरी गोसावि यासि खबर लिहिली त्या वरुनु त्यास लेहोनु कुणवी सोडविले परतु त्याची वस्तभाव दिघली नाही जमानदारास तगादा करिताती तो जमानदार येऊनु या कुणवियासि तगादा लावितो

१ हीं अक्षरें बरोबर लागत नाहींत. २ त्यावरि, त्यावर.

यावरुनु रयेता वेदील होऊनु वाटी पडते वाटो पडली ह्मणिजे दुरी देराज लागेली तरी राउर्ते त्यास कागद लेहोनु त्याचा कतबा व याच्या वस्ता पाठऊनु देविलिया पाहिजेतो गोसाविया नये व हजरती साहेवा मधे वेगलीक नाही आणि दरम्यान हे लोक येसे अमल करुनु मदलास करितातो तरि त्यास ताकीद लेहोनु सदरहू गोष्टीचा तगादा तोडूनु टाकविला पाहिजे या उतरा वरुनु हुजूर खवर लिहिणे लागेली ये विसी वहूत काये लिहिणे गोसावि विवेकी आहेती कृपा असो देऊनु कागदी

फारसी
शिका

पत्री साभाळित जाणे छ १४ जमादिलोवल सुना सवा अवैन अलफ हे विनति मोर्तब

फारसी
मोर्तब

१ हें पत्र क्षेत्र महावळेश्वर येथील रा. शिवराम सदाशिव महावळेश्वरकर यांच्या दफ्तरांत सांपडलें. पत्र फार जीर्ण झालें आहे तरी अक्षरें बहुतेक शाबूद आहेत.

२ चंद्रराव मोरे राजे जावळीकर यांस अफजलपूर ऊर्फ वावधनचे बादशाही हवालदार यांनीं हें लिहिलेलें आहे. तें सुरु सन १०४७ (ह्मणजे सन इसवी १६४६) मध्यें चंद्र १४ जमादिलोवल या रोजीं लिहिलें. लिहिलेल्या मायन्यावरून चंद्रराव मोऱ्यांच्या थोरपणाचा अजमास करतां येतो.

३ सुरुसन १०४७ ह्मणजे सन इ. १६४६ मध्यें चंद्रराव यांस हवालदार गोमाजी नरसिंह व रामाजी कृष्ण हे 'रामराम' लिहितात यावरून रामदासांनीं शिवाजीकडून 'जोहारा' ऐवजीं 'रामराम' ह्मणण्याचा प्रघात घातला ह्मणून जी कथा प्रचलित आहे ती चांगलीच डळमळते. रामदासांची व शिवाजीची गांठ पडण्यापूर्वी ही ह्मणजे ( सन १६४९ पूर्वी ) 'रामराम' करीत असत व लिहीत असत असें या पत्रावरून शाबीद होत आहे.

४ 'गोणियामधे घालूनु' यावरून त्यावेळीं गोणा ह्मणजे मोठा गोणता त्यांत घालून दम कोंडून जबरदस्तीनें कदवे लिहून घेत असें दिसतें. मुलखांत त्यावेळीं मारामाऱ्या, लुबाडणें व जबरदस्ती कशी होत असे याचें दर्शक हें पत्र आहे.

५ पत्राचें अक्षर सुरेख आहे. त्या काळच्या उत्तम हस्ताक्षराचा मासला च या पत्रांत आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं. शब्द लिहून मग बाळबोधींत लिहितात त्याप्रमाणें ओळी काडलेल्या आहेत. सबंध एक ओळ काढून मग तिजवर शब्द लिहिलेले नाहींत. पुष्कळ बाबींसाठीं या पत्राचा फोटो घेणें अवश्य आहे.

का. ना. साने

---

१ फार दूर. २ राजांनीं.

# बाळाजीपंत नातूचें एक पत्र

सोबतचें पत्र बाळाजीपंत नातूचें असून, तें त्यानें वॉर्डिन साहेबास ता. २४ फेब्रुवारी सन १८३३ रोजीं लिहिलेलें आहे. पत्रांतील मजकुराचा साकल्यानें विचार करितां, पत्र त्राग्याचें दिसतें. या वेळीं बाळाजीपंतावर एकादा प्रसंग आलेला दिसतो. बाळाजीपंतानें शके १७३९ सालीं शनिवारवाड्यावर बाहुटे रोंवल्याची आख्यायिका सर्वतोमुखीं आहे. सदरचे पत्रांत लेखकानें सदर गोष्ट कबूल केली आहे. आतां शनिवारवाड्यावर बाळाजीपंतानें च बाहुटे रोविलें, ही गोष्ट निर्विवाद सिद्ध होत आहे.

**पां. न. पटवर्धन**

नकल

साहेब मुषफक मेहेरबा कर्मफरमायदोस्ता हजरत जान वॉर्डिन साहेब बहादुर सलमहू

६ नियाजमद बाळाजी नारायण नातु सलाम बाजद सलाम खैरयत अज्याम येथील खैरयत तागाईत तारीख २४ फेब्रुवारी सन १८३३ पावेतो हजरताचे मेहेरबानाने खैर असे दरविला

१ तारीख २३ फेब्रुवारी सन १८३३ या रोजी हजरतास मी पत्र पाठविलें की २४ वे तारखेस निघून येतो. नंतर तेथून घरी आलो तो अगोदर ३ दिवस ताप येत होता त्याजवर हवा लागलेमुळे फारच ताप आला तो अद्याप आहे च. मेहेरबान डाक्तर साहेब यानी गणेशपंतास पाठविलें होते त्यांचे औषध घेतलें आहे. अशा लाचारीमुळे राहणे जाले. हजरत माझे बऱ्याकरितां राहिले मोअक आलकाब बंदीगानअली लाट क्लेअर साहेब बहादुर यानी माझे करिता आपल्यास रजा दिली हा त्याचा थोरपणा व यहसान मी वर्णन किती करावे. लाटसाहेब बहादूर याजबरोबर मी गेलो होतो ते आमची बोली समजत नाहीत परंतु त्याचे स्वभाव व चालीवरून माझे दिलास बहुत खुषी झाली हजरताचे लिहून येता च यावे असा निश्चय करून लिहिले परंतु प्रकृतीमुळें लाचार झालों तरी या कामास नावाकब सारी सलामसलत हजरताची या करिता याचा बंदोबस्त कसा तो करविला पाहिजे मी आपले हुकुमाशिवाय नाही.

२ आपण तारीख २२ फेब्रुवारीचे पत्रीं लिहिलें कीं पुढें दुसरे गव्हनर साहेब येतील ते आपल्यास ओळखणार नाहीत व मेहेरबानी करावयास तुह्मी लायख नाहीत असे समजतील ह्मणून लिहिले त्यास खुदावंत बंदीगान अलि अलपिस्टन साहेब बहादुर मला कामकाजात बोलावू लागले. बाजीरावसाहेब आपल्या जवळ चाकरीस राहावयाविशी फार आग्रह करीत होते थोर थोर बोलण्यास घातले परंतु मी कबूल केले नाहीं यामुळे बाजीरावसाहेब याची फार नाखुषी होऊन फोर्ड साहेब याचे मार्फतीने बाळाजीपंत तुह्मी आपले जवळ येऊ देऊ नये असे सांगून

पाठविले. त्याच वेळेस मी हा मुलुख सोडून काशीस जात होतो तेव्हा अलपिष्टन साहेब यानी मला जामीन देऊन ठेवून घेतले याची साक्ष अलपीष्टन साहेब व त्यावेळचे साहेब लोक आहेत. पुण्यावरचे दप्तर जळाले परंतु याचा दाखला बंगाल सरकारचे दप्तरात असेल. पुढे सरकारचा अमल झाला. बाजीराव साहेब पळून गेले. त्यावेळेस पेशवे याचे वाड्यावर बावटा लावावयास राबीनसनसाहेब ( राबर्टसन ) याजबरोबर मला च पाठविले मी जात नव्हतो तेव्हा तुह्मी भिता की काय ह्मणू लागले सबब गेलो. ते राबीनसनसाहेब हली पुण्यात आहेत त्यास माहीत आहे, या मुळे बाजीरावसाहेब व त्यांचे राज्यातील सारे लोकांची मजवर दुष्मानी सारे लोक एकीकडे मी एकटा कंपनीचे लष्करात होतो सरकारनें मेहेरबानी करून इनाम पेनशन दिले तत्राप त्या लोकास वाईट न वाटावे असे गरीबीचे चालीने सर्वांशी दोस्तीने वागतो. मजवर कोणी फिर्याद केली नाही व मीही कोणावर केली नाही याचा दाखला सरकारात आहे. कर्न सर ब्यारो कलुष ( क्लोज असावे ) याज बरोबर सन १८१० चे साली माळव्यात होतो. तेव्हा पालखी पंचवीस स्वार पन्नास माणूस अशा तऱ्हेने होतो. खंडेराव रास्ते यानी मरते वेळेस मी जवळ नसता वंश्यतनामा केला त्यात मला मुखत्यार लिहून ठेविले माझी बेहुरमत व बदनाम कोठेही नाही लढाईचे वेळेस काही ऐवज सरकारांत ठेविला त्यास पाटिंजर साहेब हली आहेत त्यास माहीत आहे. अशी थोडीशी पत माझी पहिली च होती असा अहवाल आहे. परंतु हे बोलणे लायख नाही. पुढे गौरनर साहेब येतील ते सरकारची दप्तेर व साहेब लोकाची वाकबगारी व सला न घेता माझा हुरमत खोटे छापखान्याचे भरवशावर कमती करतील या गोष्टी परिक्षा पहावयास येथें राहणें मुनासब नाही. या करिता मनात विचार पुरा आणून हली लाट साहेब येथें आहेत व आपल्यासारखे साहेब लोक वाकब येथें आहेत तो पावेतो साऱ्यांच्या खुषीनें रजा घेऊन काशीस जावे असा निश्चय करून हे आपल्यास पत्र लिहिले आहे तर मजकरीता आपण मेहेरबानी करून तसदी सोसून सरकारात माझे तर्फेचा अर्ज करावा जर माझे इनाम पेनशन सरकारात वापस घेतले असता मजवर कोणाचा वहीम राहणार नाही असे असल्यास वापस घ्यावयाचे ठरवून अबरू करिता सर्टिफिकीट देऊन काशीस जाण्याची रजा द्यावी ह्मणजे दसऱ्यास निघून काशीस जाईन आपण मेहेरबानगी करून हें केले ह्मणजे यात माझी फार अबरू आहे व आपले येहसान जन्मपर्यंत विसरणार नाहीं.

३ गोविंदराव घोरपडे यांची पंचाईत निसबेट साहेब येलेट साहेब यानी धाखाउ केली ते हली या मुलखात आहेत असे असता माझे बदनाम छापतो असेच सारे खोटे मजकूर छापवितो याचा बंदोबस्त सरकारने करावा ते न होता माझे चालीस व कामास वाकब या मुलखात जे साहेब लोक आहेत ते च मजवर वहीम धरू लागल्यास पुढे नावाकब सरदार येतील तेव्हा मुषकल पडेल असे मनात आणून मी लिहिले आहे

४ कोणी कशीहि तजवीज केली तत्राप लवाडाचे तोंड बंद होत नाही विलायतेत येथे ही मोठे मोठे लोकावर लवाडीनें छापतात त्याचा बंदोबस्त झाला असे ऐकिले नाही. जे मजवर त्यानें खोटे छापले आहे त्यात साहेब लोकास ज्या गोष्टीचा वहीम असेल ते मेहरवानगी करून मला कळवावे. ह्मणजे त्या कलमा विषई मी फिर्याद करून त्यास नशीयत देण्याची तजवीज हजरताचे सल्लेने करीन या करिता हे माझे पत्र आपल्या मर्जीस आल्यास सरकारात पोचते व्हावे व वर लिहिल्या प्रमाणें होऊन सरकारचा हुकुम होईल तो लिहिला पाहिजे

५ मजकूर लिहिला हा आपल्या जवळ येऊन समक्ष बोलावें असे मनात होते परंतु प्रकृतीमुळें येणे तूर्त होत नाहीं मी लिहिला मजकूर हा बहुत करून आपल्यास वाकब च आहे व आपण आमचे मुरवी दोस्त आमचे ज़ेणे करून चांगले ते इच्छिणारे या करिता जे मनात आले ते लिहीले आहे जसे आपले सल्यास येईल तसे करून लिहून यावे.

वर लिहिल्यावरून मालूम होईल ज्यादा काय लिहिणें प्यार मोहोबत असो दिजे हे कितावत

सही **बाळाजी नारायण नातु**

---

## (१) तानाजीनंदन

तानाजी कवि ऐकून ठाऊक आहे, पण तानाजीनंदन हें नांव नवीन आहे. इंदुरमठांतील बाड अनुक्रमांक २३ यांत यांचें एक पद आहे, तें येथें देतों. सदरहु बाड सुमारें शें दीडशें वर्षामागचें दिसत असून त्यांत अनेक कवींची बहुधा हिंदुस्थानी कविता उतरलेली आहे.

**कामिनीसंगें नाडले थोर थोर ॥ ध्रु० ॥**
**रावण प्राणासी मुकला । इंद्र भगांकित जाला ।**
**भस्मासुर भस्म जाला । चंद्र जाला क्षयरोगी ॥ १ ॥**
**शंकर भुलला भिल्लिणीसी । प्रजापति पाहे कन्येसी ।**
**विश्वामित्र उर्वशीसी । भोगिता जाला तात्काळ ॥ २ ॥**
**ह्मणे तानाजीनंदन । न कळे स्त्रियांचें विंदान ।**
**थोर ठकले योगीजन । वाचे वर्णूं मी किती ॥ ३ ॥**

---

## (२) शिवसुतप्रभुकृत संतनामावळी

ही नामावळी इंदुरबोधनमठांतील बाड ३१ यांत मिळाली. सदरहु बाड शक १७४६ चे सुमारास लिहिलेलें आहे. ‘ शिवसुतप्रभु ’ हें नांव नवीन आहे.

राम सीता कृष्ण राधा विठल रखमाई ।
अयोध्या द्वारका पंढरी माहेरघर बाई ॥ ध्रु० ॥
कमळादेवी माता माझी पिता जनार्दन ।
विष्णुभक्त हे बांधव अवघे स्वदेश त्रिभुवन ॥ १ ॥
संत साधु सज्जन बंधु बहीण थोर थोर ।
उद्दंड दैवाचा मी माझा बरवा घरचार ॥ २ ॥
निवृत्ति ज्ञानं सोपान सांवता चांगा वटेश्वर ।
येकनाथ पुरुषोत्तम नरहरि मालो कबीर ॥ ३ ॥
रोहिदास नामया तुकोवा विसा खेचर ।
चोखामेळा वैहिरा पास नरहरि सोनार ॥ ४ ॥
रामदास महामुद्गलस्वामी गोरा कुंभार ।
भानुदास नरसीव्ह मेता शहाहुसेन फकीर ॥ ५ ॥
जनार्दन जगजीवन सेना नागो जनमित्र ।
नारा ह्मादा गोदा विठा नामाचा पुत्र ॥ ६ ॥
मुकुंदराज महामुनी वडवाळसिद्ध नागेश ।
रेणुकानंदन परसा नामया विष्णुदास ॥ ७ ॥
जोगा परमानंद अच्युत अनंत गोविंद ।
निंबा भाट नरसींव्हभारती श्रीरामानंद ॥ ८ ॥
जोती रामानंद बुधा गणेशनाथ हे गोरक्ष ।
तुळशीदास स्वयंप्रकाश दामा सुरदास ॥ ९ ॥
उद्धवचिद्घन केशवस्वामी शिवराम आई ।
शिवदिन केसरीनाथ कमळाकर मिराबाई ॥ १० ॥
गंगाराम सिद्धपुरुष कान्हो पात्र मुक्ताई ।
जनाई पुंडलिकाचा भाव पांडुरंगपाई ॥ ११ ॥
संतनामावळीची अखंड माळा करुनि कंठीं ।
श्रवणपठणनिजध्यासनिश्चय वरूनि काळ कंठी ॥ १२ ॥
तया रुक्माईपति पांडुरंग जगजेठी ।
भुक्ति मुक्ति फळदायक ठाव देतो वैकुंठी ॥ १३ ॥
शिवसुतप्रभु ह्मणे नलगे आणिक जपतपसाधन ।
मनीं धरूनि दृढ जावें संताला शरण ॥ १४ ॥

---

## (३) गुंडाकवि

संतकविकाव्यसूचींत यांचें नांव नाहीं. इंदुरबोधनमठांतलि बाडांत यांचें नांव पुष्कळदां आढळतें. बाड ३६ यांत गुंडांचे तीनशें चारशें अभंग आहेत

घाड दीडशें दोनशें वर्षांमागचे दिसतें. हे विठ्ठलोपासक दिसतात. यांचे अभंग चाळून पाहिले, पण त्यांत ते स्वतःविषयीं कोठें माहिती देत नाहींत. त्यांच्या कवितेचा मासला ह्मणून दोन चार अभंग देतों:—

( १ )

हे च मागतों विठ्ठला । तुझें भजन देईं मला ॥ १ ॥
तुझ्या चरणीं जडो प्रीती । हें च मागतों श्रीपती ॥ २ ।
संतसमागम । तुझें हृदईं देईं प्रेम ॥ ३
ह्मणे गुंडा पंढरिनाथा । हें चि दान देईं आतां ॥ ४ ॥

( २ )

भाव तेथें देव सांगताती सर्व ।
टाकोनिया गर्व भजे कोणी ॥ १ ॥
भावावीण कोणा जाली असे मुक्ती ।
धुंडाळितां युक्ति ने दिसे कोठें ॥ २॥
विश्वासाचें बळ होवावें अढळ ।
संदेहाचा मळ झाडूनिया ॥ ३ ॥
गुंडा ह्मणे विठो माझा येक भाव ।
तुजवीण वाव सर्व मानी ॥ ४ ॥

( ३ )

तुझिया भजना नलगे स्वर ताळ ।
नामाचा गोंदळ घालूं बरा ॥ १ ॥
वेदशास्त्र कांहीं नलगे पढण ।
हरी तुझें भजन असे सार ॥ २ ॥
अबद्ध सुबद्ध नाहीं हा विचार ।
काय सारासार निवडण ॥ ३ ॥
गुंडा ह्मणे बोल कसा तरी असो ।
जिव्हे नाम वसो हें चि पुरें ॥ ४ ॥

( ४ )

नको नको देवा देऊं अभिमान ।
तुझें जें भजन जाईल दुरि ॥ १ ॥
लवकिक विषय जीवा होईल गोड ।
जाली तुझी जोड जाईल दुरि ॥ २ ॥
ठेवि तुझ्या नामीं दृढ चित्त माझें ।
इतुकें हें ही वोझें साही देवा ॥ ३ ॥

गुटा ह्मणे कांहीं पडेली जरि चुकि ।
साहोनिया निकी करी वापा ॥ ४ ॥

---

## (४) मोहनविप्र कवि

कविकाव्यसूचींत यांचें नांव नाहीं. टांकळी मठांतील वाड अनुक्रमांक १ यांतील २७९ व्या पृष्ठावर यांचें एक पद आहे.

विंचु उतरा गे साजणी । आणा सारंगपाणी ।
वैर साधिलें तयान । चित्त नेलें चोरून ॥ ध्रु० ॥
उभी होते मी आंगणीं । हर्षवंत मनीं ।
सोळा हि शृंगार करूनि । पीतांबर कांचोळी ।
रंगे रंगाविली सुखवेळा । उभी गे चित्रशाळा ॥ १ ॥
धांवा धांवा गे झडकरी । बहुत पीडा करी ।
तिडक्या उठताती ललाटीं । कळ ध्या गे मनगटी ॥ २ ॥
खांब कवटिला अवचिता । तेथें विंचु होता ।
विंचु नव्हे गे हा काळ । मन जालें व्याकूळ ॥ ३ ॥
सुटली विरंगुंठी मोकळी । मूर्छित भूमंडळीं ।
स्वरूपीं तेजाकार झांकले । ते हि दीप्त जालें ॥ ४ ॥
चंद्र उगवला आकाशीं । तो आणा मजपासीं ।
मोहनविप्र ह्मणे जय आतां । पावे श्री अनंता ॥ ५ ॥

शं. श्री. देव

---

## बाळाजी बाजीरावांचे ब्रह्म-हत्या-प्रकरणीं एक पत्र

हें पत्र मला वांईस गोदूबाई मळेकर यांचे कडून मिळालें. ह्या बाई वांईच्या सुभेदार परंपरेंतील चिटको शामराव नामक शेवटच्या सुभेदाराच्या कन्या होत. यांचे येथें अत्यंत महत्वाचें कागदपत्र आहेत. त्यांपैकीं मला अगदीं थोडे उपलब्ध झाले असून बाकींच्या बद्दल प्रयत्न चालू आहे. मला उपलब्ध झालेल्या अस्सल पत्रा पैकीं च बाळाजी बाजीराव पेशव्यांनीं वांईचे सुभेदार हैबतराव भवानी शंकर यांस ब्रह्महत्या प्रकरणीं लिहिलेलें प्रस्तुतचें पत्र आहे.

शिकंदरलाल आतार, वांई.

श्री

सकल गुणालंकरण अखंडीत लक्ष्मी
आलंकृत राजमान्य राजश्री हैबतराव भ
वानीशंकर स्वामी गोसावी यांसि

पोष्य बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणोन

स्वकीय कुशल लिहीत गेले पाहिजे विशेष बाबूराव सखदेव व जानो मल्हार देशपांडे पा फलटण यां उभयेतांमध्यें परस्परें कलह होऊन दोघांकडील दोघे पुरुष मृत्य पावले बाबूरायाचा सहोदर बंधू शामराव याजला बाजी चिमणाजी व आपाजी चिमणाजी जानो मल्हार याचे सखे पुतणें याणी शस्त्रघाते करून मारिलें व बाजी चिमणाजी यास शामराव याचा सखा पुतण्या विठल भगवंत व बाबूराव याणीं मारिलें येणे प्रमाणे दोघे मृत्य पावले या कलहामध्यें केशो रघुनाथ देशपांडे पा मार ब्राह्मणवधीं कींचित् प्रवर्तला ऐसा निश्चये होऊन त्याची चौकसी हुजूर ब्रह्मसभा करून मनास आणीली आणि त्यास प्रायेश्चीत द्यावयाचा निश्चये केला यास शब्द प्रायेश्चीत त्यांची प्राज्यापत्ये १८० येकसे असी नेमीली आहेत तरी सदरहु प्रमाणें याची शक्ती पाहोन प्रायेश्चीत द्यावया करितां केशो रघुनाथ वांई क्षेत्रास तुह्मांकडे पाठविले आहेत व क्षेत्रस्थ समस्त ब्राह्मणास हीं पत्र पाठविले आहे तरी तुह्मी समस्त ब्राह्मणास सांगोन यास प्रायेश्चीत देवऊन शुध करविलें पाहिजे जाणिजे छ ९ सफर सुा समान खमसैन मया व अलफ बहुत काये लिहिणे हे विनंती.

---

## पांडे पेडगांव परगणा.

( फारशी मजकूर )

नकल माफीक असल

( श ) के १५७७ मनमथ सवत्सरे चैत्र सुध ( प्रती ) पदा वार बुधवार ते दीवसी राजेश्री गुडाजी ( बीन नरसीं ) हू कुलकर्णी व देसकुलकर्णी शहर हवेली अहमदनगर या ( सि ) चांदजी बीन कान्होजी भुपतराय देसमुख पा कडेवलीत व पाडीया पेडगाऊ व मोकदमी कसबे माडोगण पेठ कातराबाद लेहून दीधले ऐसे जे आपले वतन देसमुखी पा मजकुरीची आहे परंतु आपणास भोगवटा कीत्ति मुदती तो नाही हाली आपण तलाश करावा तरी आपण नातवान आंहो या करीता आपणास ईलाज होत नाही आणी दरम्यान कोन्ही वतनास खलेल करील तरी तुह्मी ब्राह्मण आहा आणी बहूत दीवस पा मजकुरीचा कारबार करीता तुमचा लौकिक आहे या निमत्य आपण तुह्मास देसमुखीची तकसीम मीरासी करून दीधली असे तुह्मी दोनी हीसे घेने आपण एक हीसा घेऊनु तरी तुह्मी देसमुखीचा तलाश करून अमल चालता करणे व दीवाणातील सनद परवाने करून घेने व मान माणतुक पुढील मोह ( रप ) तुह्मी घेणे व मागे आपण घेणे बी तपसील.

| पुढील मान गुडाजी नरसीह घेने | | मागे मान भोपतीराय घेने | |
|---|---|---|---|
| १ आपले नांव | १ लुगडी पुढे | १ आपले नाव | १ लुगडी मागे |

---

१ येथून अक्षर श्रीमंत बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब यांचें.

| पुढे लीहीणे | घेने | मागे लीहणे | घेने |
|---|---|---|---|
| १ नीशान आपल्या | १ पाने पुढे घेने | १ नीशान आपल्या | १ पाने मागे घेने |
| नावाखाले करणे | १ भेटी पुढे ठेवणे | नावाखाले करणे | १ भेटी मागे घेने |

सदरहूप्रमाणे मोहरप तुह्मी घेने माघाड मान आपण घेऊनु या कामास वेच खर्च दरबारी लागेल त्यासि तुह्मी आपणा पासुनु रुपये हजार एक खर्च करणे त्याची तकसीम आपण नेऊ या खेरीज खर्च लागेल तो तकसीमप्रमाणे दोनी हीसे तुह्मी देने एक हीसा आपण देऊनु व दीवाणातून पा। मो ईनाम चावर करून घ्याल त्यासि तकसीमप्रमाणे तरफाचा ईनाम तरफेमधे करून घेणे अधीक सोधी हर एकीकडे जाला तरी तकसीमप्रमाणे वाटून घेऊनु याखेरीज तुमची ईनामती पहीली मौजे नादे व पीपरखेडीची वाडी आहेती ते तुमची तुह्मी खाणे त्यासि आपणास समध नाही व आपला ईनाम मोकदमीचा कातरावाद माडोगणी आहे तो आपण खाऊनु त्यासि तुह्मास समध नाही व परगणे मजकुरी जे उतपण व सायेरबाब होईल ते तरफेचे तरफे खाले घेने या खेरीज ईजारदाराच्या मुले उतपण होईल ते तकसीमप्रमाणे वाटून घेने व बाकीचे जत्रेमधे जे उतपण होईल ते आह्मी घेऊनु आणी देवाचा प्रसाद तुह्मास देतील तो तुह्मी घेणे आह्मास देतील तो आह्मी घेऊनु व पा। मा। च्या तरफा ३ त्यांपैकी तुह्मास तरफा २ दोनी दीधल्या असेती बी तपसील

| तरफ अकुलनेर | | तरफ कडे | |
|---|---|---|---|
| १ अकुलनेर | १ सेंडी | १ कडे | १ अठवड |
| १ कामरगाऊ | १ पोखर्डी | १ सेरीखुर्द | १ चीचोंडी |
| १ चास | १ अरनगाऊ | १ सेरी बु॥ | १ नांदूर मांळी |
| १ नेपती | १ बुरुडगाऊ | १ केरुळ | १ पींपले |
| १ बोल्हेगाऊ | १ पदमपूर | १ पारगाऊ जोगेश्वरी | १ अभोरे |
| १ नागापूर | १ खंडाळे | | १ हींवरे |
| १ वडगाऊ गुपींत | १ खडकी | १ जांबगाऊ | १ पीपरखेड |
| १ अमीनाबाद | १ वालकी | १ वाळुंज खुर्द | १ कारखेल |
| १ पीपलगाऊ मालवी | १ सीराढोण | १ पाटोदे | १ गहुखेल |
| १ जेऊर | १ पारगाऊ कोल्हा | १ डोणगाऊ | १ साल वडगाऊ |
| १ इमामपूर | १ वाळुंज | १ अरनगाऊ | १ उचरखेल |
| १ पीपलगाऊ उजेनी | १ ईसापूर | १ सीराळ | १ देवले सीलेमान |
| १ मांडवे | १ नारायर्ण डोहो | १ दहीटणे | १ घाटदेऊळगाऊ |
| १ सांडवी | १ उकडगाऊ | १ रुई | १ सावरगाऊ |
| १ मघडगाऊ | १ दसमे गव्हाण | १ नांदे | १ सेंडाळे |
| १ बदी सारोले | १ टाकळी | १ नीवगाऊ चोभा | १ माणीकदौंड |

| | | | |
|---|---|---|---|
| १ रगत वडगाऊ | १ मेहेकरी | १ टाकळी अमया | १ बेलदुरी |
| १ देवगाऊ | १ कोल्ही | १ सीरोपुरे | १ देवळाली रामकाली |
| १ खांडके | १ अगडगाऊ | १ साबळखेड | १ घाटपींपरी |
| १ जांब | १ रांजनी | १ चींचोली | १ घांटे |
| १ पीपलगाऊ लांडगा | १ माथनी | १ धानोरे | १ दादेगाऊ |
| १ पारगाऊ ता (नांदूर) | १ कौडगाऊ | १ वडगाउ नीपानी | १ डोंगरगण |
| १ भातोडी | १ भातोडी | १ खराटी वडगाऊ | १ धामनगाऊ |
| १ पीपलगाऊ घाट | १ केल | १ कानडी खुर्द | १ जाटदेवले |
| १ सोनवाडी | १ वडगाऊ | १ पीपलगाऊ— काजी | १ कारखेल बु॥ |
| | | १ पुंडी | १ सुरोडी |
| | १ वाद खेल | १ खुंटेफल | १ बावी |
| | | १ खुटेफलखु॥ | १ कोन्ही |
| | | १ बनवाडी | १ डोईठाणे |
| | | १ वाघलूज | १ नींबोडी |
| | | १ सागवी | १ नींबगाऊ देवं |
| | | १ पाटण | |
| | | १ खीलद | |

बाकि तरफ कातराबाद देह ५९ हे आपले ताल्लुक असेती

| | | | |
|---|---|---|---|
| १ माडोगण | १ रुई | १ अंबीली | १ कोंडाणे |
| १ वडघोल | १ मढपीपरी | १ औरंगपूर | १नींबगाऊ गाग |
| १ गुडगाऊ | १ कोयाले | १ वेरांडी | १नीबगाऊ बोडव |
| १ रालेगण | १ लोणी | १ पारवाडी | १ वोही |
| १ देऊलगाऊ सीदी | १ साकद बु॥ | १ थोवल सागवी | १ थेरगाऊ |
| १ गुणोवडी | १ साकद खु॥ | १ थेटे सागवी | १ मादली |
| १ वडगाऊ | १ दहीगाऊ | १ घोगरगाऊ | १ बुमरी |
| १ तांदली | १ हतवलण बु॥ | १ रोहखेल | १ पीपरी |
| १ वाटेफल | १ हतवलण खुर्द | १ चीचोली | १ कानडी |
| १ खुटेफल | १ वनपीपरी | १ वांगर्डे | १ वेलगाऊ |
| १ माही जलगाऊ | १ तरडगव्हाण | १ खडवी | १ वाकी |
| १ सुलतानपूर | १ चवरसागवी | १ कोंडाणे | १ तीकी |
| १ पीपलसुटी | १ हींगणी | १ गुरोपीपरी | १ मीरजगाऊ |

१ मांगमठाण                १ रवलगाऊं        १ खरडगव्हाणं
                             १ गोदर्डी          १ ———
                             १ कापसी

सदरहू तरफा तुमचे तरफेचे उतपण जे होईल ते तुह्मी खाणे आमचे तरफेचे उतपण जे होईल ते आह्मी खाऊन या खेरीज जदीद गाव व पेठ ज्याजती वसाहतीने तरफेस होईल त्याचे त्याणे उतपण खाणे व तरफ चाभारगोंदे व ता कडेवलीत पेडगाऊ वगैरा देह आहेत त्याची तरतुती करून देसमुखीचा अमल चालता करणे त्याचे उतपण जे होईल ते सदरहु तकसीम प्रमाणे वाटून घेणे दोनी वांटे तुह्मी घेणे एक वाटा आपण घेऊनु यासि खर्चवेच जो लागेल तो तकसीम प्रमाणे देने सदरहु प्रमाणे तुह्मास आत्मसंतोषे कागद लेहोनु दीधला आपण दीधला असे तुह्मी व आह्मी सदरहु प्रमाणे देसमुखी लेकरांचे लेकरी खाणे यासि अनसारीख करून तरी आपणास साक्ष श्री असे हे लीहीले सही चादजी भोपतीराऊ दसखत सही वरी लीहीले ते सही

वी कलम त्रीवक रखमागद कुलकर्णी
कसबे माडोगण पेठ कातरावाद
गोही

माडवगणकर

वाऊजी मोकदम                सभेराऊ सेठे
कसबे मा।                    पेठ मा। सही
वालजी खीला चौगला           मलमाली मेहतर

वापुजी चौधरी मोकदम मौजे हतवळण बुा।
फिरोजी व वकाजी मोकदम मौजे थोवळसागर्नी
जेतजी व मोहीजी मोकदम मौजे हतवळण खुर्द
वालाजी मोकदम मौजे औरगपूर उरुफ हतवळण खुर्द
वी भानजी व वीठोजी गोवीद कुलकर्णी व [जोसी
देह मा। देह ४
यमाजी मोकदम मौजे वागर्डे
वीा। मोरजोसी कुलकर्णी

१ सरकार अहमदनगर मधे पांडेपेडगांव परगणा महत्वाचा होता. शके १५७७ मध्ये त्याचा विस्तार किती होता हें वरील कागदावरून दिसून येईल. इतिहासप्रसिद्ध पेडगांव उर्फ वहादुरगड हा गांव या परगण्यांत नव्हता मग याचे नांव पांडेपेडगांव कां पडलें समजत नाहीं. या परगण्याच्या तीन तरफा होत्या. त्यापैकीं तर्फ अकोळनेर मध्ये ५१ गांवे, तर्फ कडे यामध्ये ६३ गांवे व तर्फ कातरावाद मध्ये ५९ गांवे अशी एकंदर १७३ गांवे होतीं. या कागदांत

३

तर्फ कातराबाद मध्यें ५९ गांवें आहेत असें नमूद करून खालील यादींत फक्त ५७ गांवांचीं च नांवें दिलीं आहेत. दोन गांवांचीं नांवें देण्याचें राहिलें असें दिसतें. कदाचित ती नक्कल करणाराची चुक असावी.

२ हल्लीं या परगण्याची गांवे नगर, जामखेड, श्रीगोंदे व कर्जत या चार तालुक्यांत सामील झालीं असून, कांहीं मोगलाईत गेलीं आहेत.

३ गुंडाजी नरसिंह हे कडे येथील देशमुखाचे मूळपुरुष होत. उद्गीरच्या लढाई नंतर श्रीमंत विश्वासराव व निजाम यांची भेट करून देणारे भगवंतराव कडेकर या गुंडाजीपंताचे वंशज होते ( पंतप्रधान शकावली पान १६ )

४ मांडवगणचे देशमुख यांना पूर्वीं भूपीतराय ही पदवी होती.

५ वरील कागद गुंडाजी नरसिंहाचे भिंगार येथे असलेले वंशज रा. विनायक रामचंद्र देशमुख कडेकर यांच्यापाशीं मिळाला.

**ना. य. मिरीकर**

---

## मराठेशाहींतील कांहीं प्रसंगांच्या मित्यांची चर्चा

### १ शहाजी महाराजांची कैद.

शहाजी महाराज कर्नाटकचे स्वारीवर गेल्यानंतर, त्यांचे व नबाब मुस्तफाखा याचें वांकडें पडून, बाजी घोरपडे यानें महाराजांस धरून मुस्तफाखान्यस्वाधीन केलें ही गोष्ट इतिहासांत नमूद आहे. या कामीं शहाजी महाराजांस नक्की कोणत्या मित्तीस कैद केलें हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे. शहाजीला १६४९ त कैद केलें असें डफ ह्मणतो, परंतु त्यास त्यानें कांहीं विशिष्ट आधार दिलेला नाहीं. विजापूरच्या पातशहांची बखर या ग्रंथाचे कांहीं भाग भारतवर्ष मासिक पुस्तकांत छापिले आहेत; त्यांतील सहाव्या प्रकरणाच्या आधारें बाजी घोरपडे यानें हिजरी १०५७ च्या रजबीं ह्मणजे इ. स. १६४७ च्या ६ आगष्टला शहाजी महाराजाला धरून मुस्तफाच्या स्वाधीन केलें, असें रा. राजवाडे यांनीं आपल्या म. इ. साधनांच्या चवथ्या खंडाचे प्रस्तावनेचे ८८ व्या पृष्ठावर प्रसिद्ध केलें आहे. शिवछत्रपतींच्या कारकीर्दीसंबंधानें जीं टिपणें उपलब्ध आहेत त्यांत शहाजी महाराज शके १५७० श्रावण वद्य १ स कैद झाले असें एकमतानें दिलेलें आढळतें. या मित्तीस हिजरी तारीख १५ रजब सन १०५८ ही येते. भारतवर्षांत दिलेला सनाचा आंकडा एक वर्षानें चुकला आहे, व त्याचे आधारानें काढिलेली तारीख अर्थातच अप्रमाण होय. 'बसातिने सलातिन' या फारसी ग्रंथांत हिजरी सन १०५८ च दिलेला आहे. फारसी ग्रंथांतील हिजरी सनानीं तारीख व आपल्या इकडील टिपणांतील मित्ती यांचा येथें वर सांगितल्या प्रमाणें नामी मेळ बसत असल्यामुळें, शहाजी महाराज शके १५७० श्रावण वद्य १, हिजरी

तारीख १५ रजब सन १०५८ रोजीं कैद झाले, असें धरणें च प्राप्त होतें. या मित्तीस इंग्रजी तारीख २५ जुलै इ. स. १६४८ ही पडते.

---

## २ अफजलखानाचा वध

अफजलखानाचा वध हा शिवछत्रपतींच्या चरित्रांतील एक अद्भुत प्रसंग होय. हा इतिहासप्रसिद्ध वध केव्हां झाला, नक्की कोणत्या मित्तीस अथवा तारखेस झाला याबद्दल डफनें आपल्या मराठ्यांच्या बखरींत कांहीं दिलेलें आढळत नाहीं. हा प्रसंग डफनें इ. स. १६५९ चे आक्टोबर महिन्याचे हकीकतींत दिलेला आहे. मल्हार रामराव सदर प्रसंगाची मित्ती शके १५८१ मार्गशीर्ष शु. ५ भृगुवार ही देतो; व ही च प्राह्य धरून, रा. राजवाडे यांनीं आपल्या म. इ. सा. खंड ४, प्रस्तावना पृ. १०२ वर अफजलखानाचा वध ता. ७ नोव्हेंबर सन १६५९ रोजीं झाला असें म्हटलें आहे. परंतु गणितानें मार्गशीर्ष शुद्ध पंचमीस गुरुवार येत नसल्यामुळें, रा. राजवाडे, यांनीं वर सांगितल्याप्रमाणें दिलेली तारीख चुकीची ठरते. मार्गशीर्ष शुद्ध सप्तमीस गुरुवार येतो. जेधे यांचे शकावलींत ही च मित्ती दिलेली आहे. अशा स्थितींत ही च मित्ती ठरविण्यास कांहीं एक हरकत नाहीं. या दिवशीं इंग्रजी तारीख १० नोव्हेंबर इ. स. १६५९ ही येते.

---

## ३ शाहिस्तेखानावरील छापा

शाहिस्तेखानावर छापा घालून, शिवछत्रपतींनीं त्याचीं बोटें छाटिलीं हा हि प्रसंग महत्वाचा आहे. इ. स. १६६३ सालची हकीकत देतांना, डफनें हा प्रसंग वर्णिला आहे. नक्की तारीख व महिना त्यानें दिलेला नाहीं. मराठ्यांसंबंधींच्या इतिहासाचे कांहीं टिपणांत ही मित्ती चैत्र शु. ८ अशी दिलेली आढळते. मोंगल तवारिखांतून, व मुनशी देवीप्रसादकृत जसवंतसिंगच्या चरित्रांतून ही च मित्ती आढळते. अशा रीतीनें या तिथीचा मेळ बसतो. यामुळें ही तारीख प्राह्य धरण्यास कांहीं प्रत्यवाय दिसत नाहीं. या दिवशीं इंग्रजी तारीख ४ एप्रिल इ. स. १६६३ ही येते.

---

## ४ तानाजी मालुसऱ्याचा मृत्यू

तानाजी मालुसऱ्याचा मृत्यू हा हि प्रसंग महत्वाचा आहे. हा प्रसंग शके १५९१ माघ वद्य ९ स झाला, असें बखरींतून व तत्कालीन पोंवाड्यांतून दिलेलें आहे. तेव्हां इतर पुराव्याच्या अभावीं, ही च मित्ती खरी धरण्यास हरकत नाहीं. सदर मित्तीस इंग्रजी तारीख ४ फेब्रुवारी इ. स. १६७० ही येते.

---

## ५ छत्रपती राजाराम यांची मृत्यूतीथ

श्री राजाराम महाराज सिंहगड येथें शके १६२१ प्रमाथी नाम संवत्सरीं फाल्गुन वद्य ८ सह नवमी रोजीं दिवंगत झाले, असें राजाराम छत्रपतीच्या बखरींत दिलेलें आढळतें. डफ आपल्या बखरीच्या पहिल्या पुस्तकाच्या ३२२।३२३ पानांवर राजाराम महाराज मार्च महिन्याचे सुमारास वारले, असें अंदाज़ानें लिहितो. गणीत करून पाहतां, शके १६२१ चे फाल्गुन वद्य ८ सह नवमीस **शनिवार** येतो; व इंग्रजी तारीख २ मार्च सन १७०० इसवी ही पडते. 'मआसिर अलमगिरी' वरून पाहतां, राजारामाचे मृत्यूचीं खबर औरंगजेबास ता. ५ मार्च इ. स. १७०० रोजीं कळल्याचें उघड होतें. तेव्हां, तत्पूर्वीं २।३ दिवस ह्मणजे ता. २ मार्च सन १७०० रोजीं राजाराम वारला, हें खरें ठरतें. मार्च महिन्याच्या सुमारास हा प्रसंग घडला, हें जें डफचें अंदाजी ह्मणणें तें खोटें ठरतें. खरी तारीख २ मार्च सन १७०० होय- सिंहगडास राजारामाची पुण्यतिथी दरसाल फाल्गुन वद्य ९ स अद्यपि हि साजरी करितात.

---

## ६ श्री. थोरले बाजीरावसाहेब यांची मृत्यूतीथ

श्री. थोरले बाजीराव साहेब पेशवे नर्मदातीरीं रावेर येथें शके १६६२ वैशाख शु. १२ रविवारीं वारले. डफनें हा प्रसंग ता. २८ माहे एप्रिल इ. स. सन १७४० रोजीं घडला असें ह्मटलें आहे. गणितानें वरील मित्तीस इंग्रजी तारीख २७ येते; २८ येत नाहीं. डफनें जुनी जंत्री उपयोगांत आणिल्यामुळें, एक दिवसाचा घोंटाळा उडाला. खरी तारीख २७ एप्रिल १७४० ही होय.

पुणें, मित्ती आषाढ शु. ५, २४३ } **पांडुरंग नरसिंह पटवर्धन**

---

## छत्रपतीचे इंग्रजांशीं राजकारण

### शके १७३९

शके १७३९ तील राज्यक्रांतीचे वेळीं सातारकर छत्रपती यांची श्री. पेशवे यांचे संबंधानें कोणत्या विशेष प्रकारची वृत्ती होती, याचा थोडा वहुत परिचय आपणांस चतुर्थ संमेलन प्रसंगीं सातारकर छत्रपतींच्या वारनिशीच्या द्वारें झालेला च आहे. आज सदरहू प्रसंगीं सातारकर छत्रपतींचें इंग्रजांशीं जें राजकारण झालें तें त्या राजकारणांत प्रत्यक्ष पडलेल्या मंडळींच्या मुखानें आपणांपुढें ठेवीत आहे.

सोवत जी हकीकत दिली आहे ती साताऱ्यास मिळालेल्या एका चोपडीवरून अक्षरशः नक्कल करून दिलेली आहे. तींत दिलेल्या मजकुरासंबंधींच्या

सत्यासत्यतेसंबंधीं चर्चा करण्याचें अगर त्यावरून सुचणाऱ्या अनुमानांचें दिग्दर्शन करण्याचें या संबंधीं मुकाबल्यास आणखी कांहीं कागद मिळेपर्यंत मुद्दाम लांबणीवर टाकलें आहे. मराठेशाहीच्या ऱ्हासाविषयीं बारकाईनें विचार करणाऱ्या गृहस्थांस याचा थोडा फार उपयोग होईल.

---

## इंग्रज बाहादूर याजकडे दोस्ती ( इकडील ) करावयास जे गेले त्याची बोलणी जाली तो मार

श्री

यादी तात्या नारळकर याचे मुखे ऐकिले वर्तमान ता। वार सिंव्हस्ताचे साली श्रावण मासात

१ रामभट याचे विद्यमाने राघोपंत देवस्थळी याणी पुण्यकोटीची गाठ घेऊन नंतर पुण्यकोटी याणी अरीस साहेब व मंत्रीसाहेब याची भेट देवस्थळी याची घोडनदीचे मुकामी करविली नंतर साहेबानी राघोपंतास इकडील साविस्तर मार विच्यारिला माहाराजाची वौंशपरंपरा विचारून घेऊन लेहून घेतली आणि राज्याचा समंध विचारिला की राज्य पेशव्यास दान दिल्हे असे पेशव्याचे ह्म( ण )णे ऐकितो हे कसे त्याजवरून देवस्थळी याणी उतर केले की एथील गादीचे चाकर एथील आज्ञेत चालावे त्यास काही राज्यदान केले नाही या प्रो माहितगारी समजाऊन दिल्ही नंतर त्याणी आपले इग्रजी लिपीने लेहून घेतले आणि देवस्थळी यास उत्तर केले की हा मजकूर तुमचा विलायतेस लिहून पाठवितो आणि उत्तर आणवितो नंतर पुण्यकोटीचे ह्म( ण )णे पडले कीं माहाराजास दाहा वीस हजार रुपये खर्चास पाहिजे तरी देऊ व या कामात मोठा कोण आहे व आणखी कोण कोण आहेत ते सांगावे त्याजवरून नावे सांगितली ती नावे वि॥

१ तात्या नारळकर वैद्य

१ विठलपंत फडणीस

२ रामभट व राघोपंत

—

४

च्यार आसामी खेरीज मोठ्या पो गोविंदराव बापू काळे हे हि आहेत त्याजवरून ते बोलले कीं गोविंदराव काळे याची व आमची भेट व्हावी आह्मी त्याजपर्यंत मेण्याचे

डाकेने येतो त्याजवर आह्मी उत्तर केले की हा मजकूर सातारियास जाऊन कळऊं व गोविंदराव काळे यास हि कळऊं नंतर काळे याचे भेटीचा योग करावा मग निघोन सातारियास आलो जाहला मजकूर नारळकर यास कळविला त्या प्रो नारळकर याणी सरकारात कळविला नंतर उत्तर जाले की तूर्त रुपयाचे प्रयोजन नाही कार्य जाले ह्मणजे सर्व पावले मग राघोपंत कोकणात गेले रामभट हे उत्तर घेऊन काळे याजकडे जाऊन त्यास भेटीचा मार कळविला त्याणी उत्तर केले जे तूर्त भेटीचा उपयोग नवे प्रगट जाले असता अती कठीण पडेल या करिता तुह्मी कार्य करावे तुह्मा खेरीज मी नाही या प्रो घोडनदीस जाऊन कळविले नंतर वारंवार आजपर्यंत आरीस साहेब व पुण्यकोटीस ह्या चौ महिन्यानी येऊन जाऊन इकडील मजकुराची सूचना करीत होतो

यादी इंग्रज बहादूर याजकडे पेशजी निंबाजी भो व सुबाजी भो याचे विद्यमाने साष्टीचे साहेब याजकडे बोलणे जाहाले त्याचा तो साष्टीस जाऊन तेथील साहेब याचे हाता खाली कारकून रामचंद्र परभू याची भेट घेतली साताऱ्याहून राजकारणाकरिता तुह्माकडे आलो ह्मणोन सांगितले त्याणी पुसिले की काय मार असेल त्याणी तो बोलावा आणि मार लिहून घेतला आणि विच्यारिले की साताऱ्यात आमल कोणाचा आहे आह्मी सांगितले त्रिंबकजी डेंगळे याचा आहे पूर्वी विठू कोंवडा याचे हतून तुह्माकडे राजकारण केले होते ते पंतप्रतिनिधि याणी तुह्माकडील वकील पुणे मुकामी होते त्यास कळवावे ते न कळविता बाजीराव यास कळविले यास्तव तस्ती तेथे फार जाली आहे आह्मास खाली लाऊन देते समयी श्रीमंत माहाराज राजश्री छत्रपती याची आज्ञा जाली की इंग्रज याचे दोस्तीचा मार बोलोन बाकी मार काहीं एक कलमाचा असेल तो रुबुरु माहाराजाची व तुमची गाठ पडेल त्या वेळेस कलमे उलगडून घ्यावी हाली पलटणे पाठवून किला घ्यावा आणि खुलासा करावा या प्रो रामचंद्र भाऊ परभू याणी लिहून घेतले नंतर त्याणी आपले बिराडी ठेविले आणि ते उठोन साष्टीस साहेब याजकडे गेले त्याणी हा मार साहेबास सांगून त्याणी इंग्रजीत उतरून घेऊन मुमईस लिहून पो तेथील उत्तर आले की भो यास मुमईस रवाना करून यावे त्याजवरून साष्टीचे साहेब यांची भेट रामचंद्र भाऊ परभू याणी केली ते साहेब बोलले जे तुह्मी मुमईस जावे ह्मणजे तुमचे काम होईल त्याजवरून मुमईस जाते समयी एक जासूद व रामचंद्र भाऊ परभू याचा कागद पांडुरंग सोकाजी रामचंद्र परभू याचे सासरे याचे स्वाधीन तो कागद केला त्याणी कागद पाहून गुडीण साहेब मुमईचे मुख्य जनरेल साहेब याजकडे मार समजाविला त्याणी उत्तर गुडण साहेबास केले की त्यास सांगावे जे सध्या येथे राहावे नंतर गुडण साहेब याणे मार भोसले यास सांगितले जे तुह्मी येथे राहावे काम होईल त्याजवरून आह्मी बोललो की येथे बाजीराव याचे वकील आहेत व डेंगळे याची माणसे आमचे वलखीची आहेत याकरिता तुह्मी सांगाल

तर साष्टीस राहू त्याजवर गुढीण साहेब बोलले की आठ पंधरा रोजी भेटून जात जावे त्याजवर साष्टीस राहिलो नंतर निंबा भो निघोन आला आणि सुबाजी राहिला निंबा येऊन जाला मार सरकारात सांगून पाठविला उत्तर सरकारचे आले की तुह्मी जाऊन पुरते उत्तर समजे तो पर्यंत येऊ नये त्याजवर साष्टीस जाऊन नंतर वरचेवर मुमईस जाऊन गुढण साहेबाची भेट घेत होतो यास नऊ महिने जाले तो श्रावण गेला गुढण साहेबानी दुरून आह्मास पाहिले आलीकडे बोलाऊन मंडळी बाहेर काढून बोलले की तुमचे काम एक दोन वर्षानी होईल आमचे साहेब या प्रयत्नात आहेत तुह्मी ही गोष्ट फुटू नये तूर्त निघोन जावे नंतर निघोन आलो.

यादी बळवंतराव चिटणीस याचे विद्यमाने इंग्रज बाहादूर याची दोस्ती जाली त्याचा तो माघ मासी सन सवाचे साली माहुलीस विठलपंत फडणीस गेले होते तेथे फडणीस यासी बोलले की वेटात इलफिस्तन साहेब बहादूर वकील आहेत त्याजकडे आपले वौसांचे व राज्याचा समंध याचे पुरवणीचे पूर्वीचे दाखले दाखऊन त्याची खातरजमा केली त्याणी उत्तर केले की सध्या बाजीराव याचा व आमचा तह आहे त्याचा विघाड त्याजकडून होईल त्या वेळेस तुमचा बंदोवस्त करून देऊं काम होईल काळजी करूं नये या प्रो विठलपंत फडणीस याचा वाका समजाविला तो सरकारात मार फडणिसानी कळविला तेथील उत्तर आले जे राजकारणाचा पेगम सोडू नये त्या नंतर वैशाखमासी सन समानचे साली वेढा पुण्यास पलटणचा वसला ते साली त्रिंबकजी डेंगळे याचे बंडाचा मार व आणखी काही राजकारण मजकूर येथे सरकारात ऐकण्यात आले इंग्रज बाहादूर याचा व बाजीराव याचा तहाचा विघाड बाजीराव याजकडून जाहाला ऐसे ऐकिले त्याजवरून आह्मास फडणीस याणी बोलाविले आणि सांगितले की तुमचा पूर्वीचा संकेत तह विघडला ह्मणजे कार्य करावयाचा होता त्यास हाली विघाड जाला आहे तरी तुह्मी जाऊन इंग्रज यास सुचऊन बंदोवस्त होई ते करावे त्याजवरून पुणे मुकामी गेलो हा मार बाळाजीपंत नातू यास कळविला त्याणी उत्तर केले की आलफिस्तनसाहेब यास कळवून तुह्मास उत्तर कळविती नंतर त्याणी उत्तर सांगितले की बाजीराव याचा व आमचा विघाड जाला होता त्यास आडचणीची कलमे आह्मी बहुत टाकिली त्यास तितक्या कलमास बाजीराव याणी रुकार देऊन तह केला त्यास पुन्हा तह विघडे तो पर्यंत कार्यास अवकाश पडला पुन्हा हा मजकूर साताऱ्यास येऊन कळविला नंतर दोन महिने मधी गेले तो बाजीराव याची स्वारी पंढरीस आषाढीस जाऊन माहुलीस आली त्यावा आह्मी होतो श्रीमंतमाहाराज याचा व बाजीराव याची माहुली मुकामी भेट जाहाली त्या वेळेस बाजीराव याचे श्रीमंत माहाराज याजकडे बोलणे पडले की इंग्रज याचा व आमचा विघाड जाला आहे या प्रकर्णी मसल(?त) बहुत बोलले तो मसलतीचा सारांश ठरला तो आह्मास सरकारातून आज्ञा जाली की हा

मजकूर आलपिसतन बाहादूर यास कळवावा तुमचे ह्म(ण)णे तह विघडला नाही ऐसे येते बाजीराव याचे ह्मणे पडते की इंग्रजाचा आमचा तह विघडला तुह्मास ते लढाई घेऊन बुडवावे असा वेत जाला आहे हा मजकूर तुह्मास कळवावयाविसी माहाराजाची आज्ञा जाली त्याजवरून बाळाजीपंतास कळविले तरी सावध असावे त्याणी उत्तर केले की ही गोष्ट बाजीराव याचे हातून व्हावयाची नाही यद्यपि जाले तरी तुमचे संकेता प्रमाणे बंदोबस्त करून देऊं काळजी करू नये याप्रो इंग्रज याचे वोलणे सरकारात येऊन कळविले नंतर माहुलीहून बाजीराव निघून गेले व स्वारी हि सातान्यास गेली नंतर आश्वीन मासी वद्य पक्षी लढाई एकादसीस जाली व आमावाश्येस सरकारची स्वारी वासोट्यास गेली ते वेळेस विठलपंत फडणीस याजकडून नरसू काकडा जामदार याणी जैतापुरास येऊन सांगितले की हा मार्ग कचा कळऊन जलदी काम होई ते करावे तेव्हा काकडे यास उत्तर केले की आमचा कारकून शामराव आसनी तेथे आहे मागाहून आह्मी जातो पूर्वीचे वोलण्याचा संकेत आहे च आणि आह्माकडील कारकून सूचनेस आहे व मी हि जातो या प्रो उत्तर सांगितले नंतर एक महिन्यानी वासोट्याहून मार्गसीर्ष मासी नारोपंत आपटे व यमाजी वनकर व शेकोजी खैरे येऊन स्वारी घेऊन लस्करात वाजीराव याचे गेले चंपाशष्टीचे दिवसी गार दौंडावर भेटी जाल्या त्या वेळेस आह्मी वाजीराव याचे लस्करात होतो लस्करात स्वारी असता दोन महिने स्वारीचे वो च होतो माघ मासी सोलापूरचे मुकामी इंग्रज वाहादूर याणी सातारा किला घेतला हे सोलापूरचे मुकामी ऐकिले व विठलपंत फडणीस याचे व इलफिस्तन साहेब वाहादूर याचे वोलणे जाले ते नरसू काकडे याणी सांगावयास सरकारात आले त्याजवरून आह्मास कळले पंधरा रोजाचे आंत इंग्रजानी करार केला की लस्करातून माहाराजाची स्वारी पंधरा रोजात घेऊन येतो या प्रो औकिले त्याजवरून कोणते वेळेस गर्दी होईल याचा नेम नाही सवव सावध राहावयाविसी सरकारची आज्ञा जाहाली होती इंग्रज वाहादूर याचे लस्करात निघोन जावयाचा वेत आमचा आहे तरी ज्या वेळेस समय दिसेल त्या वेळेस स्वारी जाईल तरी तुह्मी इकडे दृष्टी ठेऊन सावध आसावे या प्रो आज्ञा वुधवारचे रात्री माघ शुद्ध त्रयोदसीस सूचना केली नंतर चतुर्दसी मध्ये गेली नंतर माघ शुा १५ स समय पाहून स्वारी इंग्रजाचे लस्करात संकेता प्रो आली ते वेळेस पत्र सरकारचे पूर्वीचे संकेता प्रो लिहून वाळाजीपंत नातू याचे नावे जनरेल साहेव याजकडून रवाना करून दिल्हे

यादी ईंग्रज वाहादुर याची दोस्ती नरसु काकडे याचे विद्यमाने जाहाली त्याचा तपसील आह्मास सरकारची आज्ञा जाली की ईंग्रज वाहादुर याची दोस्ती करावी आणि विठलपंत फडणीस याचे विच्यारे कार्य करावे त्याजवरून आह्मी सदासिव भगवंत व वाळाजीपंत नातु याचेकडे जात होतो ते धोरण आह्मास

माहीत होते त्याजवरून येविसीचा मजकूर कर्तव्यतेचा पंत आमात्य याजपासीं बोलून त्याचे पत्र सदासिव भगवंत आलंद्याचे मु॥ होते त्यास पत्र घेतले व बरा- वर कारकून घेतला नंतर फडणीसास विचारून आलंदीस सदासिव भगवंत याज कडे गेलो त्यास पत्र दाखविले त्याचे आमचे बोलणे जाहाले नंतर सदासिव भग- वंत यास पुण्यास घेऊन गेलो नंतर बालाजीपंत नातु व वडे साहेब याचा शोध केला नातुकडील कारकून कृष्णाजीपंत याणी सांगितले कीं वडे साहेब याचा लस्करचा मुकाम आठपाडी नाजऱ्यावर आहे बालाजीपंत नातु येथे तेथे च आहेत त्याप्रो सांगितले नंतर आह्मास खरे वाटले नाहीं कृष्णाजीपंताची व आमची भेट करवावी ह्मणोन सदासिव भगवंत यास सांगितले त्याजवरून त्याणी कृष्णाजीपंताची आमची भेट करून दिल्ही त्याणी सांगितले की तुह्मी लस्करात जावे आणि आह्मास विचारिले की डाकेत तुह्मी आला ह्मणोन लिहून पाठवावे की काय त्याजवर आह्मी सांगितले की लिहून पाठवावे आह्मी लस्करात निघोन जातो नंतर दुसरे दिवसी कृष्णाजीपंत याणी वर्तमान सांगितले की लस्करचा मुकाम पुसेसावलीवर आला आहे तर तुह्मी जलदी करून जावे आमची वरदी डाकेतून पोचली तेव्हा आह्मी निघोन लस्करात जात होतो तो फडणीस याजकडून गडी जलदीने आला कीं सरकारची स्वारी सातारियास आली आहे तुह्मास बोलाविले आहे त्यांजवरून आह्मी साताऱ्यास आलो स्वारी निघोन गेली तेव्हा फडणीसाची भेट घेतली जाला मार त्यास सांगितला सदासिव भगवंत याची भेट फडणीसाची केली नंतर दोन रोजी वडेसाहेब याचा मुकाम पुलावर होता तेथे सदा- सिव भगवंत व मी गेलो तेथून लस्करचे कुच होऊन रहिमतपुरचे मुकामीं आले त्याजवरा आह्मी ही उभयता आलो नंतर सदासिव भगवंत याणी बालाजीपंत नातु याची भेट घेऊन वडेसाहेबाची भेट घेऊन आह्मास बोलवावयास आले नंतर आह्मी जाऊन बालाजीपंत नातु याची भेट घेतली आज शुक्रवारची रात्र आहे याजकरिता उदईक वडेसाहेब याची भेट करावी याप्रो बोलून आलो नंतर दुसरे दिवसी च्यार घटका दिवसास बालाजीपंत नातु याजकडे गेलो नंतर बालाजीपंत नातु वडे साहेब यास भेटीस आणितो ह्मणोन विचारावयास गेले तेव्हा दुसरे साहेब कर्नाटकातील येऊन त्याची भेट घेऊन नंतर भेट होईल ह्मणोन बालाजीपंत नातु याणी सांगितले नंतर बालाजीपंत नातूनी कचा मार आह्मास विचारून समजून घेतला आणि वडे साहेब यास समजावितो ह्मणजे बोलावयास श्रम पडणार नाही ह्मणोन बोलले नंतर वडे साहेब यास समजावयास गेले नंतर संध्याकालचे दोन घटका दिवसास आह्मास बोलाउ वडे साहेब याजकडील जासूद आला नंतर आह्मी वडे साहेब याजकडे गेलो नंतर सारी मंडली काढून वडे साहेब व मी दोघे च वसलो त्याणी विच्यारिले की तुह्मी बोलता या मसलतीत कोण आहे तेव्हा आह्मी सांगितले की विठलपंत फडणीस व दाजीबा उपाध्ये या प्रकर्णांत आहेत माने ही जावळीहून घेतले दाजिबा उपाध्ये कोठे आहेत ह्मणोन विच्यारिले वासोट्यास आहेत व विठलपंत फडणीस सातारियात

४

आहेत ह्मणोन सांगितले खासापो या राजकारणात कोण कोण आहेत ह्मणोन विच्यारिले तेंव्हा खासे माहाराज मात्र आहेत दुसरे बंधु व मातोश्री कोणी नाहीत ह्मणोन सांगितले माहाराजाचे वय किती असें विच्यारिले पंचविसाचे आंत ह्मणोन सांगितले नंतर माहुलीस स्वारी बाजीराव याची आली ते समईची खुणा विच्यारिल्या त्या ही सांगितल्या आणखी राजकारणात कोण आहेत तेंव्हा आह्मी सांगितले की रामभट व बलवंतराव चिटणीस व अंताजीपंत माहाजनी याप्रो आहेत तेंव्हा बडे साहेब याणी सांगितले की रामभट आह्माकडे आले नाहीत बलवंतराव चिटणीस बालाजीपंत नातु याचे विद्यमाने बोलत होते त्यास ते बाजीराव याजकडे चाकरी करीत होते या आंदेशाने त्या बोलण्यात मन घातले नाही व आंताजीपंत हि अह्माकडे आले नाहीत याप्रो मार विच्यारिल्यानंतर विच्यारिले की किल्यावर लोक व तोफा किती आहेत त्यास सांगितले की पाचच्यारशे सिबंदी आहे तोफा पंचवीस आहेत नंतर माहाराजाचे आप्त सोईरे सातान्यास कोणी आहेत किंवा नाहीत असे विच्यारिले त्यास आह्मी सांगितले की माहाराज याचे मामा व मेहुणे वगैरे आहेत हे किला माहाराजाचा राखतील की काये मी सांगितले की राखणे त्याचे हातून होणार नाही ह्मणोन सांगितले नंतर मी विच्यारिले की माहाराजाचा मनोदय आहे तुमची आमची दोस्ती करावी त्याजवर बडे साहेब बोलले की कुंभार राजा याचा बंदोबस्त करून दिल्हा आहे त्याप्रमाणे माहाराज याचा बंदोबस्त करून देऊ कुंभार राजे याचा बंदोबस्त करून दिल्हा आहे त्याची माहीतगारी आहे किंवा नाही आह्मी बोललो की माहितगारी नाही आणि मी बोललों की माहाराजाचा मनोदय आहे की आमचे पदरचे जे मंडल आहे ते आमचे आह्माजवळ आसावे तेंव्हा बडे साहेब बोलले की तुमचे पदरचे मंडल तुह्मापासी राहील तेंव्हा आह्मी उतर केले की माहाराजाचे राज्याचा बंदोबस्त करून द्यावा व पदरचे मंडलीचा बंदोबस्त करून द्यावा येविसी माहाराजाचे राज्याची व सरदेशमुखी वगैरेची माहितगारी सदासिव भगवंत याणी करून दिल्ही च आहे त्याजवर बडे साहेब याणी उत्तर केले की बंदोबस्त होईल ह्मणोन सांगितले नंतर माहाराजाकडे लस्करांत जाता की काय त्यास हुकुम जाला तरी जाऊ तेंव्हां बडे साहेब बोलले की तुह्मी माहाराजाकडे जाऊन जाला मार कळवावा आणि सांगावे जे जसी सवड फावेल तसे निघोन यावे आथवा तसी सवड न पडल्यास माहाराजानी येकस्थानी च यावे याप्रो मार त्याणी सांगितला व आणखी बोलले की तितके हि हून माहाराजास ईकडे येण्यास निघावयास सवड न पडली तर आह्मी आपणास आणावयाचा उद्योग करून आणितो आपण डरू नये आह्माकडील लोक येतील त्यास भिऊ नये आह्मी आपले लोकास सातारकर राजे ह्मणोन सांगितले असता उपद्रव करणार नाहीत आणि फिरंग ह्मणोन माहाराजाकडील लोकानी बोलावे याप्रो खुण सांगितली नंतर सातारियास फडणीस आहेत त्यास बोलाऊन आणितो ह्मणोन बोलिलो त्याणी काही उतर केले नाही आणखी बडे साहेब याणी सांगितले

श्री पंत आमात्य याजकडे प्रथम तुह्मी गेला किंवा तेच तुह्माकडे आले तें मी बोललो की मी च त्याचे घरी गेलो व सदाशिव भगवंत याचे गावास तुह्मी गेला किंवा ते च तुह्माकडे आले तेव्हा मी बोलिलो की आमात्य याचे पत्र घेऊन मी च त्याजकडे गेलो याप्रो बोलणी होऊन निरोप दिल्हा आणि सांगितले की जलद निघोन माहाराजाकडे जावे लस्करचा मुकाम सोलापुरास गेला नंतर बाळाजीपंत नातु याचे राहुटीस आलो त्याणी सांगितले तुह्मास खर्चास गरज असल्यास देतो नलगे ह्मणालो नंतर नातु यास सदासिव भगवंत याणी विच्यारिले की काकडे लस्करात जातात सातारियास कासीपंताची आटक फार त्यास कलले असता मागे मुलामाणसाची वाट काय तेव्हा नातूनी सांगितले की वडे साहेवानी सातारियास जावयाची मसलत केली आहे तुह्मी वायकामुलाची कालजी करू नये नंतर फडणीसास चिठी पाठविली येण्याची वाट पाहात होतो ते आले नाहीत याजकरिता हा मजकूर त्यास कळविला आणि मी निघोन माहाराजाकडे लस्करात गेलो वडे साहेब याचे कुच होऊन लस्करसुधा सातारियास आले नंतर किला सातान्याचा घेऊन भगवे निशाण लाविले नंतर जाते समई बालाजीपंत नातु याणी होईल मार तो कळवला येविसी विठु जासुद वो दिल्हा त्याजला घेऊन लस्करात माहाराजाकडे गेलो जाला मार बोलणी जाली ती व निघोन येण्याची माहाराजास कलविली नंतर माहाराजानी मार समजोन घेउन उतर केले की निघोन येण्याचे तुह्मी ठर-विले त्याप्रो येतो ते जाले आणि येकटे च येण्याची संधी पडली तर तसे निघोन येतो आणि माहाराजानी आज्ञा केली की रात्री निघोन यावे किंवा दिवसा निघोन यावे तेव्हा विनंती केली की जसी संध्धी पडेल तसे निघोन यावे याप्रो विनंती करून पुन्हा येविसीचा मार ठरला तो वडे साहेव यास कलवावा ह्मणोन सर-कारची आज्ञा जाहाली त्याजवर वडे साहेवयास समजावयास निघोन पंढरीस आलो तेथे वातमी लागली की स्वारी इंग्रजाचे लस्करात संकेताप्रो अली त्याज-वरून पुन्हा सरकारची लस्करात भेट घेऊन आज्ञा होईल त्याप्रो आलपिस्टन यास मार सांगावयास्तव लस्करात आलो तेव्हा भेट होऊन माहाराजास विनंती केली की पुन्हा आज्ञा जाल्यास स्वारी लस्करात अली ह्मणोन कलविन त्याजवरून सरकारची आज्ञा जाली की तुह्मी संकेत सांगितल्या प्रो आह्मी जर्नेल याचे लस्क-रात आलो च आहो येविसीचे पत्र बालाजीपंत नातु यास पाठविले च आहे आता तुमची व आमची भेट येक वेला च होईल आता तुह्मी वेगले वडे साहेव याजकडे जावयास नलगे याप्रो आज्ञा जाली त्याजवरून आह्मी सरकारचे स्वारी बो होतो

यादी विठलपंत फडणीस याचे विद्यमाने इंग्रज बाहादुर याची दोस्ती जाली त्याचा तपसील साताार मुा माघमासी वडे साहेब याजकडील फौज व तोफा पहिले दिवसी सातान्यास येऊन रविवारपेठेतून माघारे गेले नंतर दुसरे दिवसी

मंगलवारी फौज सुधा कुच करून करंज्यावर मुकामाचे डेरे दिल्हे आणि फौज साताऱ्यात अली तेव्हा आह्मी रयतेस सामोरे जाणे ह्मणोन सांगोन रयत भेटीस लाऊन दिल्ही तेव्हा त्याणी रयतेस दिलदिलासा देऊन स्वस्थ असावे ह्मणोन सांगितले नंतर किला घेतला आणि साहेब लोक दुसरे रोजी किला पाहावयास गेले ते वेलेस सरकारचा हुजऱ्या पेठेने जात होता त्यास सांगितले की माहाराजा-कडील कारभारी व फडणीस व लोक जुने असेतील त्यास घेऊन यावे त्याजवरून डोंब्या याणी येऊन आह्मास सांगितले नंतर डोंबे यास सांगितले की तुह्मी जाऊन सांगावे की आपला जासूद आला ह्मणजे फडणीस येतील नंतर वडे साहेब याज-कडील जासूद आह्मास बोलावयास आला मग आह्मी लस्करात जाऊन वडे साहेबाची भेट घेतली ते समई वडे साहेब याणी विच्यारिले की माहाराजाकडील मंडळी येथे कोण कोण आहे तेव्हां आह्मी सांगितले की मराठमंडळी व शागीर्द-पेशा थोडे वहुत आहेत नंतर त्यास भेटावयास वोलवावे ह्मणोन सांगितले त्याज-वरून मराठे मानकरी व कारकून व शागीर्द पेशा यास नेऊन भेटविले त्याणी वस्त्रे देऊन वहुमान केला आणि पूर्वीचा मजकूर वाजीराव प्रकर्णी वसईपासून गंगाधरशास्त्री मारला व विघाड जाला त्यासुधा कचा मार सांगितला आणि करार केला की आता बाजीराव यासी तह कदापि व्हावयाचा नाही व राजे साहेब या उपरी वाजीराव याचे प्रतिवंधात राहावयाचे नाही येक महिन्यात राजे साहेब यास सातारियास घेऊन येऊ कालजी करू नये व काही राज्य देऊ त्यात हुकुम राजे साहेब करितील हे सर्वास कलवावे ह्मणोन किला घेऊन किल्यावर झेंडा कंपिणी सरकारचा लाविला आणि दस्तुराप्रो येकवीस तोफा केल्या पुन्हा भगवा झेंडा राजे साहेब याचा कायम करून तुह्मीं शेहरचा वंदोवस्त करावा आणि जुने लोक आहेत त्यास येक महिन्याचे खर्चाचा यैवज द्यावा त्यास उतर केले की माहाराजास आणावे तोपर्यंत खर्चास देऊ नये त्याचा आग्रह पडला की तुह्मी खर्चास दिल्याखेरीज तुह्माजवल माणसे कसी जमा होतील खर्चास दिल्हे ह्मणजे माणसे सर्व तुह्मापासी जमा होतील पुढे राजे साहेव आल्यावर ते तुह्मास खर्चास देतील हे सांगोन खर्चास दिल्हे नंतर निघोन कुच करून सालप्याचा घाट उतरून गेले तो शहरात कोणी सिपाई नाही ह्मणोन मनात शंका अली की आमचे प्राणाचा वच्याव कसा होतो हा आंदेशा मनात आणुन सालप्यास वडे साहेब याचां भेट घेऊन मजकूर सांगितला नंतर त्याणी च्यारशे लोक ठेवावयास सांगोन पाच हजार रुो खर्चास देविले आणि निरोप देऊन दाहा स्वार रात्रौ देऊन पिंपोडे येथे पोचऊन दिल्हे मग साताऱ्यास येऊन लोक ठेऊन शहरचा वंदोवस्त केला पुढे दाहा वारा रोजात माहाराज जनरेल साहेब याचे लस्करात आल्याचे वर्तमान कलले

यादी ईंग्रज कंपिणी वाहादुर याचे लस्करात इकडून वोलणार नरसू काकडे पाठविले होते त्याणी येऊन समजाविले की ईंग्रजाच लस्करात वनेल त्या तऱ्हेने

घेऊन वासोट्या किल्यास जाऊन वासोटा सर करून मंडळी सुधा सातारियास आलो समारंभाने त्याणी समागमे येऊन शहरचे वाड्यात पोहोचऊन तोफा करऊन निरोप घेऊन गेले येक दोन दिवसी परस्परे मेजवानी बहुमान होऊन निरोप घेऊन पुणियास गेले

हकीकत बापू कान्हो याची चतरसिंग राजे जेष्ट शु॥ ५ माहुलीहून फौज सुधा मजल दर मजल पैठणावरून व जालनापुराहून सिंदखेडास दाखल जाहाले दुसरे दिवसी बापू कान्हो फडणीस व व्यासराव गोपाळ डबीर दौलतराव सिंदे याजकडे सिंदे याचा मुकाम अजंठ्या घाटावर होता तेथे सर्जेराव घाटगे यास भेटोन सिंदे याची भेट घेतली त्यास कचा मार समजाविला उतर केले की राजे यास फौज सुधा घेऊन येणे त्यांचा बंदोबस्त होईल राजे आल्यानंतर मेजवानी सिंदे याणी केली काही दिवस तेथे राहून नंतर शेनासाहेब सुभे रघोजी भो याची भेट घेतली त्याणी मेजवानी बहुमान केला तेथे दोन महिने राहून होलकर याजकडे राजे गेले तेथे तट बोलण्याचा पडला तेथून लाहूरास गेले समागमे जगदेवराव जाधव होते तेथे लिक साहेब ईग्रज बाहादुर याचा कोणी बोलणार अजमेरीचे मुकामी आला नंतर बापू फडणीस व डबीर रा केले आणि राजे जैपुरास आले त्यास जैपुरवाले याणी सातारप्रकर्ण वीशांवल विचारिल्याप्रो सांगितली नंतर हरसुकराव जैन मातवर साहुकर दिलीत होता त्याचे वियमाने लिकसाहेब व मलक साहेब इंग्रज बाहादुर याची भेट होऊन परस्परे बोलणी सातारप्रकर्णी जाहाली त्याणी उतर केले की हाली बाजीराव याचा आमचा तह जाला आहे त्यास बिघाड कर्णे तो कलकत्यास लिहून पाठऊ तेथील मसलतीने ठरविले पाहिजे व तुह्माकडील कोणी जाणार असल्यास पाठवावा ह्मणोन सांगितले त्यास खर्चाची आडचण होती जाणे जाहाले नाही नंतर राजे याजकडे आलो राजे याजबा गुजराथीत आलो नंतर डेगले मालेगावी होते तेथे आलो त्याणी नजरबंद केले

यादी पेशजी स्वारी सातान्यास आली ते समई बाळाजी नारायण नातू यास यादी दाखविल्या त्याचा तपसील बेरीज रुपये ११५९०८१

---

सरकारी कलम

तहवेल

| | |
|---|---|
| १ पोषाख | १ अतर |
| १ खासे नाहाण | १ पाणी उदवावयास |
| १ हतास लावावयास | १ द्रिष्टीस |
| १ शेगडीस | १ मुदबक |

१ सलवतखाना
१ कारखाना
१ फरासखाना
१ वायका व पोर्गे
१ उष्टरखाना
१ इस्ताहा कोठी
१ नगारखाना
१ पीलखाना
१ इमारत
१ आवदारखाना
१ तालीमखाना
१ मर्जीखास

१ खारे
१ गुरांवा
१ खर्ची
१ लवणशाळ

८ ———

१ जिराईतखाना
१ रथखाना
१ बकरी दसरा वगैरे
१ भिक (डी?) खाना
१ लकडखाना
१ भटी
१ सिकारखाना
१ पागा उतम मध्यम कनिष्ट

० ———

———

८ ———

खेरीज मु॥

धर्मादाव

१ सिष्ट ब्राम्हण
१ देवदर्शन
१ नागपंचमी
१ कार्तिकी पौर्णिमा

१ वैशाखी पौर्णिमा
१ श्रीस्वामी चाफल
२ देव किले सातारा
१ वटसावित्री
१ हरतालिका
१ वामनद्वादसी
१ धनुर्मास
१ रथसप्तमी
१ वसंतपूजा

१ भिकारी
१ आपाढी येकादसी
१ श्रावणी
१ चंपाशष्टी
१ सिधे खर्च आा १००
१ गोप्रदान
१ नित्यदान व्यतिपात
१ सोमवती
१ श्रावणमास
१ माहालक्ष्मीदोरे
१ आकाशदीप
१ माघीपौर्णिमा
१ तुळसीचे लग्न
१ अवलीभोजन

१ जेष्ठागौरी
१ दरमाहा पौर्णिमा
१ अनुष्ठान नेहमी व श्रावण
१ वर्षप्रतिपदा
१ त्रेंदावने

१ शाहुमाहाराज
१ रामराजे
१ शाहुमहाराज
१ आई साहेब
१ बया साहेब
१ शाहाजीराजे

१ कावडी माहादेव
१ संक्रांत
१ सिवरात्र
१ अक्षतृतीया
१ वर्षासने
१ श्राधखर्च
१ उछाव
१ गोकुलाष्टमी
१ गणेशचतुर्थी
१ नवरात्र
१ रामनवमी
पुण्यतिथ्य माघ

---

१ नाव माहुली
१ चैत्रीपौर्णिमा

देवस्थाने

१ देवधर
१ गणपती जकातवाडी
१ विठोबा शहरातील
१ यवतेश्वर
१ नरसिंव्ह
१ खंडेराव जेजुरी
१ ह्मसकोबावीर
१ शंभुमाहादेव
१ खंडेराव पाली

१ गणपती मंत्री
१ फाडजाई
१ गणपती चिमणपुरे
१ कृष्णेश्वर
१ हनुमंत जरंडा

१ कृष्णवेणी
१ भार्गवराम माहुली
१ रामदासस्वामी परली
१ आंबा प्रतापगड
१ माहालक्ष्मी करवीर
१ आंबा तुलजापूर
१ देव चिंचवड
१ यमाई आउध
१ विठोबा माहुली
१ रेवणसिद्ध
१ विष्णु गोटरामाऊ
१ लक्ष्मीनारायण
१ कोटेश्वर
१ माभलेश्वर

---

## देवस्थाने

१ पोवई पाण्याची
१ द्वादशी ब्राह्मण
१ किरकोळ धर्मादाय
१ कृष्णास्नान
१ यात्राखर्च
१ देहनगी खर्च
१ आहेरखर्च
१ मजुरीखर्च
१ इनामखर्च
१ सत्का खर्च
१ तैवज खर्च
१ रोशनाई खर्च
१ दसरीखर्च

१ शांताश्रमस्वामी
१ पुराणीक
१ ग्रहणखर्च
१ नहरदागदोजी
१ नेहमी ब्राह्मणभोजन
१ दसराखर्च
१ दिपवाळी खर्च
१ वोवाळणी खर्च
१ खैरात खर्च
१ पोटखर्च मजुरीमाणसे वगैरे
१ वाजेखर्च
१ कावडीमहादेव
१ बक्षीसखर्च

---

## वा मुा

१ सर कारकून
१ आश्रित
१ हुजरे
१ निा पोते
  १ कारकून
  १ जामदार
  १ सोनार
  १ पारखणार

---

१ भाट
१ चोपदार
१ भालदार
१ सिंगाडे
१ कर्णेकरी
१ शस्त्रवैद्य
१ बळवार
१ रक्तवान

१ कारकून
१ सोईरे लोक
१ भोसले
१ निा जामदारखाना
  १ कारकून
  १ जामदार
  १ सिंपी
  १ परीट
१ पिंजारी
१ पटवेगार
१ रफुगार
१ रंगारी
१ हिराकस

---

१ खासबारदार
१ सितारी
१ आबदागिरे

१ जेजाल वारदार
१ माली फुलारी
१ चेलेवारगीर
१ निाा सिकारखाना
१ रथखाना
१ इस्तादकोठी
१ आडेकरी
१ जासूद
१ गवई
१ वाजंत्री
१ दिवव्ये
१ बारगीर
१ भोई
१ कोठी
१ इमारत सुतारगौंडी वगैरे
१ गोंधली
१ खिलारी
१ देवपुजे
१ नळकरी
१ नावाडी माहुली
१ इटेकरी
१ वेरड
१ ढालाईत
१ खाटीक
१ आतार
१ तांबोली

१ फुट लोक
१ पागा
१ लोक जिलिबी
१ मृदगी
१ भस्तीसाज
१ मिनेगार
१ लकडवाले

१ राजमाहाल नोपटी ( ? )
१ घड्याळची
१ हुकेवारदार
१ निसवत सरकारी जिराईतखाना
१ कोरखाना
१ कुरणे
१ मुदबखी
१ सल्ह ( ? ) तखाना
१ गुणीजन कलवंत
१ कासीद
१ सदर बारगीर
१ हलालखोर
१ आबदार
१ फरास
१ डवरेगोसावी
१ बुढे
१ थटी
१ कासारमणेर
१ वैद्य
१ बाणदार
१ हलगेवाले
१ होलार
१ दारुवाले
१ मुलाणा
१ तालीमखाना
१ बागवान
१ मोदी
१ कलमदाने
१ सिकेकटार
१ सारंगीवाले
१ तांबट
१ गोलंदाज
१ माजी गडकरी
१ तिरंदाज

१ देवरुषी

१ तोफखाना

१ सिलेदार

वाा मुाा

याप्रो सरकारी यादी खासगीचे वंदोवस्ताची दिल्ही होती खेरीज दौलतीचा वंदोवस्त आलाहिदा होता

याप्रो मातुश्री माईसाहेव याची सरकारचे पटात आहेत त्याप्रो कलमे त्याचा तो पटावो रुा २००००० 

पो वेरीजे खेरीज कमी कलमे तो

तहवेल

१ पाणी उदवावयास

१ लवणशाख

१ नगारखाना

१ तालीमखाना

१ हतास लावावयास अवीर

१ भिंडीखाना

१ लकडखाना

१ मर्जीस्तव

खेरीज मुाा

१ नागपंचमी

१ चंपाशष्टी

१ देव किले सातारा

१ आकाशदीप

१ दरमाहा पौर्णिमा

१ वृंदावने

१ श्राद्धखर्च

१ नाव माहुली

१ पोवई

१ नहरदागदोजी

१ इनामखर्च

१ नवस खर्च

१ श्रावणी

१ स्वामी चाफलकर

१ सोमवती

१ तुलसीलग्न

१ कानडीशंभुमाहादेव

१ देवस्थाने देवघर खेर

१ उछाह खर्च

१ चैत्रीपौर्णिमा

१ शांताश्रमस्वामी

१ यात्राखर्च

१ पोटखर्च

१ माहादेव बावा वडग १७८२

वाा मुाा

१ सरकारकून

१ शस्त्रवैद्य

१ चितारी

१ राजमाहाल

१ भाट

१ बलवार

१ जेजाल वारदार

१ चेले वारगीर

१ हुके वारदार
१ वाजंत्री
१ बारगीर
१ गोंधळी
१ नावाडी माहुली
१ होलार
१ दारुवाले
१ तांबोली
१ फुट लोक
१ निा पागा
१ सिकेकटार
१ भस्तीसाज
१ मिनेगार
१ लकडवाले
१ माजी गडकरी
१ तिरंदाज
१ सिलेदारस्वार
१ कुरणे
१ कासीद
१ डवरे गोसावी
१ नळकरी
१ वेरड
१ ढालाईत
१ अतार
१ वागवान
१ मोदी
१ कलमदाने
१ सारंगावाले
१ तांवट
१ गोलंदाज
१ खराती
१ देवरुषी
१ तोफखाना
१ लंग

---

चिरंजीव भाऊसाहेब व आपासाहेब यांची वेरीज दर ६००००० प्रो रुा १२०००००

पट पाौ वेरीजेखेरीज सरकारचे पटात ज्याजती कलमे आहेत आणि उभयताकडे कलमे नाहींत ती तपसीलवार — कलमे

तहवेल

१ पाणी उदवावयास
१ लवंग शाख
१ लकडखाना
१ तिरंदाजी
१ हतास लावावयास अवीर
१ नगारखाना
१ मर्जास्तव

---

१ नागपंचमी
१ स्वामी चापलकर
१ सोमवती
१ दरमाह पौर्णिमा
१ वृंदावने माहुली
१ देवस्थाने देवघर व कृष्णावेणा खेरीज करून
१ नाव माहुली
१ पोवई पाय्यांची
१ नरहर दारोजी
१ चंपाशष्ठी
१ देवकिले
१ आकाशदीप
१ कावडी शंभु महादेव
१ कृष्णावेणा
१ श्राधखर्च
१ उछाहखर्च
१ चैत्री पौर्णिमा
१ शांताश्रमस्वामी
१ यात्राखर्च

१ इनामखर्च
१ नवस खर्च

१ पोष्टखर्च मजुरी माणसे
१ माहादेवबावा वडगांवकर

वा मुा

१ सरकारकून
१ भाट
१ शस्त्रवैद्य
१ वलवार
१ जेजाल वारदार
१ चेले वारगीर
१ कुरणे
१ कासीद
१ निा कोठी
१ गोंधली
१ नावाडी माहुली
१ होलार
१ दारुवाले
१ तांबोली
१ मोदी
१ पागा
१ तांबट
१ गोलंदाज
१ खराती
१ देवरुषी

निा जमादारखाना
१ हिराकस
१ रंगारी

२

१ चितारी
१ माल
१ सिकेकटार
१ वाजंत्री
१ वारगीर
१ डवरे गोसावी
१ नळकरी
१ वेरड
१ ढालाईत
१ अतार
१ वागवान
१ फुटलोक
१ भस्तीसाज
१ मीनेगार
१ लकडवाले
१ माजीगडकरी
१ निा तोफखाना

सदरहू व्हावयाची नाहीत ह्मणोन ग्राट बाहादुर व बाळाजी नारायण नातू, याणी सांगितले सबब तूर्त राहिली

नंतर खाजगीची नेमणूक दिल्ही ते वेरीज दरमहा कों

२६००० प्रथम दरमहा देत गेले ते
७३३३ ।. दुसऱ्याने दोन वर्षांनी दिल्हे ते

३३३३३ ।.
ग्रो दरमाही वेरीज रुा

# कांहीं अपरिचित अशीं अधिकारवाचक उपनांवें

१ देशमुख, देशपांडे, पाटील, कुलकर्णी, देसाई, सरदेसाई हीं आडनांवें अधिकारावरून पडलीं आहेत. त्याप्रमाणें च मुजुमदार, कोतवाल, अधिकारी (अपभ्रष्टरूप 'अतकरी') जकाते, खोत, जोशी, धर्माधिकारी, उपाध्ये, पाध्ये, चौधरी, सबनीस, पोतनीस, पोतदार, चिटणीस, फडणीस, कारखाननीस वगैरे आडनांवें हि त्या त्या अधिकारावरून किंवा वृत्तीवरून पडलीं आहेत. पण दुसरीं अशीं कांहीं अधिकारदर्शक उपनांवें आहेत कीं, त्यांचा मूळ अर्थ आतां अपरिचित असा भासतो. पूर्वी एका काळीं तो मूळ अर्थ अगदीं परिचित होता. हीं अपरिचित अर्थाचीं अधिकारवाचक आडनांवे कोणतीं तें पाहूं:—

(१) **डांगी, डांग्या, डांगे**—हें आडनांव देशस्थांत व देवरुखे ब्राह्मणांत आहे. डांगी, डांग्या=पतकीच्या हाताखालचा जकाती कारकून.

(२) **पतकी, पतक्या**—हें उपनाम गौड ब्राह्मणांमध्ये व क्वचित् कायस्थांत हि आहे. देशस्थांमध्ये हि ऐकूं येतें. पतकी, पतक्या=जकातीकडील एक वतनदार कामगार.

(३) **पानसऱ्या, पानसरे**—हा हि जकातीकडील वतनदार कामगार, देशस्थांमध्यें हें आडनांव आहे.

(४) **कानगो**—हा कुळकर्ण्यासारखा अधिकारी मध्यहिंदुस्थानांत असतो. उत्तरमहाराष्ट्रांत हि आढळतो. सदाशिव पेठेंतील 'कानगो' ची बाग पुष्कळांस माहीत असेल. 'कानगो' हें आडनांव यजुर्वेदी देशस्थांत आहे. 'कानगो'=' कानु-गो' याचा मूळ अर्थ 'कायदा जाणणारा' असा आहे.

(५) **वर्तक, महाजन**—हीं आडनांवें कोंकणांतील गावांत चित्पावनांचीं क्वचित् कराड्यांचीं आहेत. 'महाजन,' महाजनी'–हे गांवांतील मुख्य, यांचें काम उदमी लोकांपासून कर वसूल करण्याचें हि असे. वर्तक-हे गांवकीचे हुकूम अमलांत आणणारे, लोकांस गांवकीच्या ठरावाप्रमाणें वर्तविणारे कामगार होते.

(६) **औटी, औटे, अवटी, अवटे**—हें आडनांव ब्राह्मणांत व मराठ्यांत हि असतें. याचें काम कसब्यांतील अगर शहरांतील मापें बरोबर आहेत कीं नाहींत हें तपासण्याचें. अंबरखान्यावरील मापाड्यास हि 'अवटी'

हा हुद्दा असे. प्रसिद्ध ' नानावटी ' सावकार प्रथम कोठें तरी अवटीचे ह्मणज मापाड्याचें काम करीत असला पाहिजे.

(७) शेवडे, शेवडा—भाजीपाला, फळफळावळ यांवर कर घेतात त्यास ' शेव ' ह्मणतात. ' शेव ' वसूल करणारा तो ' शेवडा.' ' शेवडे ' हें आडनांव चित्पावन व देवरुखे या ब्राह्मणजातींत आढळतें. तसें च तें देशस्थांमध्यें, कराड्यांत व मराठ्यांत हि आढळतें. ' शेवडे ' याचा अर्थ कोणी ' शेवटे ' ह्मणजे शेवट घर आहे ज्यांचें असा करितात; पण तो योग्य दिसत नाहीं.

(८) घाटपांडे, घाटपांड्या—घाटामध्यें जकात घेणारा कामगार.

(९) प्रभु—हें आडनांव कराडे ब्राह्मणांत व गौडांमध्यें प्रचलित आहे. हरचेरी नजीक रत्नागिरी येथील ' विठ्ठलप्रभु ' कराडे. हे त्या प्रांतांत फार प्रसिद्ध पुरुष होते. अजगांवचे प्रभु, वांयगणींचे प्रभु हीं घराणीं गौडांमध्यें आहेत. गोमांतकांत ' शावा प्रभु ' हे मोठे सावकार आहेत ह्मणून समजतें, ते ही गौड च होत. ' प्रभु ' यजुःशाखीय ब्राह्मणांत हि आहेत. पृष्ठ ३१६ ते ३१८ भा. इ. सं. मं वार्षिक वृत्त शके १८३५ चें पाहावें. तेथें अनंतभट व बाळंभट प्रभु, लक्ष्मणभट प्रभु नाशिकच्या सुंदरनारायणाचे पुजारी, शाखा वाजसनीय यांस पेशव्यांची सनद आहे. याप्रमाणें देवरुखे ऊर्फ देवऋषी ब्राह्मणांमध्यें हि ' प्रभु ' हें आडनांव आहे. राजश्री भिकाजी मोरेश्वर मांडुसकर, पुणें, याजपाशीं शके १५०५ मधील पत्राची नक्कल आहे त्यांत पुढील लेख आहे. " महाभाग्योदय राजमान्य गणेश प्रभु भडसावळे, तथा हरदेव प्रभु तेरे, तथा विश्वनाथ प्रभु चाफेकर, तथा बाळ प्रभु खालगांवकर " इ. या लेखावरून देवरुख्यांमध्यें हि ' प्रभु ' हें आडनांव आहे असें सिद्ध होतें. ' प्रभु ' ह्मणजे मुख्याधिकारी असा अर्थ दिसतो. मात्र तो अधिकार काय होता किंवा आहे ते नक्की आज सांगतां येत नाहीं. एका गौड ब्राह्मणानें सांगितलें कीं, गांवच्या देवासंबंधीं पूजाउत्सवादि सर्व मुख्य अधिकार ह्म० ' प्रभुत्व ' आमच्याकडे, ह्मणून आह्मांस ' प्रभु ' ह्मणतात. हा अधिकार नक्की काय होता याबद्दल मी शोध करीत आहे. पण पाटीलकुलकर्णी अगर देशमुखदेशपांडे यांच्या अधिकाराप्रमाणें हा कांहीं तरी मोठा अधिकार असावा. वर दाखविल्याप्रमाणें जसा हा अधिकार ४ ब्राह्मणजातींत होता, त्याप्रमाणें च तो मावळांत व उत्तर-कोंकणांत ह्मणजे महाडखाडीपासून उत्तरेकडे कायस्थांकडे हि होता. त्यावरून प्रथम हीं कायस्थांचीं घराणीं आपणांस ' प्रभु ' ह्मणवूं लागलीं. वर देवरुखे ब्राह्मणांचीं आडनांवें दिलीं आहेत तशीं च कायस्थांचीं हि लिहिलेलीं आढळतात. उ० त्रिंबक प्रभु, जनाजी प्रभु, गणेश प्रभु, बाळा प्रभु, इ० ( रा० राजवाड्यांचा खंड २० लेखांक १९९ पहावा. ) पण पुढें पुढें त्यांच्या ह्या घराण्यांचीं संख्या इतकी वाढली कीं 'प्रभु' हें आडनांव ह्मणजे

घराण्याचें नांव एकीकडे राहून तें जातिवाचक नांव झालें, व पुढें सर्व कायस्थांस 'प्रभु' असें ह्मणूं लागले. इतर जातींमध्यें तें घराण्याचें नांव ह्मणजे आडनांव किंवा कुलनाम च कायम राहिलें. पण कायस्थामध्यें मात्र तें जातिदर्शक नाम झालें. असें दिसतें. 'प्रभु' याचें 'परभू' असें अपभ्रष्टरूप अर्थात अज्ञ जनांनीं परिपाठांत आणिलें. ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मणांमध्यें 'प्रभु' हें उपनाम ऐकिवांत नाहीं; पण 'प्रभुणें' हें उपनाम त्यांच्यामध्यें प्रसिद्ध आहे. रामशास्त्री प्रभुणे कोणास माहीत नाहींत ? प्रभुणे' हें प्रभु याचें च रूपांतर आहे काय ? प्रभु' या शब्दाचें अपभ्रष्ट रूप 'परव' असें होऊन तें आडनांव गौडब्राह्मणांमध्यें व मराठ्यांमध्यें हि आढळतें. मुंबईचे कै. काशिनाथ पांडुरंग परव पुष्कळांस माहीत आहेत. चित्पावनांमध्यें प्रभु, प्रभुणे किंवा परव हें आडनांव असल्याचें आढळांत नाहीं.

का. ना. साने.

---

## मराठ्यांनीं इतर प्रांतांतील लोकांच्या रितीभातीवरून किंवा स्वभावावरून साधिलेलीं निन्दात्मक किंवा उपहासात्मक अशीं कांहीं नामें आणि विशेषणें.

१ **वराडीः**—वऱ्हाड किंवा वराड प्रांतांतील लोक खाण्यापिण्याविषयीं चोखाळ नसतात. त्यांस जाडेंभरडें, कच्चेंपक्कें, कसलें हि अन्न असलें तरी चालतें खेरीज ते खातात हि पुष्कळ. यावरून कच्चेंपक्के, जाडेंभरडें न पाहणारा, किंवा अधाशी, खादाड अशा माणसास वराडी ह्मणतात.

**काठेवाडीः**—काठेवाडांतील लोक उंच व सडपातळ असतात यावरून उंच पण किडकिडीत, रोड, अशा पुरुषास काठेवाडी ह्मणतात. ह्या ह्मणण्यांत थोडी उपहासाची छटा आहे. सडपातळ घोड्यास हि हें विशेषण लावितात.

**सोरट, सोरटभाईः**—सौराष्ट्र प्रांतांतील लोक त्यांस सोरटी ह्मणतात. हे लोक स्वभावतः दांड असून लबाड हि असावे. त्यावरून दांडगा व लबाड, अट्टल सोदा, आशा मनुष्यास सोरट ह्मणण्याचा प्रघात पडला.

४ **हेंगाडाः**—'हेंकसू' ( ह्मणजे स्त्री ) ह्या कानडी शब्दापासून हेंगाडा शब्द व्युत्पादितात. कदाचित् 'हेंग' हा शब्द कानडी लोकांच्या संभाषणांत फार येतो, त्यावरून हि 'हेंगाडा' हा शब्द साधिला असेल. कानडी पुरुषांस विशेषतः कानडी बायकांस मराठी भाषा चांगली समजत नाहीं त्यावरून मराठे लोक त्यांस अडमुठे, अडाणी असें समजतात. त्यावरून, अडमुठ्या, ज्याची समजूत लौकर पडत नाहीं अशा माणसास हेंगाडा ह्मणतात.

**५ शामाट्या:**—शामाटे हा गुजराथी शब्द आहे. त्याचा अर्थ 'कशा-करितां'! असा आहे. ज्या गुजराथी लोकांस मराठी समजत नाहीं, ते मराठ्यांशीं व्यवहार करितांना, त्यांच्या तोंडीं 'शामाटे'! कशाकरितां हा शब्द पुष्कळदां येतो. त्यावरून प्रथम शामाट्या हा शब्द मराठी न समजणाऱ्या गुजराथ्यांस निंदेनें किंवा निर्भत्सनेनें मराठे लोक लावूं लागले. पुढें शामाट्या यांचा अर्थ, अजाण, अडमुठ्या, घेलाड असा झाला.

**६ मारवाडी:**—मारवाडांतील वाणी महाराष्ट्रांत वसूं लागले. त्यांचा द्रव्य-लोभ अतिशय. यावरून, द्रव्यलोभी, छदाम हि न सोडणारा, कद्रू, चिक्कू, आंतल्या गांठीचा, अशा पुरुषास '**मारवाडी**' असें म्हणण्याचा प्रघात पडला.

'**सराफ**' शब्द अरबी आहे. त्याचा हि या अर्थी विनियोग करतात. दोन्ही शब्द निंदाव्यंजक आहेत.

**७ रांगडा:**—माळव्यांतील हिंदूंस रांगडे म्हणतात. त्यांची भाषा मराठे लोकांस नीट समजत नाहीं. त्यावरून अनाडी, हेंगाडा असा '**रांगडा**' शब्दाचा अर्थ प्रचलित झाला. लहान मुलें बोबडें बोलतात, काय बोलतात तें समजत हि नाहीं; त्यांच्या त्या भाषेस कौतुकानें, ही रांगडी बोली असें वडील माणसें म्हणतात.

**८ तेलंगा:**—तैलंग ब्राह्मण न बोलावितां आपण होऊन महाराष्ट्र ब्राह्मणांकडे भोजनास जात असत. त्यावरून असें अनाहूतपणें काम करणारास किंवा हट्ट धरून धरणें घेणारास, 'घेतल्या विगर जाईना', अशा माणसास **तेलंगा** असें संबोधूं लागले.

**९ बेंगरूळ:**—बेंगळूर या शहराचें व परगण्याचें नांव, अक्षरव्यत्यास करून, 'बेंगरूळ' असें मराठ्यांनीं उच्चारिलें व लिहिलें. जुन्या मराठी लेखांत 'बेंगरूळ' असें च नांव येतें, 'बेंगळूर' असें येत नाहीं. बेंगरूळ प्रांतांतील कानडी लोक मराठी भाषा समजल्यामुळें मराठे लोकांमध्यें बावळ्यासारखे वागत. त्यावरून बावळा, वेडसर, गलतान अशा माणसास **बेंगरूळ** म्हणण्याचा प्रघात पडला असावा.

**१० पेद्रू:**—पोर्तुगीज लोकांत 'पेद्रो' हें विशेषनाम पुष्कळ पुरुषांचें असतें. निदान मराठ्यांशीं ज्यांचा संबंध आला, अशा पोर्तुगीज लोकांमध्यें तरी हें नांव बऱ्याच व्यक्तींचें असावें; व त्यावरून पेद्रो, पेद्रू हें नांव पोर्तुगीज लोकांस गैरसमजानें मराठ्यांनीं दिलें. पुढें पोर्तुगीज लोकांस मराठ्यांनीं जिंकून त्यांपासून साष्टी, वसई प्रांत सोडविले. त्यावरून अशूर, कमकुवत, बेहिम्मती असा अर्थ पेद्रू शब्दांत आला असावा.

**का. ना. साने**

---

# दृष्टांत कविकृत दृष्टांत-प्रबोध

हा कवि मानभव आहे. अद्वैतमतखंडणाचा मोठा आव घालून यानें **दृष्टांत-प्रबोध** नांवाचा एक ग्रंथ केला आहे. ग्रंथाचे प्रसंग सात असून एकंदर ओवी ४१७ आहे. या **दृष्टांतानें** आपल्या गुरूचा व काळाचा चुकून सुद्धां कोठें उल्लेख केलेला नाहीं, हें त्याच्या मानभवीपणाला योग्य च आहे. भाषा नाथकालीन आहे. ग्रंथांतील कांहीं उतारे पुढें देतोः—

......ज्ञानाचार्यासिरोमणी नमीन दत्तात्रयो ॥ ११ ॥
......जो प्रसन्न जाला शंकराचार्या । दशनाम संन्यास प्रतिष्ठुनियां । सरता केला ॥ १२ ॥

ज्यानें परशरामासी भेटी दिली । रेणुका मूळपीठीं स्थापिली । अळर्काचे सांप नासीले......

याप्रमाणें दत्तात्रयाची स्तुति करून **दृष्टात** म्हणतोः—
तुमच्या कृपेनें ज्ञानअज्ञानभेद सांगेन ॥ १६ ॥

**लीळासंवादांत** एके ठिकाणीं असें आलें आहे कीं:—

स्वर्गीचे चंद्र सुरीयो देव नव्हेति॰
क्षीराब्धीचा सेषसैय्या देव नव्हे॰
देव तो चक्रदेव॰
चक्रदेव मोचक. इतर देव अमोचक॰

ही च विचारसरणी या हि ग्रंथांत दिसून येत्ये. **दृष्टांत** हा, ब्रह्मज्ञानाचा गड्डा काय तो आपल्या च हातीं लागला असून इतर सर्व मूर्ख आहेत अशा गर्वानें खालील उद्गार काढतोः—

स्वर्गीं बृहस्पतीसारिखा पंडित । परि नेणे ब्रह्मज्ञानसिद्धांत ॥

त्यानें फक्त इंद्रापुढें नवरसविस्तार केला. त्या च प्रमाणेंः—

पाताळीं कंबळाश्वतर दोन्हीं । नृत्य मदाळसा उठविली गायनीं ।
परि ते नेणती ब्रह्मसिद्धांतवाणी । रसरंगा वांचोनी ॥ २० ॥

तसें च—

तैसा नव्हे ब्रह्मज्ञ कविता । रसाळ बोले सांडौनि सिद्धांता ।
जेणें तत्वार्थ ये श्रोतेयांच्या चित्ता । तें चि बोले ॥ २१ ॥

१। ग्रंथ
कैसा शोभे । सकळ सिद्धांतावरी सिंह लाभे ।
नातरि ब्रह्मवादियांकुंजरसभे । ज्ञानांकुश मिरवे ॥ २२ ॥

ग्रंथाचें प्रयोजनः—

होआवया ब्रह्मवादियांचें खंडन । करूं दृष्टांतप्रबोधकथन ।
जेहीं येक चि केलें जीवब्रह्मांचें लक्षण । अद्वैतबोधें ॥ ३६ ॥
जेहीं मनमुखें कथिलें ज्ञान । ते ठाईंचे गा अज्ञान ।
गुरुविण बोलती अ ( ? ) ज्ञान । ते पाखंडमतीये ॥ ३७ ॥

ज्याला धातूचें ज्ञान नाहीं तो सुवर्ण वें पितळ यांना एक च मानितो त्याप्रमाणें मनमुखी ( याचा अर्थ काय ? मनास येईल तें मुखानें बोलणारा असा कीं काय ? हा शब्द या ग्रंथांत बऱ्या च वेळां आला आहे. ) हा ज्ञान व अज्ञान एक च मानितो.

मनमुखानें मनमुखी गुरू केला । तो म्हणे मज ज्ञानप्रबोध जाला ।
जैसा अंधळेनें सत्य मानिला । शब्दें दिवा ॥ ४२ ॥

म्हणून हा ग्रंथ केला.

मी कवण आलों कोठोनी । जाईन कवणीये स्थानीं ।
ऐसी जो जाणे निसानी । तो ज्ञानजोतिसी ॥ ५२ ॥
ज्ञान अज्ञान दोनी । ईया अनादिसिधा वाणी ।
ऐसी जो जाणे कडसनी । तो ज्ञानसिंधु ॥ ५७ ॥
हंसस्छाना बोलिजे ब्रह्मज्ञानी । दृष्टस्छानीं ज्ञानाज्ञान दोन्ही ।
मिश्रित ते दावी वेगळाली करूनी । तो परमहंसाचा हंसू ॥ ६२ ॥

मानभवग्रंथांत या हंसपरमहंस शब्दांचा सुकाळ आहे. मनमुखी ज्ञान खरें नाहीं. तें गुरूशिवाय प्राप्त होत नाहीं.

बरें गुरु केला । आणि तत्वार्थ नाहीं जाणितला ।
तो भ्रांतीमाजी पडला । ठाईंचा अज्ञान ॥ ७४ ॥
विळेया लागला परिसु । परि न संडे वाकुडा अभ्यासु ।
तेथ सोनार पाहिजे विशेपु । नीट करावया ॥ ७५ ॥

गुरूपासून शुद्ध ज्ञान संपादन केलें पाहिजे. अद्वैतवाद्यांनीं जीवब्रह्माचा घोटाळा केला आहे. कारण पहा; ब्रह्म म्हणजे अनंत, सर्वज्ञ, अचल, कूटस्थस्छान, निर्गुण, इंद्रियातीत, पुण्यपाप–अमिश्रित, पड्विकाररहित असें अनंतगुणी आहे, तर जीवास यांपैकीं एक हि नाहीं. हे ( अद्वैतवादी ) लोक

आपनेयां ब्रह्माचें नांव ठेवती । परस्परें देवा देवा म्हणताती ।
परि ब्रह्माची गुणसंपती । एक हि नाहीं ॥ ७९ ॥
...तरी ब्रह्मवादि दोहीं समता । करिती कां पा ॥ ९१ ॥

ब्रह्माला पड्विकार नाहींत, जीवाला तर रोग होतो; ब्रह्म अबंधक आहे, जीवानें जर अन्याय केला तर मग त्याला बंधन कां व्हावें ?

हे बहु असो विरपत्ती । जीवीं किंचित् ब्रह्म साजात्य ( ? ) असती ।
तरी अद्वैतार्थ मानितो अति प्रीती । म्हणे दृष्टांत कवि ॥ १०० ॥

याप्रमाणें पोरकटपणानें अद्वैतमतखंडण ( !! ) केलें आहे. मानभवांत स्पर्शी-स्पर्शदोष नाहीं. पण हे **दृष्टांतबोवा** इतके सोंवळे आहेत कीं–

करितां अद्वैतवादखंडण । वाचें उच्चारिलें अन्येथा ज्ञान ।
तें प्रायेश्चित्त करूं स्तवन । भगवंताचें ॥४०१॥

या आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें त्यांनीं अद्वैत मत नुसतें खंडणार्थ ( ! ) कां होईना पण वाचेनें उच्चारिलें गेल्यामुळें १३ ओव्यांत भगवंताचें स्तवन करून या महापातकाचें प्रायश्चित्त घेतलें आहे !! असो.

ग्रंथाचा शेंवट असा आहे–

...... ग्रंथा करूं समाप्ती । ब्रह्मवादियांची अद्वैतप्रतीति ।
खंडावया बोलिलो ॥ ३९६ ॥
हे बोल तरि मऱ्हाटे । आईकतां आ ( हा ) रिख वाटे ।
परि येथील सिद्धांत गोमटे । आत्मज्ञानमुद्रेचे ॥ ३९७ ॥

आतां या **दृष्टांत** बुवाच्या म्हणजे पर्यायानें मानभवांच्या आत्मज्ञानाची व्याख्या पहा–

तरी आत्मज्ञान तें कवण । दुसरा दुखवलेयां दुखवे आपण ।
शत्रुमित्र मानापमान । नाहीं तया ॥ ४०० ॥

जीवब्रह्मैक्यापेक्षां मानापमान सम जाणणें हें आत्मज्ञान जास्त श्रेष्ठ !! खालील ग्रंथ आपण प्रमाण मानतों असें हा म्हणत आहे.

एवं गीता भागवत वेदु ज्ञानामृतटीका ( ? ) हरिहरसंवादु नाथपंथ चौपदिया विवेकसिंध प्रस्तवाक्यें प्रमानें ॥ ४१६ ॥ एवं दृष्टांतकविरुत दृष्टांत-प्रबोधु समाप्त.

**पां. मा. चांदोरकर**

---

# हरिसुत नामा अथवा हरिसुत विठलदास

**हरिसुत नामा** हें नांव आपल्या विशेष परिचयाचें नसलें तरी **नामा पाठक** हें नांव माहितींतलें आहे. नामा पाठकाची कुलपरंपरा आढळते ती अशीः— **पाठक पिला–त्रिमल–कान्हा–हरि–नामा.** नामा पाठकाचा काल निश्चित असा सांपडलेला नाहीं. त्यांचे निपणजे पिला पाठक यांचे गुरु **वडवाळ–सिद्ध–नागेश** होते असा उल्लेख पिला पाठकाचा नातू जो **कान्हा** त्यानें केलेल्या **पाताळखंडांत** सांपडतो. वडवाळसिद्ध नागेश याचा **संकटहरिणीशिव** नांवाचा एक

ग्रंथ आहे; अजून तो अप्रकाशित आहे. तो शक १३१३ मार्गशीर्ष वद्य २ चा आहे. हा ग्रंथरचनाशक मानिल्यास **वडवाळ सिद्ध नागेशाचा** हा काळ येतो. सूचींत याचा शक १२९०-१३४० असा काल दिलेला आहे. पिला पाठकाचा हा च काल धरल्यास व वीस वर्षांची एक पिढी धरल्यास **नामाचा** काल शक १४२०-१४३० हा येतो. भरतभेट नामक एक प्रकरण याच्या नांवाचें आहे; त्याचा लेखनशक १५५६ आहे. हें अद्याप अप्रसिद्ध आहे. तेव्हां सामान्यतः १४३० ते १४७० हा काळ नामा पाठकाचा धरण्यांत मोठीशी चूक होईल असें वाटत नाहीं. असो.

खालीं दिलेल्या पदाचे कर्ते हरिसुत नामा हे नामा पाठक च असल्यास मग कांहीं हरकत नाहीं; पण या पदाच्या कर्त्यांच्या नांवासंबंधीं थोडासा घोटाळा झालेला आहे. मला हें च पद दोन निरनिराळ्या बाडांत आढळलें. पैकीं एकांत हें सबंध पद आहे तर दुसऱ्यांत पहिलें, दुसरें व चवथें अशीं तीन कडवीं जास्त आहेत. एवढें च असतें तर कांहीं नवल नव्हतें, कारण पहिल्यांत हीं कडवीं विसरून लिहावयाचीं राहिलीं असतील अशी समजूत करून घेतां आली असती; पण विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, पहिल्या पदाच्या शेवटीं **हरिसुत नामा** असा नामनिर्देश आहे तर दुसऱ्या--तीन कडवीं जास्त असलेल्या--पदाच्या शेवटीं **हरिसुत विठ्ठलदास** असा उल्लेख आहे। मग हें पद खरें कोणाचें ? हरिसुत नाम्याचें कां हरिसुत विठ्ठल-दासाचें ? हरिसुत नामा (पाठक) आपल्याला ठाऊक आहे पण हरिसुत विठ्ठलदास हें नांव मात्र अगदीं नवीन आहे. **विठ्ठल** अथवा **विठ्ठलनाथ-सोम-नरसी-नंदन-पुरंधर-रुद्र** यांपैकीं कोणी हि हरिसुत दिसत नाहीं. रासक्रीडा-कर्ते **विठ्ठलदास** एक आहेत, पण त्यांचे गुरु **धुंडी** म्हणन आहेत. तेव्हां हे **हरि-सुत विठ्ठलदास** कोण ? नामा खरा कीं विठ्ठलदास खरा; का दोन्ही नांवें एका च व्यक्तीचीं ? जास्त शोध लाविला पाहिजे. खालीं प्रथम हरिसुत नाम्याचें पद दिलें आहे व त्यानंतर हरिसुत विठ्ठलदासाचें दिलें आहे.

## हरिसुत नामा याचें पद

गरुडावरि बैसुनी हरि झडकरी त्वां यावे, प्रभु लवकरी त्वां यावे ।
नाहीं तरी हा प्राण त्यजीन स्वभावें ॥ ध्रु० ॥

दुस्तर हा संवसार भोगावा किती, सोसावा किती
म्हणोनि वेळोवेळां येतो काकुळती ॥ १ ॥

हरिसुत नामा म्हणे भक्तांच्या दातारा । सिणलो संवसारीं चुकवी येरझारा ॥ २ ॥

## हरिसुत विठ्ठलदासाचें पद

गरुडावरि बैसोनि लवकरी तां यावें । नाहीं तरी हा प्राण त्यजीन स्वभावें ॥ ध्रु०॥
कस्तुरी टिळकु तो तुझा...कु । तो मज भेटवा रुक्मिणी नायकु ॥ १ ॥
कमळदळलोचन हें नाम तूझें । अवलोकितां मन निवालें माझें ॥ २ ॥

दुस्तर हा संसार सोसावा किती । म्हणुनीया तुजलागी येतो काकुळती ॥ ३ ॥
नाना विधी उपचार तुजलागी केले । उठि उठि द्वारकेराया भक्त भागले ॥ ४ ॥
हरिसुत विठ्ठलदास कविच्या दातारा । श्रमलो या संसारा चुकवी येरझारा ॥ ५ ॥

**पां. मा. चांदोरकर**

~~~~~~

## भक्त चिमा

एका बाडांत **भक्त चिमा** या नांवावर लिहिले गेलेले कांहीं अभंग आढळले. आजपर्यंत **बहिणाबाई, श्रीवेणाबाई, बायजाबाई, गोणाई, जनाबाई** इत्यादि ६।७ स्त्रियांनीं मराठी कवित्व केल्याचें आपल्याला आढळतें. **भक्त चिमा** हें नांव आपल्यापुढें नवीनें च आहे; पण या चिमाची योग्यता वरील स्त्री-कवींच्या प्रभावळींत बसण्याची मुळीं च नाहीं. एवढेंच नव्हे, तर दुसऱ्यांचीं—प्रख्यात असलेल्या कवींचीं—नांवें चोरणाऱ्या मानभवांच्या जातींपैकीं ही चिमा असावी असे तिनें केलेल्या अभंगांकडे पाहिलें असतां दिसून येतें. तिचें कवित्व हि भिकार आहे. भाषा जुनी आहे. तिच्या सात आठ आढळलेल्या अभंगांपैकीं एकांत हि तिच्या स्वत:विषयीं अगर तिच्या कालाविषयीं माहिती मिळेल असा ओझरता हि उल्लेख सांपडला नाहीं. भाषेवरून ती सतराव्या शतकांतील असावी असा अंदाज आहे. मासल्याकरितां २ अभंग खालीं दिले आहेत.

### महामायेचें दळण

सवंसार जात परळोकाळीं दळण दळी, आकास चाड प्रुथमी तळी
सवंसार सुपीं प्रपंच गहू भरून प्रळोकाळीं चहू पानीचें भरड तें वरण ॥
एकवीस स्वर्ग सप्त पाताळे तिचे रोमावळीं । हारपलीं ब्रह्मांडगोळ गगन मेघळ ॥
तिचे चोळीचे थिगळ...... । दळले दस अवतार आणीक साही चक्रवती ॥
महामंडळीक महाभुवापती । अनंतरासी दळल्या ज्याहाच्या आउक्षा नोहोती निती ॥

याप्रमाणें च महामायेनें ५६ कोटी यादव, १८ भार कौरवपांडव दळले. प्रळयकाळीं १०० वर्षे मेघ पृथ्वीवर वर्षणार नाहींत, पुढें महाप्रचंड वायू धुधुकारेल, महावैश्वानर पेटेल, सेषमुखाच्या ज्वाला स्वर्गांवर जातील, त्यानें सप्त पाताळें धडाडतील इत्यादि नेहमींच्या परिचयाचें च वर्णन पुढें करून **चिमाबाईनीं** या महामायेच्या दळणाचा शेवट खालीलप्रमाणें केला आहे.

...... अशा प्रळयकाळीं
भक्त चिमा म्हणे तुज ध्याते अंत:करणीं । आपल्या भक्तासी राखावे संभाळ करुनी ॥
~~~~~~

## संवसारपेठ

संवसार पेठ रचली नीट तेथ बरवा भरला हाट । तेया हाटाचे करीं कवन ।

उतीम मधीम नाना प्रकारींचे जन्म । सकळीक हाटा येती मिळून ।

पाप पुण्य धरमदान हे बोलिले कोण । परि घ्याव निवडून त्या जीवाचे बहुत होईल हित ।

मधें च ब्रह्मविद्येचा उल्लेख आलेला आहे.

या अभंगाचा शेवट असा:—

घरासरमीं नोहे त्या गडाचा लाग । तया गडाकारन साधावा ( वै ) राग ।

तया गडाचा राजा कुस्तुदेव श्रीरंग । भक्त चिमा म्हणे हा पद्राचा अभंग ॥

या अभंगलेखनांत ख-कारा बद्दल सर्वत्र प-काराचा उपयोग केलेला आहे.

**पां. मा. चांदोरकर**

---

## विप्र कोनेर

**कोनेर** कवीबद्दल कांहीं च माहिती आढळत नाहीं; त्याचें अगर त्यांचीं संपूण नावें हि दृष्टोत्पत्तीस आलेलीं नाहींत. **कोनेर गंगाजी, कोनेर गंगाधर, कोनेर नरसिंह, कोनेर नारायण, कोनेर रंगनाथ** व **कोनेर रघुनाथ** इतके **कोनेर** सध्यां उपलब्ध आहेत. त्यांच्या च जोडीला आज हा एक **विप्र कोनेर** येऊन बसत आहे. हा **विप्र कोनेर** वरील कोनेऱ्यांपैकीं च एक आहे कां निराळा आहे याचा निर्णय लागत नाहीं. मात्र हा ब्राह्मण आहे असें त्यानें च उद्धृत केलेल्या त्याच्या नांवावरून ठरतें. यानें पंचपुरी—सिखरीं वास करणाऱ्या श्रीहरीवर एक आरती केली आहे. ती खालील प्रमाणें:—

जयदेव जयदेव जय वैकुंठरमणा श्रीलक्षुमीरमणा

आरती ओवाळूं भावें तुज दीनउद्धरणा । ध्रु. ।

पंचपुरीं सिखरीं देव श्रीहरी, सनमुख हनुमंत उभासे द्वारीं ॥ १ ॥

विप्र कोनेरी चरणीं मागतसे ठाव, तयासी प्रसन्न जाला श्रीत्रिमल गिरिराव ॥२॥

हें पंचपूर–सिखर कोणचें ? व ज्यांच्या पुढें हनुमंत उभे आहेत असे हे श्रीत्रिमल गिरिराव हि कोण ? विप्र कोनेरीचे गुरु कां दैवत ?

**पां. मा. चांदोरकर**

# रंक विप्रकृत श्रियाळचरित्र

काव्यसंग्रहांत **अनंत** व **आनंदतनय** आणि काव्येतिहाससंग्रहांत **उद्धव-चिद्‌घन** यांनीं केलेलीं श्रियाळचरित्रें प्रसिद्ध झालेलीं आहेत. त्याचप्रमाणें शिवलीलामृतांत चौदाव्या अध्यायांत हि श्रीधराचें श्रियाळचरित्र गायिलें आहे. हें **रंकविप्रकृत** चरित्र नवीन उपलब्ध झालें आहे. शिवलीमृतांतर्गतांत व यांत थोडासा फरक आहे, तो खालीं देतों. **रंकविप्र** श्रियाळाच्या बापाचें नांव बगळराय असें देतो. श्रियाळ जरी सोमवार, शिवरात्र करी तरी एकादशीव्रत हि करीत असे. याप्रमाणें तो जसा शैव होता तसा वैष्णव हि होता.

दोघी हरिहरदासातें पूजिती । ते संतोषौनि आसीर्वाद देती ।
तोचि गा पै जाली फळश्रुति । गर्भ राहिला चांगुणे ॥

पुत्राच्या बारशाच्या दिवशीं "विप्रकूळ आणि इतर समस्त हि त्रुप्त जाले." पांचव्या वर्षापासून बाळानें पद्मासन घालून रुद्राक्षमाळा धारण करून शिवाचें ध्यान करावें. ब्रह्मपुत्रानें

श्रियाळ देखिला निकटभक्तु । चांगुणा ते पतिव्रता विख्यातु ।
चिलया पुत्र सत्वशीळु ।

पाहून कैलासाला वेगवत्तर बीजें केलें, शंकरास **शिवकांतीच्या** श्रियाळाचें चरित्र सांगितलें. ( श्रीधरस्वामी फक्त कांती नांव देतात. ) शिव संतोषले, उमेकडे पाहिलें. तिनें अंत्रभाव जाणला. नारदास शंकर म्हणतात तुम्ही राहाणीवातु गुप्तरूपें राहावें, नंतर सिंहनाद केला. सुरेशास विचार पडला, तो कैलासीं आला, त्याला आज्ञा झाली कीं, समग्र देवांनीं विमानेसी माझ्या बरोबर चलावें. श्रियाळाच्या ध्यानांत अंध, कुश्चिळ असें रूप आलें. डोळे उघडतां त्या च रूपाचा अतिथी पुढें उभा. त्या अतिथीस अंधळा असल्यामुळें एका नागरिकानें हातीं धरून आणलें होतें. श्रियाळें जाणितला भाव, सत्व पाहूं आले सदाशिव. अतीथु म्हणे क्षौध्यें प्राणु पडितु असे. आम्हांस मृगमांस नको, आम्ही नरमांसआहारी. चांगुणा म्हणाली माझें मांस देत्ये. अतिथी म्हणतो अनदात्याची कांता, ते मागत्याची माता. म्हणून तुझें मांस नको. चित्रशाळेंत लिहीत बसलेल्या चिलयास राणीनें आणलें व तिघांनीं स्नानें केलीं. पद्मासन घातलेल्या चिलयाचें मस्तक तोडण्यास श्रियाळानें खड्ग वर केला. तों नारद प्रगटून गांवींच्या लोकांस सांगूं लागला

कोठून अतीतु आला कुश्चिळ ।
श्रियाळ वधितो पोटीचा बाळ ।

लोक रडूं लागले, त्यांनीं मोडता घातला, पण त्यांना राजाराणीनें जुमानलें नाहीं. नारदानें सांगितलें कीं, अरे हा कसधा त्रिपुरारी! हा राक्षसु, बाळघातकी, यासी

मारुनी घाला रे बाहेरी, पण तिकडे हि लक्ष न देतां श्रियाळाचा खड्ग खालीं उतरला व शिवार्पण झालेल्या चिलयाच्या शरिरानें आपलें मस्तक आपल्या हातांत झेलून शंकरास वोवाळिलें. कैलासास ज्योती गेली. गिरजेनें त्याला मांडीवर घेतलें, व बाळ ळेणें घातलें. चांगुणेनें शिरास अग्नि द्यावा म्हणून तें झांकून धडाचा पाक केला, अतीतु म्हणतो

पिंड हा मळमूत्राचा जाण । त्याचें न करी मी भोजन ॥

पावित्र सिर ठेऊन अपवित्राचें बोणें केलें, तरि तें उखळांत घालून

पालव खोउनियां देहुडा । मस्तकीचा बांधिजे जुडा ।

असें करून सेवकाहूनी कांडावें, ओव्या गाव्या, या अभंगवजा ओव्या करुणपर आहेत. दोन चार पुढें दिल्या आहेत.

चंद्राची उपमा देऊं मुखकमळा । तरि तो प्रतिदिनीं कळाहीनू होये ॥
नेत्र रातोत्पळ ढळमळती बुबुळ । जेविं आळीनळ रंजिताती ॥
निरिगासारिखी शोभे हनुवटी । मी माउली निकुष्टि कांडितु असे ॥
भरवीया वरवंटा काये वानूं पुत्रा । मनोभावें रुद्रा वोपिलासि ॥
चिला माझा वनजारा भक्तिभावें आर्थिला । वेव्हारा जोडिला उमेकांतु ॥
कुळीं कुळदीपकु आम्हांतून ऐसा । उजियेडु हांवसा केला तुवां ॥
पान्हेली पयोधरी तिडकी ते उद्येली । तैसी मी मावली कांडी तुज ॥
पिलुके गिळी व्याळु बोभाये पाक्षिणी । तैसी मी नंदिनी पुत्रेविण ॥
वछ चुके जीचे धेनू ते बोभाये । तैसी ते मी माये पुत्रेविण ॥

या शोकानें गगन कडकडिलें, दिनू मायातमें झांकोळिला, शेष फडा काढूं लागला. शिराचा पाक केला; अतिथी व त्याच्या आज्ञेनें श्रियाळ जेवण्यास बसलीं. शंकरानें सिंहनाद केला, तो गिरजेनें कैलासीं औकिला, चिलयास व नंदीस घेऊन ती कांतीस आली. ते गुप्त होते. शंकर, पार्वती, नारद व चौथा नंदी यांनीं चिलःयास अलंकार घातले. आतिथी म्हणतो, निपुत्रिकाच्या येथें भोजन करीत नाहीं, पुत्रास बोलाव. चांगुणेनें हांक मारल्यावर चिलया प्रगटला.

पुत्रातें देखोनी । प्रेमें वोसंडली जननी ॥

शंकरपार्वती प्रगटले. नारदानें जयजयकार केला. तिघांनीं

चरणावेगळें नको करूं ।

हें मागणें मागितलें. शंकरांनीं सर्व नगरासह तिघांना कैलासीं नेलें. कैलासीं जावयाचें त्या वेळीं गांवच्या लोकांची गडबड उडाली ती विनोदपर वर्णिली आहे. ग्रंथाच्या शेवटीं

रंक विप्र चरणीं । थापावा अनाथ ऐसा जाणोनि ॥

ही २२० वी ओवी लिहून ग्रंथ समाप्त केला आहे. हा हि कवि मानभव

असावा असें वाटतें. मानभव बहुश: दत्ताच्या अगर कृष्णाच्या चरित्रपर व वेदांताच्या कांहीं भागांवर ग्रंथ करितात. स्वतंत्र चरित्र ग्रंथ (लीळासंवाद, लीळाचरित्र सेरीज ) असा हा पहिला च माझ्या अवलोकनांत आला. ग्रंथरचनेचा शक दिला नाहिं व गुरूचें नांव हि उद्धृत केलें नाहीं. भाषा मात्र जुनी आहे.

**पां. मा. चांदोरकर**

# विप्र प्रेमदास

या **विप्र प्रेमदासाचे** कांहीं श्लोक एका बाडांत आढळतात. श्लोक अगदीं साधे आहेत. शेवटच्या श्लोकांत हे **विप्र** ब्रह्मद्वेष करूं नका, भक्तिभाव न सोडितां संतमार्गाचें आचरण करा, रामनामाचें अंतरीं ध्यान करा, असा उपदेश करीत आहेत. आरंभ

संपत्तीचळें फार बोलसी । धर्म सोडुनी अधर्म वर्तसी ।
संतसज्जनासी वैर कां करी । पामरा तुला नेती यमपुरी ॥

असा असून शेवट खालील प्रमाणें आहे.

विप्र प्रेमदास सांगतो तुला । सोय तूं धरी बोले विठला ।
ब्रह्मद्वेष हा तूं नको करी । पामरा तुला नेती यमपुरी ॥

ब्रह्मद्वेष करूं नको व विठ्ठलास भज असें मुद्दाम सांगणारा हा विप्र प्रेमदास मानभव तर नसावा ! मानभवांत आपल्या नांवामागें कवि, विप्र, मुनि, महंत हीं विशेषणें मानभवेतर लोकांची दिशाभूल होण्याकरितां चिकटविण्याची वहिवाट आहे.

**पां. मा. चांदोरकर**

# शक १५५३ चा दुष्काळ

माझे मित्र रा. रामचंद्र मार्तंड देशपांडे यांचे दफ्तरांत सोबतचा कागद मिळाला कागद असल असून तो शालिवाहन शक १५५३ आषाढ शुद्ध पंचमी गुरुवार रोजी लिहिलेला आहे. गणीत करून पाहतां, आषाढ शुद्ध पंचमीस गुरुवार येतो. अंबरापूरकर निंबरे यांनीं चांदगांवकर दादोबा यास हा कागद करून लिहून दिला. [illegible] अंबरापूर व चांदगांव हीं दोन्ही गांवें शेवगांव तालुक्यांत जवळ जवळ [illegible] तेथील देवघेवीचा कागद शेवगांवकर देशपांड्यांच्या दफ्तरीं सांपडावा हें हि उचित आहे.

पत्रांत दुष्काळाचा उल्लेख आहे. या वेळीं दुष्काळ होता हें डफ, खाफीखान इत्यादि बखरकारांनीं आपापल्या बखरींत लिहिलेलें आहे. त्यांचे लिहिण्यास आज हें अस्सल साधन दुजोऱ्यास मिळत आहे. या वेळीं एक पायली ज्वारीस एक होन म्ह० ६०३॥ पडत असा स्पष्ट उल्लेख आलेला आहे. अंबरापूरकर निंबरे ह्यासारख्या प्रतिष्ठित व सधन गृहस्थास हि शेवटीं घरदार, इमारतीचीं लांकडें विकण्यांचा प्रसंग आला, यावरून दुष्काळ किती व्यापक स्वरूपाचा व तीव्रतर होता याचा थोडाबहुत अंदाज करितां येतो. हा दुष्काळ सारखा २।३ वर्षें सुरू असावा.

तुकारामबोवाचे आयुष्यक्रमांत जो मोठा थोरला दुष्काळ पडला होता व ज्याचा उल्लेख तुकारामानें एका अभंगांत केला आहे, तो दुष्काळ हा च असावा. शक १५५३ सालचे दुष्काळासंबंधींचें असलें च एक पत्र रा. पां. न. पटवर्धन यांचे संग्रहांत आहे.

या पत्रांत 'तुहि' 'तुहा' वगैरे रूपें आलीं आहेत. नगरभागांतील कुणबाऊ भाषेंत हीं रूपें अद्यापि हि हरहमेष येतात.

**ना. य. मिरीकर**

---

## श्रीराम

सेके १५५३ प्रजापती नाम सवतछरे
आखाड सुध ५ वार गुरवार त दिसी दो
दोवा चादगावकर यासि होनाजी निबरे
× पेठ अंबरापूर लेहून दि
× ऐसे काल थोर पाडिला दुकाला करिता आप
× × स मेली खावयासि आन नाही मग
आपण हि आनवीन मरो लागलो जो परयत आ-
पले पदरी होत ते कुल विकून खादले काल
× × र पुरेना मग आपणा पासी हि काही ध
× × × णी व भोये जागा राहिला मग ते भाये
जमीन व इमारती विकरा घातली पेठे मधे कु-
नब लोक व ग्राहस्त होते त्यास सांगितले की
माझी जमीन वाडा व इमारती घेऊन मज वाचा-
वा त्यास कोन्ही कबूल न करीत मग तुहि
आपले सेजारी होतेत मग तुहि करार केला मग
आपण आपले आत्मखुसीन राजी होऊन तुहा
घरवाडा जमीन भाये व इमारतीची लाकडे
ऐसी विकत दिधली किमती करून आपण तुहा-

पासून रोख होनु १९ एकुनईस व गेलो
जोरी पाईली. ८०॥ दर पाईलीस होनु एक एकुन होन
६ एकून होनु २५ पचवीस घेऊनु तुह्मास
मिरासी करुनु दीधली ऐसे वांडा लांबी सू-
र्यमुख गज २२ व रुंदी सूर्यमुख गज १०
व दरवाजा वाडियाचा सूर्यातली असे सदर-
हू तुह्मास दिधले असे तुह्मीं सुखे लेकरांचे
लेकरी अर्जानी करुनु नांदण त्या वाडिया-
सी कोन्ही ह्रकतीं आपला भाऊबद अगर ए-
××× अगर आडोसी पडोसी करील त्यास
××× निवारून तुह्मासी नी॥ नाही आपण
वांडा जमीन व इमारती लाकडे ऐसी कुल दी-
धली असे + हे लिहिले सही

बि॥ नारोबा कुलकर्णी पेठ मा॥

---

## गोही

× लोजी पा॥
मोकदम पेठ मा॥

बापूजी महाजन
××

द्दामाजी
सराफ
गोमाजी
घायाळ

भील पा॥
बाो माो पेठ मा॥

आलमिया चौगुला
पेठ मा॥
भानजी हे
× ध
आपाजी
खलिदरा
लखमजी
लाडगा

सूर्याजी
खईर मो॥
पेठ मा॥
गोदावा
लिकता
सीवाजी ता-
वडा
दसावा
मुसाळा
गोद नाक
माहार

कोंडाजी
माहजन
पेठ मा॥
नरसावा
कास्त
कान्हावा
वइद
दाद सटी
भुसारी
ठकू नाक
महार

# अहमदनगर येथील एक फारसी शिलालेख

अहमदनगर येथील डिस्ट्रिक्ट कोर्टाचे इमारतीचे पश्चिम बाजूकडील पायऱ्यांचे जोत्यावर एक फारसी शिलालेख आहे. या शिलालेखाचा उल्लेख नगर ग्याझिटिअरमध्यें पृ० ६९९ वर केलेला आढळतो. ग्याझिटिअरकारास सदरील शिलालेख वाचता आला नाहीं, व म्हणून त्यानें तो दिला नाहीं. शिलालेख तीन ओळींचा असून, प्रत्येक ओळीचे दोन चरण आहेत. सबंध शिलालेख मिळून एक कविता होते. या तीन ओळींपैकीं पहिली ओळ शेवटचीं एक दोन अक्षरें खेरीज करून शाबूत आहे. दुसरी ओळ बहुतेक अस्पष्ट आहे, व तिसरी ओळ मात्र स्पष्ट व पूर्ण अशी आहे.

नगरचे आग्नेयेस दोन मैलांवर फरा-बाग नामक निजामशाहींतील एक इतिहास-प्रसिद्ध महाल आहे. काव्येतिहाससंग्रहांतून प्रसिद्ध झालेल्या पंतप्रधान यांचे शकावलींत पृ. १६ वर या बागेचा उल्लेख आलेला आहे. श्री सदाशिवराव भाऊसाहेब पेशवे हे निजामावर चालून जातांना येथें उतरल्याचें वरील शकावलींत लिहिलें आहे. या बागेचें वर्णन देतांना, ' मुज्दे अहमदनगर ' या छापील उर्दू पुस्तकांत फराबागेंतील दोन शिलालेखांचे उतारे दिले आहेत. सांप्रत फराबागेंत एक हि शिलालेख नाहीं. या दोन शिलालेखांपैकीं एकाचा पत्ता अद्याप लागलेला नाहीं. ' मुज्दे अहमदनगरचे ' लेखकाचे म्हणण्याप्रमाणें दुसरा शिलालेख 'दरवाजाजवळ एका पाण्याचे खजिन्यावर होता'. हा दुसरा शिलालेख म्हणजे च कोर्टाचे इमारतीवरील शिलालेख होय. फराबागेंतलि शिलालेख कोर्टाचे इमारतीवर कसा आला हें समजत नाहीं. परंतु तो मुख्य इमारतीवर नसून, पायऱ्यांचे जोत्यावर आहे यावरून तो कोणी तरी मागाहून आणून लाविला हें च संभाव्य दिसतें.

या शिलालेखावरून, फराबाग नियामतखान यानें हिजरी सन ९८४, इ. स. १५७६ मध्यें बांधला असें दिसून येतें. शिलालेख लावून त्याचा अर्थ करण्याचे कामीं आमचे मित्र मि. अब्दे अली फिदा अली कैयुमी बी. ए. एल्. एल्. बी. वकील अहमदनगर, यांची हरतऱ्हेची मदत मिळाली. याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहों.

ना. य. मिरीकर

पां. न. पटवर्धन

# शिलालेख

नामे ईं अझ खुबीए आबोहवा
शुद फराहबक्ष ईं चुनीं मशहूर बाद
बूद नीयामतखान चुं सायीए बिना
सयीहाए ऊ हमा मशकूर बाद
खासतम तारीखश अझ पीरे खीर्दे
गुफ्त "या रब ता अबद मामूर बाद"

## अर्थ

सौंदर्य ( खुबीए ) व उत्तम हवा ( आबोहवा ) या योगें ( अझ ) या (इमारती) चें नांव ( नामे ईं ) **फराह बक्ष** ( फराह बक्ष, पक्षीं खुश देणारा ) असें पडलें ( शुद ). या च नांवानें ( ईं चुनीं, मूलार्थ या सारखें ) तें प्रख्यात ( मशहूर ) असो ( बाद ). ज्या अर्थीं ( चुं ) या इमारतीचा ( बिना ) निर्माणकर्ता ( सायीए ) नीयामतखान हा होता ( बूद ) त्या अर्थी त्याचे ( ऊ ) कृतीबद्दल ( सयीहाए ) आपण कृतज्ञ ( मशकूर ) असावें ( बाद ). हा इमारत बांधल्याची तारीख ( तारीखश ) कोणती ती मला वृद्ध ( पीरे ) व शहाण्या ( खीर्द ) इसमापासून ( अझ ) पाहिजे होती ( खासतम ). त्यांनं उत्तर केलें ( गुफ्त ) कीं, हे (या) ईश्वरा ( रब ), येथें यावचंद्रदिवाकरौ ( ता अबद ) वस्ती ( मामूर ) असो ( बाद ).

टीपः–'या रब ता अबद मामूर बाद' या ओळीचा अबजदपद्धतीनें १८४ ही किंमत येते. शिलालेख कोरल्याचा हा हिजरी सन होय.

# सूर्यार्यास्तोत्र

ह्या द्वादशश्लोकात्मक संस्कृत गाथेच्या दोन प्रती उपलब्धास तांपदः हें स्तोत्र ×सांबपुरास रचिलें. सांबपूर म्हणजे सध्या कोणतें गांव तें कळत न प्रती मंडळाच्या संग्रहास ठेविल्या आहेत.

यस्योदयास्तसमये सुरमुकुटनिघृष्टचरणकमलोऽपि ।
कुरुतेऽञ्जलिं त्रिनेत्रः स जयति धाम्नां निधिः सूर्यः ॥ १ ॥
उदयाचलतिलकाय प्रणतोऽस्मि विवस्वते ग्रहेशाय ।
अम्बरचूडामणये दिग्वनिताकर्णपूराय ॥ २ ॥
जयति जनानन्दकरः करनिकरनिरस्ततिमिरसंघातः ।
लोकालोकालोकः कमलारुणमण्डलः सूर्यः ॥ ३ ॥

---

× सातारा जिल्ह्यांत संभापूर म्हणून एक गांव आहे.–संपादक.

माहादेव वाजी मुद्गलाल्भ्यगोत्री । भला जो जनीं मानिजे या पवित्री ॥
तया आवडी थोर या पुस्तकाची । नीती दीन हें अन्वयाचेनि याची ॥ २ ॥
त्वरेनें करी पाहिजे ग्रंथ आला । म्हणोनी द्वीं लेखकीं सीघ केला ॥
माहादेव हा सुत नीळयीवाचा । तया दुसरा सुत या भैरवाचा ॥ ३ ॥
द्वयानि त्रीरात्री मधें पुर्ण केला । तदा कोण हा काव्य होता उदेला॥
ससी हा ऋतु मास मार्गेश्वराचा । शशीहीन जो पक्ष जाणा तुलाचा ॥ ४ ॥
दशमिपूर्णतिथौ रवीवासरे । सकळउत्तम वत्छर ईश्वरे ॥
भरत यामद्वये रजनि खरी । सकळलेखन पुर्ण तदा करी ॥५॥

श्वास्ति श्रीनृपशालिवानशकें १६१९ ईश्वरनामसंवत्सर मार्गशिर्षकृष्णदशमी शषीरतु रविवारी मध्यरात्री वास्तव्य ग्रंथलेखन समात ॥ शुभं भवतु ॥ ॥ श्रीरस्तु ॥ ७ ॥ ७ ॥

मूळ पोथी विठलगुरू पाशीं होती. ती त्यांची त्यास लवकर परत करावयाची होती. सबब, माहादेव वाजी दाल्भ्यगोत्री यानें माहादेव निळो व भैरवाचा पुत्र या दोघां कडून तीन रात्रींत हा ग्रंथ नकल करून घेतला. नकल शक १६१९ त झाली. हस्तामलकाची इतकी जुनी प्रत अद्याप उपलब्ध झाली नाहीं. खरें म्हटलें म्हणजे, शक १५२१ च्या पूर्वीच्या एकनाथी ग्रंथांच्या प्रती सांपडल्या पाहिजेत. त्या शिवाय नाथांचे खरें पाठ कळणार नाहींत. ग्रंथ मंडळाच्या संग्रहांत ठेविला आहे व त्यांत लेखन-समाप्तीचे श्लोक हि निराळ्या कागदावरील आहेत.

वि. का. राजवाडे

---

# जयराम विठ्ठलकृत कूटस्थदीप—अभंग

हें प्रकरण उरवड्यास पोतानिसांच्या येथें सांपडलें. एकंदर ओव्या ३५ आहेत. समाप्तीची ओवी अशी:—

जयरामें विठ्ठलगुरूचें वचन । केलें निवेदन शिष्या लागीं ॥ ३६ ॥

पत्तनिसा चा आंकडा घालावयाचा तो ३६ चा घातला आहे. कदाचित् ३५ वी ओवी गळली असल्याचा हि संभव आहे. मग एकंदर ओव्या ३६ होत्या, असें म्हणावें लागेल. जयराम विठ्ठल हा एक नवीन च कवी दिसतो. याचा उल्लेख [illegible] रकर सूचींत नाहीं. कोण, कोठील, केव्हांचा तें सध्यां कळण्यास मार्ग नाहीं. [illegible] मंडळाच्या संग्रहांत ठेविलें आहे.

वि. का. राजवाडे

---

# नित्यानंदांचें निरंजनाष्टक

कविकाव्यसूचींत नित्यानंदांचें निरंजनाष्टक नमूद नाहीं. त्यावरून तें अप्रकाशित व अनुपलब्ध असावें, असें दिसतें. टांकळीमठांतील अनुक्रमांक २३ हें, हें निरंजनाष्टक आहे. अष्टकाचा शेवट आहे, त्यावरून प्रकरणाच्या एकंदर ७७ ओव्या आहेत, असें दिसतें. परंतु आरंभींचीं चार पृष्ठें गहाळ असल्यामुळें प्रस्तुत प्रकरणाच्या आरंभींच्या ६१ ओव्या अनुपलब्ध आहेत. अष्टकाचा शेवट असा आहेः—

निरंजनाष्टक स्तुतिस्तोत्र । श्रीदत्तें स्तुति केली विचित्र ॥
निरंजनीं अलक्ष सूत्र । पुण्य पवित्र सुखाचें ॥ ७१ ॥
स्वानंद मिनला निरंजनीं । मुद्रा अगोचर उन्मनी ॥
सदोदित अखंडध्याती । निरंजन स्वानंद ॥ ७२ ॥
मुळीं स्तुति स्वानंदाची । स्वयें आनंदें विण कैंची ॥
स्तुति श्री दिगांबर देवाची । पुराण पूर्वींची विस्तारे ॥ ७३ ॥
निरंजनाष्टक त्रिकाळ पठण । स्वानंदें जो कां करिल श्रवण ॥
सायोज्यपद पावे जाण । ब्रह्म निर्गुण निरंजन ॥ ७४ ॥
जो जो कल्पी जे मनोरथ । ते तया होईल प्राप्त ॥
निरंजन स्तुति विचित्र । शुद्ध पवित्र सत्त्वाचे ॥ ७५ ॥
स्वानंदें श्रीदत्तें स्तुति केली । स्वानंद श्रीदत्त माउली ॥
स्वानंद निरंजन साउली । नित्यानंदवाणी वदली स्वानंदें ॥ ७६ ॥
इति श्री निरंजनाष्टक । जपतां निवारे संकट ॥
स्वानंद **नित्यानंद** घनदाट । स्तुति निष्टंक निर्गुण ॥ ७७ ॥

शं. श्री. देव

# नृसिंहसुतांचें रामायण

कविकाव्यसूचींत नृसिंहसुतांचें नांव नाहीं. यांनीं रचिलेल्या ओवीबद्ध सुंदरकांडाचे प्रसंग (१२ ते १६ मिळून अवघे पांच प्रसंग) टांकळी मठांत (अनुक्रमांक ३३) उपलब्ध झाले आहेत. हे पांच प्रसंग वाचून पहातां नृसिंहसुतांची कविता श्रेष्ठ प्रतीची आहे असें मला वाटतें. लिपीवरून व भाषेवरून प्रस्तुतची प्रत २००।२५० वर्षांमागची निःसंशय आहे. नृसिंहसुतांनीं सबंध रामायण रचिलें होतें, कां कांहीं कांडें रचिलीं होतीं, कां फक्त सुंदरकांड तेवढें च रचिलें, हें सांगण्याला मार्ग नाहीं. संशोधकांनीं प्रयत्न करून नृसिंहसुतांचें रामायण मिळविलें पाहिजे. कारण काव्य गोड आहे.

पांच प्रसंगांची ओवीसंख्या अनुक्रमें ६६+५६+९४+१००+३९ मिळून ३५५ आहे. ओवीचा नमुना म्हणून चवदाव्या प्रसंगाच्या शेवटच्या कांहीं ओव्या देतों:-

ऐसें बोले मारुती । तेणें सीतेसी वाटे विश्रांती ॥
कांहीं संशयो चित्तीं । पुनरपि बोले ॥ ८२ ॥
अरे तुम्ही रुक्षमुखपर्वती । असतां तेथें सुरावृत्ती ॥
ते कांहीं खूण ठावकी चित्तीं । आहे कीं नाहीं ॥ ८३ ॥
ऐसी जानकीची बोली । हनुमंत बोले ते काळीं ॥
म्हणे माते तूं गेलीसी ते वेळीं । विमानीं बैसोनिया ॥ ८४ ॥
तुझीये पाईचा शृंगारु । पर्वतावरी पडिला सुंदरु ॥
तेथें आम्ही पांच वीर । होतों जाण ॥ ८५ ॥
तेथें खूण बोले वायोकुमरु । सीतेसी आला गहिवरु ॥
म्हणे हा सत्य रामाचा किंकरु । परम सखा होये ॥ ८६ ॥
असत्य न म्हणावे हृदईं । जें बोलणें तें चि हे समईं ॥
जागृती जालिया काई । राक्षस छळिती यासी ॥ ८७ ॥
मग म्हणे बा रे हनुमंता । बैस येई गा आरुता ॥
सीणलासी लंका पाहातां । मार्गीचे सुखी ॥ ८८ ॥
रामा मज पडिली तुटी । सा मास येथें कष्टी ॥
परी माझे जिवलग दृष्टी । पडिले नाहीं कोण्ही ॥ ८९ ॥
आजी तूं पीयूषसागरु । मजवरी वोळलासी अपारु ॥
माझी चित्तवृत्ती मनोहरु । परम सुखातें पावली ॥ ९० ॥
दुरात्मा रावण कपटी । त्रैलोक्यासी न मनी दृष्टी ॥
भुवनत्रये केले कष्टी । शंकरवरदानें ॥ ९१ ॥
आतां तुज कल्याण असो । दुष्टापासुनी आघात नसो ॥
क्षेम जाउनी रामाजवळी बैसो । माझी वार्ता सांग पा ॥ ९२ ॥
आतां सकळ देवासी । बोलेन नवस सायासी ॥
कल्याण असो हनुमंतासी । म्हणोनी प्रार्थना करीत ॥ ९३ ॥
इति श्रीसुंदरकांड रामायण । ते परियसा पंडित जन ॥
श्रोतीं व्हावें सावधान । **नृसींहिसुत** म्हणे ॥ ९४ ॥

**शं. श्री. देव**

# अनंतगोपाळदासकृत येकनाथांची आरती

आरती येकनाथा । महाराज समर्था ॥
त्रिभुवनीं तूं चि थोर । जगद्गुरु जगन्नाथा ॥ १ ॥

येकनाथ नाम साजे । वेदशास्त्राचें गुज ॥
संसारदुःख नासी । महामंत्राचें बीज ॥ २ ॥
येकनाथ नाम घेतां । सौख्य वाटतें चित्ता ॥
**अनंत गोपाळदास** । धणी न पुरे गातां ॥ ३ ॥

ही आरती टांकळीमठांतील अनुक्रमांक ३७ तील एका कागदावर आहे.

**शं. श्री. देव**

# चासकर जोशी यांचें एक निवाडपत्र

पुढील पत्र शक १६८७ बुधवार कार्तिक शु. १० चें असून, तें जोशी यांचे भाऊपणांतील कज्जाचे कामीं दिलेलें निवाडपत्र आहे. शिवछत्रपतींच्या कारकीर्दीत जीं चार दोन चित्पावन घराणीं घाटावर येऊन, स्वपराक्रमानें उदयास आलीं, त्यांपैकीं चासकर जोशांचें घराणें हें एक होय. या घराण्यांतील पुरुषांनीं चंदीचे प्रसंगीं हि कामगिरी बजाविल्यामुळें त्यानिमित्त राजाराम साहेबांनीं त्यांस खवली गांव इनाम दिलेला आहे, व या च गांवासंबंधीं पुढें भाऊपणांत तंटा लागला होता. या घराण्यासंबंधानें चास येथील घराण्यांत जे कागद मिळाले ते रा. राजवाडे यांनीं म. इ. सा. खंड ११ यांत छापून प्रसिद्ध केले. त्यांत प्रस्तुत निवाडपत्र आलेलें नाहीं.

निवाडपत्रावरून जी वंशावळ तयार होते ती खालील प्रमाणें:—

यांपैकीं नारो कृष्ण, गोविंद कृष्ण व महादजी कृष्ण यांस शके १६१७ युवा संवत्सरीं गांव इनाम मिळाल्यानंतर ' दहा वीस वर्षांउपरांत ' नारो कृष्ण मृत्यु पावले. महादजी कृष्ण यांचे ज्येष्ठ पुत्र बाळाजी महादेव रोजगारामुळें पन्हाळ्यास

गेले, व गोविंद कृष्ण खानदेशांत गेले, असा उल्लेख सदरचे निवाडपत्रांत आहे. जोशांचीं मुख्य मुख्य घराणीं तीन ठिकाणीं म्हणजे चास, कल्याण व गणेशवाडी येथें आहेत. पैकीं कल्याणचे शाखेस त्यांतील पुरुष मेघःशाम याचे भांडकुदळपणामुळें अद्यापि हि मेघःशामाचें घराणें असें च म्हणतात.

स. मा. दिवेकर

श्री

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विस्वासनिधी राजमान्य राजश्री माधवराव पंडित प्रधान ताहा मुकदम मौजे रावली ता॥ पाल प्रांत चेउल सुहुर सन सीत सीतेन मया व अलफ राजश्री श्रीराम श्रीधर व मेघःशाम बलाल यांजकडे मौजे मार ईनाम आहे याचे विभागाविसीं कजिया लागोन मनसुफी हुजुर पडली तेव्हां श्रीराम श्रीधर याणीं विदित केलें कीं श्रीमंत कैलासवासी राजाराम साहेब याणीं मौजे मजकूर हा गाव ईनाम आमचे आजे गोविंद कृष्ण यास व याचे वडील बंधु नारो कृष्ण व माहादाजी कृष्ण या त्रिवर्गांस देऊन पत्रें करून दिल्हीं त्या प्रमाणें दाहा वीस वर्षे येकत्रपणे भोगवटा घेतला उपरांत नारो कृष्ण मृत्य पावले त्याचे नकल जाले बाकी माहादाजी कृष्ण व गोविंद कृष्ण त्यास माहादाजी कृष्ण यांचे जेष्ट पुत्र बालाजी माहादेव रोजगारामुळे पनाल्यास जाउन राहिले ते व त्याचे पुत्र हा कालवर निरालेपणी आहेत. आमचे आजे गोविंद कृष्ण रोजगारामुळे खानदेशांत गेले ते येते समई नाशकांत राहिले तेथें शांत जाले त्याचे पुत्र श्रीधर गोविंद त्याचे पुत्र आम्हीं रोजगारास गेल्यापासोन विभक्तपणें आहों गोविंद कृष्ण रोजगारास गेल्यामागे माहादाजी कृष्ण या प्रांतीं होते ते दोन तीन वर्षांनी श्री वाराणसी मध्यें जाऊन मृत्य पावले त्यांचे कनिष्ठ पुत्र रामचंद्र माहादेव व कृष्णराव माहादेव येकत्र होते गाव त्यांजकडे चालत होता त्यावर रामचंद्र माहादेव मृत्य पावले त्याचे पुत्र नारो रामचंद्र व बंधु कृष्णराव माहादेव विभक्त जाहले परंतु गाव नारो रामचंद्र यांजकडे चालत होता ते

हि मृत्य पावले त्यांचे नकल जाले याजवर गाव सरकारांत तीन चार वर्षे होता
आलीकडे सा सात वर्षे मेघःशाम बलाल याणी आम्हा अपरोक्षा श्रीमंताचे तार्कीद-
पत्र घेऊन गाव आपणाकडे करून घेतला हे वर्तमान आम्हास कळल्यावर श्रीमंतास
आम्हीं विनंती केली कीं गाव उभयतांचे वडिलास प्राप्त जाहाला आहे मूळची सनद
उभयतांचे नावांची आहे याचे आमचे विभाग जाहाले नाही म्हणून त्यावरून आज्ञा
जाहाली कीं पहिली सनद आणून दाखवणे ममास आणून आज्ञा केली जाइल या
प्रमाणें आज्ञा जालियावर सनद चासेस कृष्णराव यांचे घरीं होती तिचा शोध
करून आणावी तो श्रीमंत नानासाहेब कैलासवासी जाले त्यावर दोन तीन वर्षे
जाहली अलीकडे चासहून शोध करून राजाराम साहेबाचे मूळचे राजपत्र दोघांचे
नावाचे आहे तें राजश्री रामाजी महादेव व विसाजी केशव सुभेदार यांस कल्याणास
आम्हीं दाखविलीं त्यांणीं मेघःशाम बलाल यांचे बंधु अमृतराव बलाल यांस बोला-
ऊन आणून निवाडा करून निमे गाव आम्हांस देवविला त्याणीं मान्य केले
असतां मेघःशाम बलाल कजिया करितात येविसींची आज्ञा जाली पाहिजे
म्हणून त्याजवरून मेघःशाम बलाल यांस पुसता त्याणी लेहून दिल्हे कीं मौजे
खवली हा गाव आजि बाहात्तर वर्षे आमचे आजे महादाजी कृष्ण व रामचंद्र महा-
देव कृष्णराव महादेव व मोरो रामचंद्र यांजकडे इनाम दुरोबस्त चालिला आमचे
तीर्थरूप बालाजी महादेव महायात्रेस जाऊं लागले तेव्हां आपले पुत्रास घरांतील
वित्तविषयाचा विभाग करून पत्र लेहून ठेविले आहे त्या पत्रांत कृष्णराव महादेव
यांजकडील एकवटपणाचे वित्तविषयाची वाटणी देखील खवली जाहाली नाही ते सा-
धून घेणे विभागें घ्यावी या प्रमाणे पत्र लिहिले त्यावर श्रीधर गोविंद यांची साक्ष
आहे मोरो रामचंद्र मृत्य पावल्यावर कैलासवासी श्रीमंत नानासाहेब याणी सरकारांत
तीन वर्षे गाव जप्त ठेविला त्यावर आम्हीं श्रीमंतास विनंती केली कीं मोरो रामचंद्र
यांजकडे गाव चालत होता त्याप्रमाणे आम्हाकडे मौजे मार हा गाव चालवावा म्हणून
त्यावरून श्रीमंतानी कृपाळु होऊन गाव आम्हाकडे दिल्हा ते समई श्रीराम श्रीधर
जवल होते परंतु आक्षेप केला नाहीं पुढें येका वर्षानंतर वांटा मागों लागले तेव्हां
आम्हीं सांगितले कीं सरकारांत विनंती करून करार करून घेणे त्या उपरी चौवर्गानी
श्रीराम श्रीधर रामाजी महादेव व विसाजी केशव सुभेदार यांजपाशीं उभे राहिले
त्याणी आमचे कनिष्ठ बंधु अमृतराव यांस सांगोन निमे गाव श्रीराम श्रीधर यांस
देवविला त्याजवर आम्हीं हुजूर विनंती करून सुमांत पत्र घेतले कीं या उभयतांची
पंचाइत करणे ते हुजूर केली जाईल त्यास दोन वर्षे जाहाली प्रस्तुत श्रीराम
श्रीधर हुजूर आले आहेत यांचे व आमचे वृत्त ममास आणून आज्ञा होईल त्याप्रमाणे वर्तो
म्हणून याप्रमाणे उभयता पासोन तकरीरा व वर्तणुकेस जामीन घेऊन श्रीराम श्रीधर
यांजपासील राजारामसाहेबाचे पत्र युवा नाम संवत्सरचे त्रिवर्ग बंधूंच्या नावांचे असल
राजपत्र होते ते आणून दाखविले त्यावरून हरदु वाद्याच्या तकरीरा व बालाजी महा-

देव याणी आपले पुत्राजवल पत्र लेहून ठेविले ते ऐसे सर्व कागद पत्र पंचाईतमत मनास आणितां मूलचे राजपत्र तिघां बंधूचे नावांचे आहे त्यापैकीं येकाचे नकल जाहाले बाकी दोघाचा वंश हाली आहे भोगवटियाचा विचार तर सतर वर्षे राजपत्रास जाहाली त्यास वीस पंचवीस वर्षे तो येकत्र च होते त्याजवर बालाजी माहादेव पनाल्याकडे रोजगारास गेले त्यापासोन हालीं मेघःशाम बलाल पर्यंत विभक्तपणे च आहेत त्याचप्रमाणें गोविंद कृष्ण व त्याचे पुत्र रोजगारामुले विभक्त राहिले ते हा कालवर विभक्त आहेत गावचा भोगवटा तीस पस्तीस वर्षे रामचंद्र माहादेव व त्यांचे पुत्र नारो रामचंद्र याणी घेतला त्याचे नकल जाल्यावर तीन च्यार वर्षे गाव सरकारांत जफ्त होता अलीकडे पाच सात वर्षे मेघःशाम बलाल याणी आपणाकडे करून घेतला त्यापासोन उभयतांचा कजिया होत च आहे तीस पस्तीस वर्षे नारो रामचंद्र यांजकडे गाव चालत होता तेव्हां मेघःशाम बलाल व श्रीराम श्रीधर हे उभयेता व यांचे वडील विभक्त होते नारो रामचंद्र याजपासी नव्हते अलीकडे मेघःशाम बलाल याणी आपल्याकडे चालता केला तेव्हां श्रीराम श्रीधर याजकडून निमे दूर करून याजकडे दिल्हा यैसे पत्र जाहाले नाहीं बालाजी माहादेव यांच्या घरच्या पत्रांत देखील खवली म्हटले आहे त्याचा कयास पाहातां अवघ्या भावानी आपलाल्या विभागे गाव घ्यावा या पत्रावरून श्रीराम श्रीधर यास विभाग न पोहचे यैसे होत नाही मूलची सनद दोघां भावांचे नावांची असता येकाचा भोगवटा जाला तरी दुसरा भाऊ विभागास तुटणार नाहीं याप्रमाणें अवघा अन्वय पाहोन सिधांत केला कीं राजपत्राप्रमाणें उभयतांचे वंशाने निमे निमे प्रमाणें गावाचा उपभोग करावा ज्याचे भाऊबंद त्याणी आपलाले विभागांत समजवावे याप्रमाणें हरदोजणास रुबरु आज्ञा करून तुम्हांस हे आज्ञापत्र सादर केले असे तरी मौजे मार हा गाव राजपत्राबरहुकुम अमल चालत आला असेल त्याप्रमाणें निमें मेघःशाम बलाल यांजकडे व निमे श्रीराम श्रीधर यांजकडे चालवणें गावचा कारभार उभयेता करितील त्यांचे आज्ञेत राहाणें या पत्राची प्रति लेहून घेऊन असल पत्र भोगवटियास श्रीराम श्रीधर यांजवल परतोन देणें जाणीजे छ ७ जालावल आज्ञा प्रमाण (लेखन सीमा)

बार

प्रत्येक जोडावर (लेखन सीमा) हा सिका आहे

---

श्री

## यादी दक्षणेंतील सरदार प्रत पहिली

१ राधाबाई भावे मरहूम नारायणराव रामदुर्गकर यांची स्त्री
२ रघुनाथ चिमणाजी पंतसचीव
३ भवानीबाई सचीव
४ लक्ष्मीबाई सचीव
५ तुलजाबाई भोसले
६ परशराम पंडित प्रतिनिधी
७ सिदोजीराव नाईक निंबालकर सरलस्कर निपाणकिर
८ श्रीशंकराच्चार्य स्वामी करवीरकर
९ दादाजीराव व्यंकटेश नरगुंदकर
१० भास्करराव नरगुंदकर
११ ह्रासनबी
१२ सुलतानखानु
१३ राजबीबी
१४ ईमाम बीबी
१५ लछीमा
१६ शामसुंदर
१७ जिनदखानु
१८ करीमखानु
१९ माधवराव गंगाधर पटवर्धन मिरजकर
२० परशरामपंत भाऊ पटवर्धन मिरजकर
२१ वामनराव गोविंद पटवर्धन सोनीकर
२२ गोपालराव गंगाधर पटवर्धन मिरजकर
२३ गणपतराव नारायण पटवर्धन मिरजकर सरदार मारूतसर
२४ गंगाधरराव पटवर्धन मिरजकर
२५ गोपालराव रामचंद्र पटवर्धन जमखेंडीकर
२६ चिंतामणराव पांडुरंग पटवर्धन सांगलीकर
२७ गोविंदराव माहादेव पटवर्धन चिंचणीकर
२८ परशराम गणपतराव पटवर्धन तासगांवकर
२९ लक्ष्मीबाई पटवर्धन
३० व्यंकटराव राजे घोरपडे मुधोलकर
३१ व्यंकटराव नारायण घोरपडे इचल-(करंजी)कर
३२ भिवराव विठ्ठल पोतनीस
३३ मनोहरराव पोतनीस
३४ जीऊबाई भानु फडणीस
३५ माधवराव बलाल फडणीस
३६ विठलराव नरसिंव्ह विंचूरकर
३७ रघुनाथराव
३८ येशवंतराव दाभाडे शेनापती
३९ त्रिंबकराव दाभाडे
४० बळवंतराव माधव रास्ते
४१ यमुनाबाई गोखले
४२ वासुदेव पंडित भाऊ महाराज
४३ हरिहर पंडित
४७+ शाहाजीराजे भोसले अकलकोटकर
४८ रामराव नारायण रामदुर्गकर
४९ मनवरखान नबाब सावनूरकर
५० रघुनाथराव पटवर्धन कुरुंदवाडकर
५१ त्रिंबकराव पटवर्धन शेडबालकर
५२ केशवराव पटवर्धन

येणेप्रमाणें बावन नांवे आहेत.

## प्रत दुसरींतील सरदार

१ विठोजीराव निंबालकर निपाणीकर
१ रघुनाथराव निंबालकर निपाणीकर
१ गंगाधर माधवराव चंद्रचूड
१ दौलतराव दाजी घोरपडे

---

+ ४४ ते ४६ आंकडे मूळ प्रतींत नाहींत.

१ तुळजाजी भोसले अकलकोटकर
१ तुद्सखा सावनूरकर
१ चेबुखा सावनूरकर
१ करीमखा सावनूरकर
१ समशरखा सावनूरकर
१ रामचंद्रराव आणा पटवर्धन मिरजकर
१ लक्ष्मणराव पटवर्धन मिरजकर
१ मोरोबा आबा पटवर्धन मिरजकर
१ लक्ष्मणराव राजे घोरपडे मुधोलकर
१ केशवराव राजे घोरपडे ईचलकरं-
जीकर
१ बुवाजीराव पवार
१ रावसाहेब पवार
१ बलवंतराव पवार अमदाबाजकर
१ बापू पवार
१ बलवंतराव कृष्ण मेहंदले
१ जयाबाई जोंधळे
१ भास्कर राम गोखले
१ विश्वासराव भास्कर गोखले
१ नारो राम गोखले
१ बालाजी नारायण नातू
१ रावजी नातू
१ चेंद्रराव पवार
१ महिपतराव पवार
१ नूर ज्याह बेगम
१ व्यंकटराव घोरपडे
१ पांडुरंग माधव फडके
१ भगवंतराव कुंजर
१ रामराव पुरंधरे
१ रंगदीक्षित मराठे
१ तिमपा गोसावी नासिककर
१ मल्हारराव घोरपडे
१ गणपतराव नारायण राजेकर
१ गणपतराव अनंदराव मेहदले
१ भास्करराव गणपतराव मेहदले
१ गणपतराव रामचंद्र कानडे
१ बज्याबाई
१ येशवदाबाई मंत्री
१ सगुणाबाई देवधर
१ कृष्णराव हणमंत
१ नरसिंगराव कृष्ण
१ कोंडी रामसिंग
१ नारायणराव
१ सिलीमाखोडी
१ चंदाबीबी
१ लक्ष्मणराव सदासिव टेंबुरणेकर
१ लक्ष्मणराव सदासिव टेंभुरणेकर
१ लक्ष्मणराव जाधव वाघोलीकर
१ सुभानराव जाधव
१ लाडूजी जाधवराव वाडीकर
१ माळूजीराव घोरपडे
१ भागिर्थीबाई राजेबहादर
१ म्हाळसाबाई राजेबहादर
१ मोरो रघुनाथ देवधर
१ महंमद हनीफ मुनषी
१ नरसिंगराव घोरपडे
१ नारो निळकंठ मजमदार
१ पांडुराव कुंजर
१ रतनसिंग जाधवराव
१ रामचंद्रराव चौधरी
१ सेखमिरा वाईकर याची स्त्री नाव
माहीत नाहीं
१ कलक्टरसो याचे सिरस्तेदार

१ श्रीधरणीधर बावा संस्थान चिंचवड
१ व्यंकटराव अनंत सरदेशमुख
१ विनायकराव देशमुख
१ नारायणराव घोटवडेकर
१ अमृतराव कासी गाडगीळ
१ मल्हारराव पवार मलटणकर
१ माधवराव निलकंठ पुरंदरे
१ आबाजीराव हिंगणे
१ विश्वासराव रास्ते
१ दामोदरराव हिंगणे
१ शामराव लक्ष्मणराव रास्ते
१ कृष्णाबाई सुमंत
१ बापूसो रास्ते
१ चकाबाई जाधव वाघोलीकर
१ गोकुलशेट बिा ठाकुरदास मोहनलाल सावकार
१ भगवंतराव बालाजी मोहरीकर
१ दुर्गाबाई निलकंठराव मजुमदार मृत्य पावले त्याची
१ जोत्याजी माधवराव
१ चिमणाजी विठल पुरंधरे
१ रमाबाई पानसी
१ सर्वोतंम बाबूराव पंत आमात्य
१ बापूजी नाईक जोंधले
१ हकीमखा सावनूरकर
१ सिवराव गोपाळ राजेबहादर
१ त्रिंबकराव माधव राजेबहादर
१ दलेलखान सावनूरकर
१ दुलेखान सावनूरकर
१ मुबारखान सावनूरकर
१ विनायकराव पटवर्धन कुरुंदवाडकर

१ सदर अमीन पुणे
१ नारायणराव अन्हंत सरदेशमुख
१ विनायकराव घोटवडकर
१ विठलराव मल्हार पुरंधरे
१ येशवंतराव पवार मलटणकर
१ गंगाबाई कुंजर
१ अमृतराव हिंगणे
१ व्यंकट रंगाच्यार्य अगरखेडकर
१ लक्ष्मणराव रास्ते
१ कृष्णराव विंचूरकर
१ नानासाहेब रास्ते
१ भिकाबाई जाधव वाघोलीकर
१ विश्वंभर पंडीत
१ रखमाबाई पटवर्धन
१ रामचंद्र पांडुरंग देवधर
१ मेघःशाम दिगांबर मोहरीकर
१ भगवंतराव मल्हार खासनवीस
१ गणपतराव दामोदर हिंगणे
१ अशरीफ खाउ
१ दामोदरराव पानसे
१ मल्हारराव दाजी टेभुरणकिर
१ मनु बिबी
१ महमद अलमखान नबाब चेल्हेकर
१ शेखखान महमद वाईकर
१ रघुनाथराव मंत्री
१ नानासाहेब भोसले अकलकोटकर
१ हरिहरराव पटवर्धन कुरुंदवाडकर
१ त्रिंबकराव पटवर्धन कुरुंदवाडकर

# तिसरे प्रतीतील सरदार

१ राज्याबा पवार
१ पांडुरंग नारायण नातू
१ अमृतराव पवार
१ मुरारराव घोरपडे
१ नारायणराव हनुमंत
१ राघवेंद्रराव हनुमंत
१ माधवराव कृष्ण
१ अनंदराव जाधव वाघोलीकर
१ महमद अजरखा
१ बालाजी लक्ष्मण आठवले
१ वासुदेव नाईक थथे
१ गंगाबाई लेले
१ अंताजीपंत आठवले
१ भास्कर रामचंद्र सोलापुरकर
१ लक्ष्मीबाई राजवडकर
१ विनायक दीक्षित आपटे
१ बापू देव वैद्य
१ विष्णु गोपाळ भागवत धावडसीकर
१ वामनराव देवधर
१ हुरमोजी पारसी
१ दादा दातार
१ दाजीबा शेवडे
१ गणपतराव जाधव जाधवराई
१ निलकंठराव खासगीवाले
१ गणेश हरी बोक
१ माहादाजी नारायण नातू
१ दाजीबा नातू
१ पिराजी घोरपडे
१ बोधराव हनुमंत
१ श्रीनिवासराव हनुमंत

१ गुलाम मोहेदिनखा
१ जीवनराव मजुमदार
१ माधवराव कुंजर
१ परशरामराव घोटवडेकर
१ कृष्णराव सुमंत
१ आपाजीराव मुढे
१ बहिरोपंत मेहदळे
१ दतोपंत पिंगळे
१ कृष्णराव पारसनीस
१ बापूजी नारायण पारसनीस
१ रामराव पारसनीस
१ बालाजी केशव थते
१ विनायकपंत अणा बाघ
१ भिकाजी जनार्दन आठवले
१ बलवंतराव दात्ये
१ बापाजी मोरेश्वर
१ चिंतामण दीक्षित आपटे
१ आपाजी बाबा पैठणकर
१ बाबादेव वैद्य
१ दादो शंकर भागवत
१ दाजीबा देवधर
१ दोराबजी पारसी
१ वासुदेव नाईक दातार
१ दाजी दीक्षित बोक
१ गणपतराव सिर्के
१ चिंतामणराव जाधव जाधवराई
१ गंगाधर गणेश सोमण
१ सिवराम विष्णु धावडसीकर
१ मल्हारराव अबीकर
१ गोविंदराव बाजी बर्वे

१ व्यंकटराव हनुमंत
१ बलवंतराव जाधव वाघोलीकर
१ गणपतराव जाधव वाघोलीकर
१ ज्यानखा
१ बलवंतराव भोसले
१ रखमाजीराव कुंजर
१ बलवंतराव कुंजर
१ अनंदराव मल्हार सुमंत
१ अनंदराव सिर्के
१ अन्याबा मेहेंदळे
१ बहिरो नारायण पिंगळे पेशवे
१ सिवराम पांडुरंग खासगीवाले
१ दादा पुरंदरे
१ खंडेराव बलाल
१ कासीराव सुभेदार
१ कृपाशास्त्री द्रवीड
१ दामोदरराव पारोळकर
१ रामचंद्रराव नगरकर
१ लक्ष्मण त्रिंबक
१ गंगाधर शंकर पुरंधरे
१ लक्ष्मणराव चक्रदेव
१ लाडोजी सितोळे
१ मोरो आपाजी दामले
१ माधवराव रामचंद्र आंबीकर
१ सदासिवराव आगरे
१ अंबादास माहाजन
१ गोविंदराव निलकंठ खासगीवाले
१ हरिपंत बोक
१ गणेश गंगाधर सोमण
१ गोविंदराव रामचंद्र आंबीकर
१ धोंडो गोविंद बर्वे
१ गोविंदशास्त्री आगाशे
१ गोपालशास्त्री माहुलीकर
१ गोविंदराव जोग
१ बाळशास्त्री आगाशे
१ रामशास्त्री माहुलीकर
१ दिनकरराव ओक
१ हनुमंतराव देरकर
१ हरी त्रिंबक रिंगणगांवकर
१ लक्ष्मीबाई ओक
१ भाऊ गेळे
१ जोसी कल्याणकर
१ बापुराव कृष्ण पानशे
१ केशवरा खासगीवाले
१ कृष्णराव माधव पानसे
१ कासिनाथ नारायण रास्ते
१ अनंतराव खासगीवाले
१ कृष्णराव राम पुरंदरे
१ केशवराव कदम
१ खंडेराव कृष्ण निंबगावकर
१ रामचंद्र कासी
१ लक्ष्मण हरी पारोळकर
१ लक्ष्मणराव भास्कर
१ सिवराम नगरकर
१ लक्ष्मण रामचंद्र पुरंदरे
१ धोंडो अनंदराव पुरंदरे
१ नारायणराव चक्रदेव
१ तुकाराम सितोळे
१ मल्हारराव दामले
१ मोरो चिंतामण ओंकार
१ मोरो लक्ष्मण गोळे
१ वामनराव महाजन
१ मेरुशास्त्री गडबोले
१ भाऊशास्त्री गडबोले
१ दाजी दीक्षित मनोहर
१ नारायणराव सर्वोतम हशमनीस

१ गणेश रामचंद्र वोक
१ गणपतराव डेगळे
१ राजसबाई दरेकर
१ जीवनराव त्रिंबक चिटणवीस
१ जनार्दन सदासीव गोळे
१ जनार्दन नारायण देशपांड्ये
१ परशराम भोसले वाईकर
१ पुरषोत्तमराव बलवंत बामुरकर
१ अनपूर्णाबाई वामुरीकर
१ आपा देवं रांजणगांवकर
१ बज्याबा भावे
१ बलवंतराव थथे
१ रामाबाई वर्वे
१ नारायणराव रामफळसीकर
१ नरसिंव्हाच्यार्य रामानुज
१ रघुनाथराव जिवाजी
१ रघुनाथराव कडेकर
१ रघुनाथ अनंदराव दिवाण
१ आंबाबाई चिनीवाले
१ गंगाबाई श्रोती मल्हार श्रोती याची बायको
१ मोर दीक्षित मनोहर
१ माहादाजी रघनाथ टोसर
१ विनायकराव हशमनीस
१ गणपतराव भोसेकर
१ नारायणराव समसेर तलेगांवकर
१ नारायणशास्त्री थथे
१ श्रीपतराव कुंजर
१ अवधूतराव पवार
१ बालकृष्ण रामचंद्र गोसावी पैठणकर
१ परशराम खंडेराव राहातेकर
१ कृष्णराव बलवंत वामुरीकर
१ पिराजीराव निगडे
१ रामराव भावे

१ निलकंठराव येशवंत नगरकर
१ नारायणराव यादव भागवत
१ निलकंठशास्त्री थथे
१ नारायणराव कुंजर
१ नारायण चिंतामण गोळे
१ द्वारकोजी पवार
१ राघोपंत थथे
१ लक्ष्मीबाई करंदीकर
१ जिजीबाई वर्वे
१ राघवाच्यार्य रामानुज
१ राघवाच्यार्य वैष्णव
१ बच्याजी रघनाथ
१ बज्याबा मडेकर
१ सिध्धेश्वरराव चिनीवाले
१ शाहाजी सोमवंशी
१ माहादाजी राजे भोसले
१ माणिकराव निंबालकर
१ सदासिव माधवराव दीक्षित
१ बहिरजी सिर्के
१ भागीर्थीबाई राजमाचीकर
१ त्रिंबकराव अमृतेश्वर पेठे
१ व्येंकूबाई
१ विश्वनाथ बाजी काकिर्डे
१ पार्वतीबाई दाभोलकर
१ गंगाधर विश्वनाथ जोसी
१ भिकाजीपंत आंबीकर
१ राघोबा आंबेकर
१ कृष्णाजीपंत जकात्ये
१ सखाराम सिर्के
१ बाबा देशपांड्ये
१ हेरबादेव वेझरकर
१ विश्वासराव अमृतेश्वर
१ वकील नि॥ पटवर्धन हस्ते ४
१ वकील नि॥ ८

१ वकील नि॥ तासगांवकर
१ वकील नि॥ शेडबालकर
१ वकील नि॥ ईचलकंरजीकर
१ वकील नि॥ नरगुंदकर
१ वकील नि॥ पंतसचीव
१ वकील नि॥ निपाणकर
१ येशवंतराव थोरात
१ यादवराव देवकाते
१ शामराव येशवंत
१ सदासिवराव
१ भवानीबाई मंत्री
१ नारायण बावा देहूकर
१ दामोदर चिंतामण देशमुख
१ संभाजी राजे भोसले
१ सावजीराव निंबालकर
१ अनपूर्णाबाई पटवर्धन
१ तानाजी सिर्के कुटरेकर
१ अंबाई मरहूम तुको अनंदराव याची स्त्री
१ अमृतराव पेठे
१ गोविंद पाध्ये पंढरपूरकर
१ बापूजी विश्वनाथ काकिर्डे
१ विसाजी रामजोसी जांबुलपाढकर
१ विसाजी त्रिंबक आंबेकर
१ नरसो त्रिंबक आंबेकर
१ विसाजी भिकाजी जकात्ये
१ आंबरसिंग सिर्के
१ अमृतराव देशपांड्ये जुनरकर
१ श्रीधरणीधर देव संस्थान वाक्षेर
१ अनंदराव तुकदेव
१ गोपालराव बर्वे
१ रामराव कडेकर
१ वामनराव रामचंद्र कठोरकर बर्वे
१ अनंदराव थोरात

१ हयबतराव व्यंकटेश पोतनीस वाडगांवकर
१ वकील नि॥ जमखेडीकर
१ वकील नि॥ चिंचणीकर
१ वकील नि॥ कुरुंदवाडकर
१ वकील नि॥ मुधोळकर घोरपडे
१ वकील नि॥ रामदुर्गकर
१ वकील नि॥ येमुनाबाई गोखले
१ वकील नि॥ अकलकोटकर
१ वकील नि॥ जिऊबाई भानु फडणीस
१ नारो रघुनाथ सहश्रबुधे
१ भगवंतराव गोविंद पिंगले
१ निराबाई कडेकर
१ सवोत्तमराव केरुलकर
१ विंचुरकराचे वकील
१ येशवंतराव आकोबा वकील
१ कृष्णराव गोविंद काले
१ हसनी मिरजाखा रासिनकर
१ व्यंकटराव हिंगणे
१ गणपतराव येशवंत वोकील
१ कृष्णाजी लक्ष्मण पुरंदरे
१ नारो धोंडदेव पुरंदरे
१ बालकृष्णराव पुरुषोतम वामोरीकर
१ व्यंकटाच्यार्य
१ मल्हारराव सोमवंसी
१ दुर्गाबाई धायगुडे
१ बालकृष्णराव दाभोलकर
१ हरिपंत आपटे
१ नारायणराव रामचंद्र तुलसीबागवाले
१ भाऊ खंडेराव पुरंदरे
१ बापूजी गंगाधर पुरंदरे
१ रखमाबाई कानडी
१ रामराव नारायण पळसीकर
१ रामचंद्र बळवंत दात्ये

१ येशवतंराव बलवंत मिरकिर
१ गणपतराव
१ विठलराव
१ सदानंद गोसावी देहूकर
१ भाऊ पवार
१ बालकृष्णपंत सहस्त्रबुधे
१ खंडेराव गणेश वेढेकर
१ सखाराम नारायण केरोळकर
१ सईबाई राईरीकर
१ रंगराव विनायक पुरंदरे
१ नरहर शामराव पिंगळे
१ सोराजी रतनजी पारसी
१ येस्तानखा रासिनकर
१ श्रीपत खंडेराव निंबगांवकर

१ सापुरजीशेट पारसी
१ चिंतामणराव धायगुडे
१ कृष्णराव दाभोळकर
१ केशवराव जोसी
१ नारायणराव त्रिंबक राजमाचीकर
१ लक्ष्मीबाई रास्ते
१ खुशालसिंग
१ दाजी अनंदराव
१ अनंदराव सोमवसी
१ वामनराव माधव राईरीकर
१ सिवरामशास्त्री टोकेकर
१ रमाबाई रास्ते
१ सुभेदार मेजर परशरामसिंग

**गो. वि. आपटे**

# शेवटच्या शाहूमहाराजांचा जाहिरनामा

श्री

नकल

सिका आष्टकोनी

स्वस्ति श्रीराज्याभिशेक शके १४४ बहुधान्य नाम संवत्छरे चैत्र शुध्ध पंचमी भृगुवासरे क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी याणी समस्त लोकानिहाये यास जाहीर व्हावयाकरितां आज्ञा केली ऐसी जे राजश्री बाजिराव रघुनाथ याणी कुटुंबसुधां नजरबंदीत ठेऊन शेवटी प्राणाचा हि घांत करावा ऐसी योजना केली त्याचे कामगार याजकडून समजण्यांत आले त्या तऱ्हेची आमरयादा कोणते हि प्रकारे करण्यात कमती केली नाही हे वर्तमान कपणी इग्रज बहादूर यास समजल्यावरून त्याणी कैलासवासी माहाराज याचे खानदानावर नजर देऊन बाजिराव याचे प्रतिबंधातून खुलासा करून आसनारूढ केले आणि बहुत समारंभ केला त्याजवरून सरकारचा बहुत संतोष होऊन या सरकारची व सरकार कपणीची दोस्ती जाहली जे त्याचे दोस्त ते इकडे दोस्त त्याचे दुसमान ते इकडील दुसमान हे सर्वांस महशूर व्हावे म्हणोन आज्ञापत्र सादर केलें आसें जाणिजे लखनालंकार मोरता मोरतबांत आक्षरा मर्यादेय विराज्यते

रुजु सांा
मंत्री
बारसुद सुरुसुद बार बार

**गो. वि. आपटे**

# बहेरु कवि

टांकळी मठांतील चाड अनुक्रमांक १० वें व वेटाळें अनुक्रमांक १४ वें यांत या कवींचे सुमारे ५०।६० अभंग आहेत. कविकाव्यसूचींत यांचें नांव नाहीं. चाड व वेटाळें हीं सहज १२५ वर्षांमागचीं आहेत. या कवीविषयीं जास्त कांहीं माहिती मिळत नाहीं. त्यांच्या अभंगांवरून असें दिसतें कीं, म्हातारपणीं त्यांचा एकुलता एक मलगा निवर्तला. त्या शोकाच्या संतापांत त्यांनीं देवाची बरी च निर्भर्त्सना केली आहे. संतापाच्या अभंगांपैकीं नमुन्यासाठीं पांच अभंग येथें देतों. आपल्या या वर्तनाचें त्यांनीं एका अभंगांत समर्थन केलें आहे, तो अभंग शेवटीं सहावा म्हणून येथें देत आहें.

(१)

नष्टा नारायेणा । दुष्ट कर्म केलें । शेंधूंत बुडवीलें । जहाज माझें ॥ १ ॥
वैर साधुनीया । पुत्र माझा नेला । ध्वज हा मोडीला । परलोकींचा ॥ २ ॥
दुख ते भोगावे । किती हे दिवस । कधीं हें आयुश । सरेल माझे ॥ ३ ॥
आहा रे आदृष्टा । कैसी वेसी धाव । घातकी हा देव । कळो आला ॥ ४ ॥
मागें पुढें तुवा । न केला विच्यार । कैसी आणिली धाड । आम्हावरी ॥ ५ ॥
बहेरु म्हणे देव । चेंडाळ घातकी । काये आलें हातीं । सांग तुझ्या ॥ ६ ॥

(२)

पर्वताची राई । राईचा पर्वत । ऐसी तुझी मात । शास्त्रें रडती ॥ १ ॥
तो पुरुषार्थ तुझा । कोठें तो राहीला । वाहावत गेला । धुळीमाजी ॥ २ ॥
नाहाक ते भावीक । लाविचेले ध्यानीं । केली धूळधाणी । संसाराची ॥ ३ ॥
खाया नाहीं अन्न । वस्त्र न नेसाया । औदशा भोगाया । लावी पाठीं ॥ ४ ॥
बहेरु म्हणे विठ्या । निर्दय पाषाण । याच्या संगें कोण । सुखी जाला ॥५॥

(३)

धराया डाहाळी । बैसावया ठाव । नाहीं तो उपाव । केला ऐसा ॥ १ ॥
किती हे **काळी** । करावी जीवाची । कोण या मनाची । समजुत पाडी ॥ २॥
पेटला हा आग्न । नीघतील ज्वाळ । कोण हे सीतळ । करिल माझे ॥ ३ ॥
हारपली वस्त । जीवा भ्रम होये । कोठें आहे काये । समजेना ॥ ४ ॥
बहेरु म्हणे कैसें । वोडवलें कपाळ । कोणे देसीं बाळ । नेला माझा ॥ ५ ॥

(४)

थोर हे विश्रांत । होत माझे चित्तीं । कैसा त्या भवतीं । भवलासी ॥ १ ॥
मोडुनिया छाया । उन्हांत बैसवीले । उद्वेग लावीले । संसारीचे ॥ २ ॥
किती तळमळ । जीवा सोसवेना । कोण माझ्या मना । देइल धीर ॥ ३ ॥

राहावे कोण्हे स्थळीं । जाऊं कोण्हे देसीं । कैसी हे वीवसी । आम्हा आली ॥ ४ ॥
शक्ती हे राहीली । न दीसे डोळा । केसें हें कपाळा । दुख आलें ॥ ५ ॥
**बहेरु** म्हणे आम्हा । न साहावे वेधना । मारी रे दुस्माना । येक्या घायें ॥ ६ ॥

(५)

सवा लक्ष नाती । त्यांत उणे येक । म्हणोनी बाळक । नेलें माझें ॥ १ ॥
होतासी निपुत्री । बुडालें संतान । म्हणोनी माझे तान्ह । घेउनि गेला ॥ २ ॥
आपुलें तें हीत । केलेसी दुर्जेना । दुज्याची करुणा । नये मनीं ॥ ३ ॥
परदुख सीतळ । आंगी नाहीं वेधना । दुज्याचें जाणेना । सुख दुख ॥ ४ ॥
आलें हें आपेश । उजळ करी माथा । देईं माझ्या सुता । आणोनीया ॥ ५ ॥
काये उणे होये । ज्याचे त्यास देता । आपेश हें माथा । घेऊं नये ॥ ६ ॥
किती या जीवाचा । करावा आक्रोश । नाहीं दया लेश । तीळभरी ॥ ७ ॥
पारधी कसाया । येक वेळ दया । परी या घातकीया । दया नाहीं ॥ ८ ॥
**बहेरु** म्हणे याच्या । कापीयेल्या जीभा । म्हणोनीया उगा । मैंद जैसा ॥ ९ ॥

(६)

करीतो प्रार्थना । येतो लोटांगणी । परिसा संतजेनी । विनती माझी ॥ १ ॥
निंदा अथवा स्तुती । तयाची करावी । वाचे न बोलावी । आणीकाची ॥ २ ॥
परीसस्वभाव । लोहा आलिंगणे । पिटितां ही सोनें । करी त्याचें ॥ ३ ॥
आम्ही तो पतीत । स्वामी तो पावन । तारावया दीन । ब्रीद बांधी ॥ ४ ॥
आतां ते नीत्य । नाहीं याचे घरीं । मागें पुढें न विच्यारी । करी भलतैसें ॥ ५ ॥
बोलियेलो आम्ही । दुखाच्या संतापें । संतजेनीं कोप । न धरी याचा ॥ ६ ॥
**बहेरु** म्हणे यानें । गांजियेलें मज । नव्हतें कांहीं काज । बोलायाचें ॥ ७ ॥

**शं. श्री. देव**

---

# कृष्णदास जयरामाचें सीतास्वयंवर

जयरामस्वामी वडगांवकरांचें अप्रसिद्ध सीतास्वयंवर रा. भावे यांजपाशीं आहे. राजवाड्यांचे कऱ्हाडसंग्रहांत त्याची एक त्रुटित प्रत मला मिळाली. ग्रंथ ओवीबद्ध असून अत्यंत रसाळ आहे. छापला पाहिजे. स्वामींच्या महाराष्ट्रकवींत छापलेल्या अपरोक्षानुभवाप्रमाणें च या हि ग्रंथाची भाषा आहे; व तितका च तो गोड आहे.

या ग्रंथाचा एक विशेष असा आहे कीं, रामायणी कथा वर्णन करितांना तिच्यांत रहस्यरूपानें अध्यात्मसिद्धांत विवरिले आहेत. सर्वत्र वर्णन अध्यात्मदृष्टि डोळयापुढें ठेवून लिहिलें आहे. जनक राजा म्हणजे भावार्थ, रावण म्हणजे अहं-रावण अशा कल्पनांनीं व वर्णनांनीं सदर ग्रंथ अथपासून इतिपर्यंत भरला आहे.

या ग्रंथाचा दुसरा विशेष म्हटला म्हणजे यांतील कथावैचित्र्य. प्रथमाध्यायांत 'तये ( जनकाच्या ) विदेहनगरिं ॥ ब्रह्मविद्ब्राह्मणाचा घरिं ॥ सुबुद्धि मातेचा उदरिं॥ विवेकावतारिं पद्माक्ष जन्मे ॥ ३४॥ याचि पुर्वकथासंगति ॥ प्राप्तिछा नगर पद्मावती॥ साधन विवेक हा निश्चीति ॥ पद्मांक्षनृपती राज्य करी ॥ २५ ॥ अतिदक्ष आर्तभुत ॥ नाना साधने अनुष्टीत ॥ मुमुक्ष श्रद्धायुक्त । जो विरक्त साधकु ॥ ॥ ३६ ॥ तेणें केलें अनुष्ठान ॥ लक्ष्मी जाली प्रसन्न ॥ तो म्हणें माय वो जाण ॥ कंन्यां आपण होई माझी ॥ ३७ ॥ येरि म्हणे स्वामिनें अवतरणें ॥ तेव्हां मज कन्या होणें॥ मज हें न घडे स्वतंत्रपणें ॥ तुवां आराधणें ज(ग)द्गुरु ॥ ३८ ॥ मग पद्माक्ष आपण ॥ जाला हरिध्यानपरायण ॥ हरि म्हणे सुप्रसन्न ॥ कर जोडुन मागें राजा ॥ ३९ ॥ लक्ष्मी कंन्यां होये मज ॥ ऐसें स्वामी मागतों तुज॥ उपरि लक्ष्मीयेसिं गुज॥ अधोक्षज सांगतु ॥ ४० ॥ भगवंत म्हणें रमेसी ॥ वाढली प्रकृती राजसी ॥ आम्हां स्मराति देवऋषी ॥ करूं वेगींसिं अवतारू ॥ ४१ ॥ पद्माक्षें मागीतलें वरदान ॥ तेथ तुवां प्रकटावें आपण ॥ लंके वरूनीयां जाण ॥ घडेल आगमन मिथुळेसी ॥ ४२ ॥ स्वधर्म राजा दशरथ ॥ यंज्ञ करी पुत्रार्थ॥ आम्हां प्रकटणें तेथ॥ जनकाचे तेथ भेटि तुम्हां ॥ ४३ ॥

पुढें राजानें पद्माक्षेचें 'मांडिलें स्वयेंवर उछायें' ४८. त्या वेळीं देवदैत्यांचें तुंबळ युद्ध झालें व 'शुद्धवृति देव पळालें ॥ दुष्टवृति दैते लोटले ॥ भक्तिरत्न हातीचें गेलें ॥ धिग ज्यालें पै माझें ॥ ५५ ॥'

'मग पद्माक्ष या युद्धांत पडला. पुढें त्यानें जनकाचे नगरांत 'ऋषीवंता'चा जन्म घेतला. पद्माक्षी या गडबडींत अग्निकुंडांत शिरली होती ती बाहेर येऊन आतां रडूं लागली. इतक्यांत कुबेराचा पराभव करून रावण पुष्पकांतून चालला होता तो तिला धरूं धावला. ती पुनः अग्नींत शिरली. अग्नी रावणानें विझविला तों त्याच्या हातीं येक रत्न लागलें तें त्यानें पेटींत ठेविलें. मंदोदरीनें ती उघडली तों त्यांतून एक कन्या आली. तिला भयानें त्यांनीं टाकून दिली.' इत्यादि कथा आहे.

द्वितीयांत मागें सांगितलेला ऋषीवंत जनकापासून भूमिदान मिळवितो इ० कथा आहे. तृतीयांत तो ऋषीवंत विवेकी ब्राह्मण तें शेत नांगरतो, त्याला पेटी सांपडते, तो व प्रधान ती पेटी राजास देतात, त्या पेटींतून सुंदर कन्या निघते व सर्व जगांत आनंदीआनंद होतो.

चौथ्यांत सीतेनें भार्गवरामाच्या धनुष्याचा घोडा केल्याची कथा आहे.

पांच–सहा यांत विश्वामित्रमखरक्षणार्थ रामयाचना वगैरे विषय आहेत.

सातव्यांत विश्वामित्रानें राम हा सत्पात्र आहे अशी शिफारस केल्यावरून वसिष्ठ त्यास ज्ञान सांगतो व तेणेंकरून त्यास निजात्मबोध होतो अशी कथा आहे।

आठव्यांत ( ओ. सं. २३२ ) रामाची समाधि वर्णिली आहे. विश्वामित्रानें रामास जगउद्धारार्थ समाधिचें व्युत्थान करण्याची प्रार्थना केली. **जीवसमाधि व**

शिवसमाधि असे समाधीचे दोन भेद कल्पिले असून पहिली म्हणजे जीवसमाधि ही एकट्याचे कल्याणाकरितां व दुसरी म्हणजे शिवसमाधि ही स्वतः कृतार्थ होऊन इतरांस तारण्याकरितां साधावयाची असते, इत्यादि विवेक श्रीवसिष्ठांनीं सांगितल्यावर रामचंद्र पुनः भानावर आले व पुढें ते विश्वामित्राबरोबर जाणार असें वर्णन आहे.

नवव्यांत ( ओ. सं. ९७ ) ताटकेचा म्हणजे च देहबुद्धीचा नाश वर्णिला असून विश्वामित्रमखसंरक्षणार्थ राम आल्याचें लिहिलें आहे.

दहाव्यांत ( अपूर्ण ६० च ओव्या आहेत) विश्वामित्रयज्ञसंरक्षण वर्णिलें आहे.

अकराव्यांत ( ओ. सं. ९० ) अहल्योद्धार आला आहे.

बाराव्यांत ( ओ. सं. ९१ ) मुख्य वर्णन सीतारामांच्या दृष्टादृष्टीचें आहे.

तेराव्यांत ( ओ. सं. ९५ ) जनकाकडे सर्व राजे येतात, त्यांत अहिरावण येतो व उताणा पडतो इ० कथा आहे.

चवदाव्यांत ( ओ. सं. ८६ ) सीतारामविवाह वर्णिला आहे. त्यांत सभेंत ' गौरविले सेटे माहाजन ' असें वर्णन करून कवीनें न कळत स्वकाल सूचित केला आहे.

पंधराव्यांत ( त्रुटित ) दशरथजनकभेट व लग्नसोहोळा व इतर बंधूंचे विवाह वर्णिले आहेत.

सोळाव्यांत ( १०१ त्रुटित ) सोहोळा च विस्तारिला आहे. एकविसावा त्रुटित आहे.

कविता किती चांगली आहे हें खालील उताऱ्यावरून कळून येईल. तिसऱ्या अध्यायाचा प्रारंभः—

" श्रीरामसमर्थ ॥ ब्राह्मण सविवेक मुर्ति ॥ क्षेत्र वाहे नाना युक्ती ॥ वैराग्य-बळें आंगवण पुरती ॥ पुर्णप्राप्ती नीजस्वार्थें ॥ १ ॥ देहबुद्धीचें कठिण ॥ सद्युक्तीनांगरें नागरुन ॥ विकल्पपेड़ि उचटुन ॥ टाकिलें वेंचुन नये तिकडे ॥ २ ॥ वारुळें मोडीलीं कामाचीं ॥ विखरें फुंफाती क्रोधाची ॥ विवेक नीजबळें ठेंचि ॥ टाकिली साचिं नये ने वाटे ॥ ३ ॥ लोभबोरांटिया ॥ मोहें जडती वोखटिया ॥ खाणोनी मुळेंसिं तोडि-ळीयां ॥ नेल्या कुडावया महाशक्ती ॥ ४ ॥ वाद करकरत्या करवंदी ॥ तोडुनी ांडील्या आधीं ॥ व्येर्थ वेह्कळी दुर्बुद्धी ॥ समुळ छेदि विवेकु ॥ ५ ॥ कामना ाडळीया सवजडी ॥ मुळया रुतल्या कडोविकडी ॥ जेणें गुंति पडे गाढि ॥ विवेक ाडी वैराग्य हस्तें ॥ ६ ॥ भुमी व्याली वासनावेली ॥ गुप्तमुळें खोल गेली ॥ वरी लांबें स्तारीलीं ॥ कांहीं केलीं तुटेनां ॥ ७ ॥ वरिवरी तोडुनी सांडीती ॥ नवं तें विस्तारे गुति ॥ तिणें पडिलें विवेकाप्रती ॥ मग युक्ती विवेकें केली ॥ ८ ॥ स्मरोनी यस्थ नारायण ॥ वैराग्ययुक्त आंगवण ॥ विवेकें मांडीली आपण ॥ भुमीशोधन

नीजनीष्ठा ॥ ९ ॥ मग नित्यत्वें सावधान ॥ सुक्ष्म दृष्टत्वें करी शोधन ॥ मुळीं कंद असे मन ॥ त्यातें जीवन वासुदेव ॥ १० ॥ मग वासुदेव स्थीती । मन मुरडीलें निजहस्तीं ॥ भुमिशोधन नीश्चीती ॥ हरीनाम कीर्ति गर्जती ॥ ११ ॥ येवं रजतमवृती विकार ॥ शोधुनी सांडीलें साचार ॥ सत्वभुमी केली अरुवार ॥ विपरीत अंकुर नांहीसे केलें ॥ १२ ॥ परतोनी पाळी नांगरु धरिला ॥ तवं नवल चमत्कारु जाला ॥ नांगरु मुखेंवरी आला ॥ नीधी जोडल्या नीजभाग्यें ॥ १३ ॥ ब्राह्मण पोहे नीजदृष्टी ॥ तवं मंगळ मांदुस गोमटि ॥ आनंदु न समाये पोटीं ॥ अदृष्ट सृष्टीं सफळ जाली ॥ १४ ॥ सत्वभुमीचा पोटिं ॥ भजनमांदुस गोमटि ॥ पाहातां नीवताहे दृष्टी ॥ हरुषें सृष्टि न समाये ॥ १५ ॥

**दत्तो वामन पोतदार**

# बहिणाबाईची संतनामावळी

श्री. नानासाहेब मिरीकर, अहमदनगर, यांस उपलब्ध झालेल्या बाडांपैकीं कांहीं त्यांनीं मजजवळ दिलीं. त्यांपैकीं क्रमांक ५ चे बाडांत बहिणाबाईकृत संत-नामावळी आहे. इतर नामावळींत व ह्या नामावळींत विशेष हा आहे कीं, बहिणाबा-ईनें आपण स्वतः पाहिलेल्या संतांचा स्पष्ट उल्लेख केलेला आहे व शिवाय स्त्रीजाती-विषयीं स्वाभिमानपूर्वक च जणूं कांहीं उद्धरलेल्या स्त्रियांचा हि उल्लेख केलेला आहे. आपणांस आज माहीत असलेल्या संतांपेक्षां जास्त संतांचीं नांवें वरील नामावळींत सांपडतात. सदर नव्या संतांचें काव्य हि असलेंच पाहिजे. तें धुंडाळून काढण्याचें श्रेय कोण घेरें घेईल ? नामावळी मंडळापुढें हजर ठेविली आहे.

### ॥ संत नामावळि ॥

संतनारायण प्रतक्ष जाणा : साधकासि जीवदान : जयाचे स्मरणें जाति सर्व दोश वैकुंठ तें भुवण : परंपरा होचि कुळदेव आम्हा बोलति वेद आपण : शुक वाम-देव व्यास वसीष्ट निरंतर करूं त्याचे स्मरण रे या ॥ १ ॥ धृ. ॥

संत आम्हा देव संत अम्हा देव संतचरण भाव जडला : सदा नाम त्याचे उचारू वाचें हाचि करूं जप भला : नित्य स्नानसंध्या करू देवार्चन परम धर्म भक्त(ा) ला : गाऊं नाचो नित्य करूं हरीकथा आम्हासि तो सुखसोहळारे या ॥ छ. ॥

सिद्ध रूपि मुनि शैव वैष्णव योगी मानुभाव जाणा : गण गंधर्व क्षये किन्नर शडदर्शणाच्या खुणा : जे जे भक्त कोन्ही होऊनि गेले न करवे त्याचि गणणा : ॥ उचारिता वाचे वाढल मंथ सकळा मार्से लोटांगणरे या ॥ २ ॥

व्यास रुषी आणि वैष्णव भक्त अठ्यासी सहस्त्र मुनि : सुरनर पंन्नग भक्त आनेग मिळाले जे चक्रपाणि ॥ तया संतामंता नमन माझे चौयुगामाजी जे ज्ञानि ॥ भावभक्ति मनें वाचा काया हे ठेवियेली त्याचे चरणिरे या ॥ ४ ॥

मुद्गल विष्णुदास आच्युताश्रम पाठकनामा रोहिदास : मत्छद्र गोरख सालया रसाळ चौभाशा सिद्धमुद्धेश : मृत्युंजय आणि रेणुकानंदन विठावरवळसीद्ध नागेश : मकुंदराज आणि श्रीधर आवधूत सदा करूं नामी घोशरे या ॥ ५ ॥

जनजसवंत एका जनार्दन भानुदास मिराबाई ॥ जयदेव जाल्हण परमानंद जोगा नित्यानंदभक्त पाहि । **कान्हया** हरिदास भोजलिंग **पोशा** तुळसीदास **नरसाबाई** । कुर्मदास अंत देव भक्तजन आठवति माझा हृदईरे या ॥ ६ ॥

निवृत्ति सोपान ज्ञानदेव जाण मुक्ताई वटेश्वर : **काकोमडका बाळाजनका बौंका** चोखामेळा खेचर : परसा भागवत जनमैत्र नागा **हरमा** परम पवित्र : बहिरोपिसा आणि कान्होपाठक उच्चारू हे निरंतररे या ॥ ७ ॥

कबीर कान्हपात्र गोराकुंभार सांवता नरहरि सोनार : नामा माल्हा विठा नारा दामसेटी परम भक्त साचार : जनी राजाई माता गोनाई हे जातिचि सिंपि साचार : सदा माझे देही आठवति हे न पडे तयाचा विसररे या ॥ ८ ॥

नरसा मेथा आणि **बाबा उदगीरीकर व्यंकटेश** निबाजी भक्त : **रामदास रामभक्त रंगावा दताबा** स्मरावा नित्य : सुबारण्य आणि **निंबाजी** हरिदास **कृष्णाजी** हृदयीं स्मरत : ऐसे या कलयुगी आवतरले योगी त्याचे पाई दृढ चितरे या॥ ९॥

**कृष्णदास आणि केशवानंद सिवकल्याण या मूर्ति ॥ शंकर गोसावि देखीयेले डोळा दासावा कल्याण कीर्तिः ॥ सीवाजी गोसावी माझा मी धाकला ज्याचा तो ध्यातसो चिति : यैसे निजभक्त हृदई माझा वाहतसे नेणो किति ॥ १० ॥**

देवदास देवदत्त देवाजी **देमयादत** गोसावि : **बापुजिबावा** वडी **आखुबावा** आठवति माझा जीवि : सांगितले संत गुप्त ही असति त्यासी नमस्कार भावी : आता कोण उद्धरल्या स्त्रिया त्याचि नावे परिसावी ॥ ११ ॥

लक्षुमि आठ सत्यभामा आदि नारी सहस्त्राही सोळा : पहिल्या द्रौपदी सीता मंदोदरी तारा या या उद्धरल्या पार्वती सावित्री अहल्या [illegible] : [illegible] या देवाहूति पतिव्रता उद्धरल्या या [illegible] या ॥ १२ ॥

[illegible] तुका [illegible] नानक [illegible] **रामोपनदास** [illegible] ॥ १३ ॥

# विष्णुदास नामा पाठककृत द्रोण व भीष्म पर्वें

१ हीं पर्वें मंडळाकडे रा. हरी रामचंद्र भागले, वेंगुर्लें, यांजकडून रा. हरी रघुनाथ भागवत यांचे मार्फत नुकतीं च आलीं. पोथी पूर्तकाली कागदावर सुवाच्य लिहिली आहे. या पोथींत एक उद्योगपर्वांतील 'कृष्णाशिष्टाई' नांवाचें प्रकरण पाठ-पोट पंधरा पृष्ठें लिहिलेलें आहे. तें जीर्ण स्थितींत आहे. सदर प्रकरणाच्या ओव्या २८६ आहेत. शेवट असाः—

॥ इति श्री उद्योगपर्व भारत । कृष्णानित्ती उतरें समर्थ ।
॥ श्रीविष्णुदास विनवींत । श्रोतिं दत्त चीत्त करावें ॥ ८६ ॥

इतिश्री श्रीमन्माहाभारते शतसहश्रसंहितायां वियाशाक्यां कृष्णसीटाई संपुर्णमस्तु ॥

२ द्रोणपर्वांचे प्रसंग ९ आहेत. पहिला प्रसंग त्रुटित आहे. पहिल्या प्रसंगाची शेवटची ओवी अशीः—

॥ पाटकनामा म्हणे संतां । थोर संग्राम होईल आतां ॥
॥ तें सावधान होवोनि श्रोता । कथा परिसा भारथिं ॥ ११६ ॥

दुसऱ्या प्रसंगाची शेवटची ओवी—

" पाटकनामा म्हणे संतां । पवित्र हे भारथि कथा ।
नामें श्रवणें दोपाथा (!) । यक श्लोकमात्रें करोनि ॥ १११ ॥

तिसरे प्रसंगाची शेवटील ओवी—

" इतूका जंवं नेम केला । मग बळिभद्र तिर्थासि गेला ।
यावरि जो वृतांत जाहाला । तें सांगे विष्णुदासनामा ॥ १२५ ॥

चवथे प्रसंगाची १०६ वी ओवी 'तें सांगे नामा विष्णुदास' अशी आहे. प्रसंग ५, ओवी १०५ वी 'तें सांगे विष्णुदास नामा'. प्रसंग ६, ओवी ९८ वी वरील प्रमाणें. सातवे प्रसंगाच्या २५ ओव्या असून शेवट वरीलप्रमाणें च. आठवे प्रसंगाच्या ४७ ओव्या असून शेवट 'म्हणे नामा विष्णुदास' असा आहे, नववे प्रसंगाच्या १५९ ओव्या असून, शेवट " म्हणे नामा विष्णुदास " असा आहे. नवव्या प्रसंगांत द्रोणाचार्यवधाचा विषय आहे. या पुढें या पर्वाचे आणखी कांहीं प्रसंग होते किंवा कसें तें समजत नाहीं.

३ भीष्मपर्व अध्याय १ ला, आदिः—

"महा भारथि ग्रंथ सोरस । सांगे पाराशराचा व्यास ।
" प्रसंन्न हावोनि ऋषिकेश । म्हणे विष्णुदास नामा ॥ १ ॥

शेवट—' म्हणे नामा विष्णुदास ' ॥ २८ ॥ विषय, कृष्णानितिवर्णन.
अध्याय दुसरा शेवट ' म्हणे नामा विष्णुदास ' ॥ ५६ ॥
अध्याय तिसरा शेवट ' ते सांगे विष्णुदास नामा ' ॥ ९ ॥
अध्याय चवथा शेवट ' तें सांगरे विष्णुदास नामेया ॥ ११ ॥
अध्याय पांचवा शेवट सदरप्रमाणें ओव्या ॥ ३७ ॥
अध्याय सहावा शेवट सदरप्रमाणें ओव्या ॥ १६६ ॥
अध्याय सातवा शेवट ' म्हणे नामा विष्णुदास ' ॥ २४ ॥
अध्याय आठवा शेवट सदरप्रमाणें ओव्या ॥ ३ ॥
अध्याय नववा शेवट सदरप्रमाणें ओव्या ॥ १३४ ॥
अध्याय दहावा शेवट सदरप्रमाणें, ओव्या ॥ ६ ॥

या अध्यायाचे शेवटीं नकलकारानें लिहिलें आहे तें:—

" स्वस्ति श्री नृप शा ( लि ) वाहान शकें १७०४ सुभकृत नाम संवछरे कार्तिक मासें शुद्ध दशमी मंगळवारी पुस्तक समाप्त केलें ॥ वोविया संख्या ४७५ ॥ इति श्री भिस्मपर्व काव्य नामदेवि ॥

या मित्तींत तिथीचा व वाराचा मेळ नाहीं. दशमीस गुरुवार पाहिजे.

४ वरील उल्लेखांवरून पाहतां, या टीकाकाराचें संपूर्ण नांव विष्णुदास नामा पाठक असें ठरतें. रा. पांडुरंग नरसिंह पटवर्धन यांचे संग्रहीं असलेल्या विष्णुदास-नामाकृत द्रोण व भीष्म पर्वांच्या पोथ्यांचा मेळ सदरील पोथीशीं बिलकुल नाहीं. ओवीसंख्या भिन्न आहे, अध्यायविषय भिन्न आहे व भाषा हि भिन्न आहे. मौजे उदापूर, ता. जुन्नर येथील रा. प्रभाकरपंत जोशी यांचे संग्रहीं विष्णुदासनामाकृत भारताचीं तेरा पर्वें आहेत. त्यांतील द्रोण व भीष्म पर्व यांचे आदि व अंत सदरील पोथीशीं जमत नाहींत ( भा. इ. सं. मंडळ-अहवाल १८३२, पृ. ३४ ते ३६ ). तेव्हां, अश्वमेध, पंचतंत्र, भरतभेट इत्यादि प्रकरणांचा कर्ता व हा विष्णुदास नामा पाठक या व्यक्ती एक च असाव्यात. रा. चांदोरकर यांचे संग्रहीं या पाठकाचें भरतभेट प्रकरण शके १५५६ त लिहिलेलें आहे ( चांदोरकरसूची, पृ० ५७ ). त्यावरून हा पाठक सोळावे शतका पूर्वी झाला असला पाहिजे. कदाचित्, हा पाठक एकनाथांचा हि समकालीन असावा. यास प्रमाणें सदरील पोथ्यांत दिसून येणारें भाषेचें स्वरूप. उदाहरणार्थः—

१ तुं भवार्णव तरावेया तारु । किं वीषये वणवेयांत जळधरू ॥ १६ ॥

कृष्ण शिष्टाई,

२ पांडव आमुचे सखे । त्यासि तुम्हीं देताती दुःखें ॥ ३२ ॥
३ तुझेया अपराधाचि गणणा । लेखा न करवे कोणा ॥ ४३ ॥

४ अपकिर्तीनें कैसेया जिणे—द्रोणपर्व, प्रसंग २, ६८

५ पुत्रपणें विर नायक ॥ राखिली पितेयाची भाक ॥ ७० ॥

५ या नामा पाठकानें सबंध भारत रचिलें असावें.

खं. चिं. मेहेंदळे

---

## श्रीनिवृत्तेश्वरी ग्रन्थ संशोधकांनीं शोधून काढावयास नको काय ?

### श्रीनरहरिवरद

यादी पुस्तके नावनीसीवार खा। मुकुंद आबाजी कुलकर्णी मौजे निगडी ता। सातारा श. १७१२ भाद्रपद वद्य २

१ श्रीज्ञानेश्वरी आधे १८
१ श्रीभागवत आधे ३१
१ श्रीसमश्लोकी वामनकृत आधे १८
**१ श्रीनिवृतेश्वरी आधे १८**
१ श्रीरुक्मिणी सेंवर आधे १८
१ श्रीविवेकसिधु आधे १८
१ आनंदलहरी वोव्या १५४
१ स्वात्मा आनुभव २२८
१ परमामृत प्रकर्ण १४
ये।। संख्या ३२५

येणेंप्रमाणें एक अस्सल मोडी यादी टांकळी मठांतील गळाठ्यांत होती. टांकळी मठाचा विंचुरकरांशीं व विंचुरकरांचा निगडीशीं संबंध होता, तेव्हां ही यादी टांकळी मठांत सांपडावी, यांत आश्चर्य नाहीं.

या यादींतील विशेष महत्त्वाची बाब म्हणजे श्रीनिवृत्तेश्वरीचा उल्लेख होय. हा ग्रन्थ कोठें उपलब्ध असल्याचें हि ऐकण्यांत नाहीं. खुद्द श्रीज्ञानेश्वरांच्या गुरुमहाराजांचा ग्रन्थ मागें कां पडावा हें समजत नाहीं. महाराष्ट्रानें हा ग्रन्थ मिळविला पाहिजे. महाराष्ट्रवाङ्मयांत त्या ग्रन्थाचें विशेष महत्त्व आहे. १७१२ त निगडी येथील कुळकर्ण्यांच्या संग्रहीं जर तो ग्रन्थ होता तर १८३८ त तो ग्रन्थ उपलब्ध होण्याविषयीं निराश होण्याचें कांहीं च कारण नाहीं. संशोधकांनीं शोध करावा.

शं. श्री. देव

---

## मुक्तेश्वराचा एक अप्रकाशित अभंग

टांकळी मठांतील एका चिटोन्यावर मुक्तेश्वराचा खालील अप्रकाशित अभंग आढळला.

गोहत्या घडली ज्याला । आम्ही संत म्हणूं त्याला ॥ १ ॥
नाहीं केलें मद्यपान । वृथा त्याचें संतपण ॥ २ ॥
इतुकें घडे जया ठाईं । **मुक्तेश्वर** तया पाईं ॥ ३ ॥

यांत गोहत्या म्हणजे इंद्रियदमन व मद्यपान म्हणजे ब्रह्मानंद, असा अर्थ असावा, असें वाटतें.

**शं. श्री. देव**

## जुनीं महाराष्ट्रीय गीतें

( हप्ता नं. ४ )

### गौरीचीं गाणीं

महाराष्ट्रांतील कुणबी व मराठे लोकांत श्रावण मासांतील गौरीच्या सणाचें महत्त्व विशेष आहे. त्या सणाचे दिवशीं ह्या लोकांतील स्त्रिया व कुमारिका पूर्वापारपासून चालत आलेलीं जीं गाणीं म्हणत असतात त्यांतील कांहीं पुढें देण्यांत येत आहेत.

माळ्यान मळा नांगरिला । माळ्यान मळा नांगरिला ॥
घेतला रूप्याचा नांगरू । घेतल रेसमी पाडसोरु[1] ॥
माळ्यान मळा नांगरिला । माळ्यान मळा वजविला[2] ॥
घातल लिंबुणीच आळ । घातल लिंबुणीच आळ ॥
लिंबुणी झाल एक रोजु । लिंबुणी झाल दोन रोजु ॥
लिंबुणी झाल तिन रोजु । लिंबुणी झाल चार रोजु ॥
लिंबुणी झाल पाच रोजु । लिंबुणी झाल सहा रोजु ॥
,, ,, सात ,, । ,, ,, आठ ,, ॥
,, ,, नऊ ,, । ,, ,, दहा ,, ॥
,, ,, अकरा ,, । ,, ,, बारा ,, ॥
,, ,, तेरा ,, । ,, ,, चौदा ,, ॥

---

१ चंन्हाट–दोरखंड. २ कुळविला.

,, ,, पंध्रा ,, । ,, ,, सोळा ,, ॥
,, ,, सत्रा ,, । ,, ,, अठरा ,, ॥
,, ,, एकुनिस,, । ,, ,, इस ,, ॥
लिंबुणी इरडुनिजी आली । लिंबुणी पानजी फुटली ॥
लिंबुणी आली एक्या पाना । लिंबुणी आली तिन पाना ॥
,, ,, चार पाना । ,, ,, पाच ,, ।
,, ,, सहा ,, । ,, ,, सात ,, ।
लिंबुणी आली गुडघ्याइवडी । लिंबुणी आली कंबरइवडी ॥
लिंबुणी ढाळ्याजी फुटल्या । लिंबुणी आली एक्या ढाळ्या ॥
दोन ढाळ्याजी फुटली । तिन ढाळ्याजी फुटल्या ॥
चारु ढाळ्याजी फुटल्या । पाच ढाळ्याजी फुटल्या ॥
लिंबुणी मोहोरजी आला । पहिला मोहोर झडुन गेला ॥
मागला म्होर लागु झाला । लिंब व लागली जिऱ्याएवडी ॥
लिंब व झाली मिऱ्याएवडी । लिंब व झाली हरभऱ्याएवडी ॥
लिंब व झाली सुपारीएवडी । लिंब व झाली लिंबवाएवडी ॥
लिंब व लागली देटोदेटी । हारा भरला काटोकाटी ॥
गेली माळिण बुरडाची आळी । ................. ॥
माजा बंदुजी होशील । बांदिव हाराच देशील ॥
घेतला बांदिवजी हारा । आली निघुनि वाड्याला ॥
घेतल्या बांदिव चेपल्या । घेतली मोत्याची चुंबळ ॥
गेली निघुनि मळ्याला । माळ्याच्या मळ्याला ॥
माळ्याच्या मळ्याला कुपानकाटी । लिंब व लागल्याति देटोदेटी ॥
हारा भरला काटोकाटी । हारा भरला काटोकाटी ॥
घेतला गुडग्या मांड्यावरी । घेतला उरापोटावरी ॥
घेतला डोइशिरवरी । घेतला डोईशिरवरी ॥
माळीण गेली नगराच्या आतु । आळोआळी सादवु[1] लागली ॥
फुल व घ्या बायानु । लिंब व घ्या दादानु ॥
सइच्या कानावर उतार[2] गेला । माळीण कुण्या नगरीची ॥
सइ मी तुझ्या सासऱ्याची । माझ्या सासऱ्याची कशी हाइति ॥
सर्वै हाइत सुखी । तुमचा भरतार दुखी ॥
येडी झालीया राइ । गेली मातच्या जवळी ॥
माजी माताच होशील । सासऱ्या मला पाटवशील ॥
इऊन दे मर्दुरि बा हट्ट[3] । भरून दे कवलारी बा पेट[4] ॥

१ सादविण्याचा आवाज. २ गावाचें नांव. ३ बाजार. ४ बाजारपेठ.

घीन साडीन ग चोळी । घीन नाड नी गोंड ॥
मग सासऱ्या पाठवीन । गेली पित्याच्या जवळी ॥
( पित्यानें वरच्या सारखें च उत्तर दिलें ) येडी ग झाली राइ ॥
गेली बंदुच्या जवळी । बंदुजीच्या जवळी ॥
माजा बंदुजी ईशील । सासऱ्या मला नेशील ॥
मग तो सुत्रान ग बंदु । गेला मातच्या जवळी ॥
अग अंबिका ग माना । कर भुकच लाडु ॥
कर तानच ग लाडु । बाळला सासऱ्या पाठवीन ॥
बाळ जेवायाजी गेली । पहिला घास च पडला ॥
मोठाबा सुकुन[1] झाला । त्यात कशाचा सुकुन ॥
आपल्या सासऱ्या जायाच । निगाली वाड्याच्या बाहेरी ॥
आडव शेर्णाच तिरड । मोठा सुकुन गा झाला ॥
त्यांत कशाचा सुकुन । आपल्या सासऱ्या जायाच ॥
निगाली नगरा बाहेरी । लागली वनाच्या वाटला ॥
एक वन वलांडिलि । दोन वन वलांडिली ॥
तिन वन वलांडीली । चार वन वलांडिली ॥
चवथ्या पाचव्या वनाला । आल व राइच नगरू ॥
गेली नगराजवळी । गेली नगराच्या आत ॥
गेली वाडियाजवळी । गेली वाडियाच्या आत ॥
सासच्या पाया पडु गेली । सास बोलु लागली ॥
सोन गेलया निघुनि । आली लाकची भरणी ॥
जावच्या पाया पडु गेली । ( जाऊ हि सासुप्रमाणें च बोलली. )
नंदच्या पाया पडु गेली । सिता तू सावित्री हो ग ॥
सोन्याच चुड तू लेग । जलमी राज तू कर ॥
घेतला सोन्याचा खराटा । लोटल्या सरगीच्या वाटा ॥
आपला वळकुनि आणिला । आर चाकरानु नापरानु ॥
कुडा सरगीच्या वाटा । अशा च रांडा[2] येतिलया ॥
आपला वळकुन नेतिलया ॥

२

कोंब बाइ कोंब । कळकीचा कोंब । वाकडा तिकडा गगनी गेला ॥
सोन्याच्या सुरिन देटी उतरला । तो बाइ दांडा पालकी चडविला ॥

---

१ येथें 'सुकुन' हा शब्द अपशकुन या अर्थी वापरलेला आहे.
२ विधवा बायको ह्या अर्थी हा शब्द वापरला आहे.

त्या बाइ पालकीत कोण देवं बस । आमच्या गावचा म्हादेव बसं ॥
असा म्हादेव बरवा । दंडी रूमाल हिरवा । रूमालावरी ॥
काय कार्य परी । मोती झळकत तुन्याचरी ॥

## ३

माजा ख्योळ येशीच्या दारी । पारवा धुमतो बुरुजावरी ॥
त्यांचाई पाखरांच गुंजवाणी डोळ । ते बाई पाखरू सर्वत खेळ ॥
सबच्या लोकानी नवाल केल । नवाल करता गेल मळ्याला ॥
फुलाची न्हावन आली देवाला ॥ १ ॥
राजसा पाखरा बा राजसा पाखरा । जा माज्या माहेरी ॥
माज्या माहेरीच कमानी दरवज । त्यावरि बसजा बा, त्यावरि बसजा ॥
घयाला सांग जा । तुमच्या लेकिन कवसाल केल्याति ॥
साकळ्या मोडुइनि वाळजी केल्याति । मोडुन दे बाळाई ॥
घडवीन सवाई ॥ २ ॥

## ४

साति संकर बनामंदि । एकला गणु माजा वनामंदि ।
गणुच्या आइला सांगुनि धाडा । गणुन वाळ गमीवल ।
गमीवल तर गमवूंद्या । गणुला घरला घेऊन या ॥ १ ॥

## ५

काळ वांग कोरील । शेर तुप माइल ।
आमच्या गावच्या म्हारुति दिपवल जळ ॥ १ ॥

## ६

हिरव्या रानच पिवळ ठस । गवराइ म्हणी माज म्हायार दिस ॥
म्हायार न्हव बाइ सोनारवाडा । सोनारणी बाइ की सोनार दादा ॥
बाळाच वाळ झाल का न्हाइ । फिरुन ये जा सजनीबाई ॥ १ ॥

## ७

वाटची हाराळी पाण्यान तुंबली । आमची गवराइ जोडव्या रुसली ॥
जोडव्या रुसली । आणीन दुसरी ॥ १ ॥

## ८

याव रकमिणी आमच्या आळी । हिरा मोराची तुमची चोळी ॥
हिरा मोरावैन गावा गेला हरी । गावा गेला हरी बसली पंडरी ॥
पंडरपुरीचा सोनार बलावितु । गवराबाइला साकळ्या घडवितु ॥ १ ॥

---

१ सभेत.

९

पुतळ्या ठेविल्या तबकातु । किस्णाग लावी हातु ॥
राद घालग गळियातु । समजावितो हरी ॥
रादा रुसली सुंदरी । शिराळ सोनारा बलवितो ॥
शेरग सोन घेतो । वजन करितो ॥
रकमाबाईला पुतळ्या घडवितो ॥ १ ॥

१०

काळी चोळी करवंद जाळी । गळ्यांत म्हौनां[1] माळु ॥
दोनी डेर रंगाविल्याति । डाळिंबिची शाइ हु ॥ ( ? )

११

आड्याल गवराइ धुण धुती । पड्याल सकरुबा[2] धुण धुतो ॥
आड्याल गवराइ न्हाऊन धुऊन उबी राही । तिचा शिनगार काय होऊ ॥
नव्या घागरी जुन राळ । आता गवरी कवा येण ।
आता येण वरसा । येर वरसा लवकरी ॥
फेडीन तुजी नवसरीं । शंकर आमचा जावाइ ॥
गवराइ आमची बाळाइ । शेला घेईन सवाई ॥ १ ॥

१२

आंगणी तापत बा दुदु । दुदा पिवळी बा सायी ॥
लेकी गवरी ग बाई । एवड जिवुनि ग जाई ॥
आतां काइ जेऊ माइ । दारी शंकर उभा हाइ ॥ १

१३

साति डोंगार दं ( धुं ) डुनि । आणल सिताफळी रोपु ॥
लावल सिताच्या ग दारी । सिता तेला पाणी घाली ॥
पाणी घालता आल्या कळ्या । रामु कळ्या जी तोडितु ॥
संकर दुरड्या भरितु । वर शेलाजी झाकितु ॥ १ ॥

१४

काळी कपिली बा गायी । गेली वइल्या रानाला ॥
चारा मोत्याचा चरलु । मटी बा तानु लागली ॥
गेली येमुना नदीला । एक घोट पाणी प्याली ॥
दोन घोट पाणी प्याली । तिन घोट पाणी प्याली ॥
चवथ्या पाचव्या घोटाला । वाग गर्जवण्या घालितु ॥
आता भवळे खातो तुला । नग खाऊ वागा मला ॥

---

१ मोहनमाळ. २ शंकर.

सारांश रूपानें लिहिलेली आहे. या दोन्ही बखरी भोंसलेमंडळी अत्यंत प्रमाण मानतात. या दोन्ही बखरींतील उपरिनिर्दिष्ट वहिवाटीसंबंधाचे उल्लेख खालीलप्रमाणें आहेत:—

१ "वाई नजीक गोळे वाडीस गोळे बंड होते ते बंड बुडविले व आफजलखान वजीर फौजेसुद्धा आला त्यास मारून फौज लुटून बरबात केली नंतर शिवाजी राजे यांची स्वारी रायगडाहून फौज सुद्धा निघोन सातारा येथे दाखल जाहले नंतर शके १५८० विकारीनाम संवतसरे फसली सन १०६८ साली श्रावण शुद्ध ५ रोज शनवारी सातारा किल्ला शिवाजी राजे यांनी घेतला त्या किल्याचे नांव पुर्वी पाद्शाही आमलांत हुके बयान म्हणोन होतें तें नांव मोडून सातारा असें किल्ल्याचें नांव ठेविले आणि शुक्रवारचा श्री देवीचा चौघडा व शनवारी किल्ला फते जाला सबब शनवारचा चौघडा सुरू केला नंतर शिवाजी राजे यांची स्वारी फौज सुध्यां निघोन जाऊन सूर व संग्राम हे दोनी किले पाद्शाई होते ते सर केले आणि किल्यांत ठाणीं आपली बसऊन किल्याची नावे नवीन चंदन वंदन ठेविली"

२ "शके १५८१ विकारी नाम सवछरे फसली सन १०६९ या साली सीवाजी राजे याणी श्रावण वद्य पक्षी रोज शनवार किला सातारा घेतला फते जाहली त्या दिवसापासून चौघडा सुरू जाहला देवीचा शुक्रवार व फते शनवार असी वहिवाट चालत आहे व पूर्वी पाद्शाई आमलात किल्याचें नांव हुके बयान होते तें सिवाजी राजे यानी मोडून सातारा असें ठेविले"

वरील उताऱ्यांत शुक्रवारचा चौघडा देवीचा व शनवारचा सातारा किल्ला फते झाला त्याबद्दलचा असें स्पष्ट आहे. शुक्रवारचा दिवस देवीचा असल्यामुळें, त्या दिवशीं चौघडा झडणें हें ठीक आहे. प्रश्न काय तो शनवारचे चौघड्याचा उरतो. वरील दोन्ही उताऱ्यांतलि मित्यांचा व गणिताचा मेळ पाहिला असतां, या प्रसंगाची मिती शके १५८० विलंब नाम संवत्सरे, **श्रावण शुद्ध पंचमी शनवार,** फसली सन १०६८ ही कायम येते.

**पां. न. पटवर्धन**

---

## इंग्रजाकडील मोधी वकील कधीं व कशानें मेला ?

कृष्णाजी विनायक सोहनी यांच्या पेशव्यांच्या बखरींत किंवा ग्रँट डफ यांच्या इतिहासांत खुर्शुजी मोदी कधीं मेला ती मिति किंवा तारीख दिलेली नाहीं.

"मोदी यांनीं हिरकणी खाऊन प्राण दिला" असें बखरकार म्हणतात व मोदी विषप्रयोगानें मेला, पण त्यानें आत्महत्या केली कीं त्याजवर दुसऱ्या कोणीं विषप्रयोग केला, याविषयीं इकडे संशय दर्शविला आहे.

धोरगांवच्या निर्णातांच्या दप्तरांत खालील नोंद सांपडली आहे:—

"इंग्रजाकडील मोघी वकील पहिला थोर शाहाणे माणुस दोही कडील कल रा-खुन चालले ते शके १७३६ भाव नाम संवत्सर माघ वद्य ५ पंचमीस येकाये (की) ताहा पटका रात्रपर्यंत दरबार करून आले ते व्याधा होऊन मध्यरात्रीं वारले ॥"

म्हणजे सन १८१५ फेब्रुवारी तारीख २८ रोजीं मोदी वारला, असा या नोंदीचा अर्थ होतो.

शां. श्री. देव

# भांडवलकर

पुढील अस्सल कागद आपले मंडळाचे सभासद रा. रा. बाबुराव बाळाजी भांडवलकर, मोकासदार मौजे सोमयाचें करंजें, ता॰ बारामती, यांजकडून मिळाले. यांजकडून व पूर्वी शके १८३३ मधील ताम्रपट रा. विनायक लक्ष्मण भावे यांस मिळालेला रा. चांदोरकर यांनीं संपादून, आपले मंडळाचे शके १८३५ चे वार्षिक इतिवृत्तांत प्रसिद्ध केला आहे.

भांडवलकर जातीनें गुरव असून, त्यांजकडे माण देशांतील भोसल्यांच्या कुलस्वामीचें म्हणजे श्रीशंभुमहादेवाचें पुजारीपण होतें. पुढें थोरले राजाराम महाराजांस मल्हारजी कुलथोजी व त्याचा मुलगा दत्ताजी भांडवलकर यांनीं कर्नाटकांतील धामधुमीचे प्रसंगीं विशेष सहाय्य केलें. त्यांची ही कामगिरी सेनाजी घोरपडे यांणीं महाराजांचे नजरेस आणिली, व या सेवेबद्दल त्यांस इनाम व खास सरदेशमुखी वतनापैकीं कांहीं भाग मिळाला. मल्हारजी कुलथोजी हे सेनापंचसहस्री होते. पेशवाईंत जानोजी भांडवलकर हा रघुनाथराव दादासाहेब यांचे पक्षास मिळून होता. तो फाल्गुन वद्य १२, शके १७१९ चे सुमारास वारला. हल्लीं या घराण्याकडे कालमानानुरूप मूळची इनाम जमीन व मोकासा सरंजाम हीं मौजे सोमयाचें करंजें येथें चालू आहेत.

अस्सल बरहुकूम नकला पुढें दिल्या आहेत.

## लेखांक १

मु॥ करंजे, ता. भिमथडी, जि॥ पुणें, येथील राहणार रा. रा. बापुराव बाळाजी भांडवलकर, मोकाशी, यांचा वंशवृक्ष

o = नकल.

जानोजी*
कृष्णाजी
हणमंतराव
रामजी
बयाजी
बाजीबा
बजाबा
धोंडीबा
बाळाजी°
आबाजी
गंगाराम°
बापूजी°
बापूराव°
रामचंद्र°
येशवंत°
आप्पाजी
तुकाराम
नारायण
विश्वासराव
शंकर°
हरी°


= नकल; ० = विद्यमान.

## लेखांक २

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके १६ शुक्ल नाम संवत्सरे आस्विन बहुल चतुर्थी रविवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजाराम छत्रपती याणि राजश्री मलारजी भांडवलकर

यांसि आज्ञा केली अैसी जे तुम्ही यकनिष्टपणे स्वामीसेवा करावी आपले उर्जीत करून घ्यावे स्वामीकार्य करून दाखवावे हे उमेद धरिता म्हणून

कळों आलें राजश्री मलार दादाजी सेना पंचसहस्त्री याणीं कितेक विदित केले त्यावरून कळोन तुमचा मजुरा जाळा तरी यकनिष्टपणें राहाटी केलिया उर्जीत च होईल हें स्वामीचे राज्य तुम्हा मऱ्हाटे लोकांचे आहे आवघे मिळोन कस्त करिता तेव्हां गनिमाचा काये हिसाब आहे तुम्हा लोकीं या प्रसंगी स्वामीकार्य करून दाखवावे हे उचित च आहे या करितां तुम्ही माारनिलेजवळी येऊनु यक जमावे स्वामीकार्य करणे तुमचा मुदा मकसूद हे लिहून पाठवितील त्याप्रमाणे स्वामी मनास आणून पारपत्य व बेगमी करितील समाधान असों देणे आणि माारनिलेकडे येणे जाणिजे **जाणिजे**

सुरुसुद

~~~~~~~~

## लेखांक ३



स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके १७ प्रमोद नाम सवत्सरे आस्विन सुध दसमी गुरुवासर क्षत्रिये कुलावतंस श्रीराजाराम छत्रपती याणी राजमान्य राजश्री मल्हारजी भाडिवलकर सेनापंचसहस्त्री यासी आज्ञा केली येसी जे विनंती पत्र पाठविले ते प्रविष्ट जाले स्वामी या प्रांतीतून स्वार होऊन कर्नाटकांत गेले मागे कितेक सेवक लोकी बेइमानी केली परंतु आपणं स्वामींच्या पायापासी येकनिस्ट राहोन सेवा केली विसां पंचविसा स्वारानंसी गनिमासी गाठी घालून खटा केला याकरिता राजश्री शंकराजी नारायण याणी आपणास वतन मौजे करंजे तर्फ निरधडी येथील निमे पाटे-
~~~~~~~~

लगी व इनाम चावर नक जमीन दिल्ही आहे याची सनद राजाशेची आहे स्वामींनि रुपाळु होऊन तुम्हांस सनद पाठवावया आज्ञा केली पाहिजे म्हणोन तपशिलें लिहिले तरी तुम्ही एकनिष्ठपणे सेवा केली येर केले स्वामी संतोषी जाले पा ( ? ) हि ये च रीतीने स्वामी सेवा एकनिष्ठपणे करून आपल्या मुजरा करून घेणे करंजेची तिमे पाटेलकी व इनाम जमीन चावर नक दिल्ही आहे ते स्वामीने करार केली असे राजाशेची सनद आहे ते च स्वामीची सनद यांस जाणोन मौजे मजकूरची तिमे पाटिलकी करून इनाम चावर जमीन घेऊन स्वामी कार्य कुशल करीत जाणे अंतर पडो नेदणे जाणीजे त्या प्रांते राजश्री शंकराजी पंडित सचीव आहेती त्याचे आज्ञेत राहोन स्वामीकार्य करीत जाणे बहुत लिहिणे तरी तुम्ही सुज्ञ असा

मर्या
दैयं विरा
जते

मुरुमुद्

लेखांक ४ श्री शके १६१३

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शक १७ प्रजापति नाम संवत्सरे जेष्ट शुध अष्टमी रविवारेर क्षत्रियकुलावतंस श्रीराजाराम छत्रपती याणी राजमान्य राजश्री मल्हारजी भाडवलकर सेनापंचसहस्री यांसि आज्ञा केली येसी जे तुम्ही विनंतीपत्र पाठविले ते पावले आपण स्वामीसेवेवरी येकनिष्ट वर्तोन राजश्री संताजी घोरपडे यांबरोबरी सेवा केली स्वामीच्या किल्याची कितेक हेजिर्वा करून दिल्ही व जमाव सात पाचसे स्वार केले त्यांस पागा दुईस घोडी केली आहेती वरकड सिलेदार आहेती येसी सेवा वळतोन राजश्री रामचद्रपंत आमात्य व राजश्री शंकराजी पंतसचीव व राजश्री संताजी घोरपडे सेनापती यांणी पागेची पंचसहश्री आपणास सांगितली व जमातदार होते त्यास सिलेदारांच्या पंचसहश्र्या व सहश्र्या यांचे सरंजाम करून दिल्हे आहेती तरी स्वामिने येविशी आज्ञापत्रें पाठविली पाहिजेत म्हणोन लिहिलें तें कलों आलें व तुम्हाविशीं राजश्री संताजी घोरपडे याणी हि सविस्तरे लिहिलें त्यावरून हि विदित जालें तरी तुम्ही कार्याचे च लोक आहा तुम्हांपासून स्वामीकार्यास अंतर पडणार नाही येविशीं स्वामीस तुमचा भरोसा च आहे तुम्हांस राजश्री रामचद्रपंत आमात्य व राजश्री शंकराजी पंतसचीव यांणीं तुमचा पंच सहश्रीचा सरंजाम करून दिल्हा तो बरा च दिल्हा जे पंतमारनिलेची सनद जाली ते स्वामीची च सनद तेणेंप्रमाणें स्वामी तुमचे चालवितील व लोकांचे सरंजाम केले असतील तेणेंप्रमाणें हि चालवितील अंतर पडणार नाहीं समाधान असो देणे व आपण लोकादिखील स्वामीसेवेवरी कस्त केली म्हणून राजश्री रामचद्रपंत आमात्य

व राजश्री शंकराजी पंतसचीव यांणी आपणास व लोकास ईनाम करून दिल्हे त्याची पत्रे हि दिल्हीं आहेती विता॥

खासा मल्हारजी भाडवलकर सेनापचसहश्री याचा इनामाचा गाउ मौजे करजे ता॥ निरथडी प्रा॥ पुणे येथील मोकदमी निमे आहे तेथें ईनाम करून दिल्हे चावर १

संताजी सर्जाराउ हजारी मोकदम मौजे मोरवे+ प्रा॥ सिरवले जमीन सेत धान्याचे सेतापैकी चावर १

*आहिरे मोरवे खंडाळे पेट्यांत आहे.

जाउजी अढलराउ जमातीदार मोकदमी मौजे अहिरे प्रा॥ सिरवल येथे ईनाम चावर ·॥·

तुकोजी खोमणे पंचहजारी सिलेदार मोकदमी मौजे कोकले प्रा॥ सुपे ईनाम चावर १

सुभानजी धायेगुडे जमातीदार वतन मौजे खेड प्रा॥ सिरवल येथील मोकदमी आहे तेथे ईनाम विघे ८१५

बाजी कोलेकर पंचसहश्री यास मोकदमी मौजे नादल ता॥ फलटण तेथे जमीन चावर १

तुकोजी गाढवे सेनासहश्री यासी मोकदमी मौजे कालजाई ता॥ फलटण येथें ईनाम चावर ·॥·

येलोजी (लाखर!) हजारी वतन मोकदमी मौजे तरडप ता॥ सांडस प्रा॥ पुणें येथें जमीन चावर १

वेकाजी त्रिमल मजमुदार दि॥ खासा यांचे वतन देसकुलकर्णी कुडाल दुमगाउ ईनाम चावर १

ता॥

स्थल मोरवडपैकी ·॥·

स्थल वगरडपैकी ·॥·

येणेप्रमाणें इनामाची पत्रे करून दिल्हीं अहिती येशास येविशीं स्वामीची अभयेपत्रे असिली पाहिजेत तरी कृपा करून अभयेपत्रें पाठविली पाहिजेत म्हणोन लिहिले ते कलो आले येशास राजश्री रामचंद्रपती व राजश्री शंकराजी पंती जी पत्रे करून दिल्हीं आहती ती स्वामीची च आहेती पंतमानिलेने जे पत्रे करून दिल्हीं असतील तेणेंप्रमाणें स्वामी चालवितील अंतर पडणार नाहीं तुम्ही आपले समाधान असो देणें व लोकांचे समाधान करणें हें च अभयेपत्र समजोन पंतमारानिलेचे सनदप्रमाणे ईनामांचा भोगवटा करून घेणें जाणिजे

**बहुत लिहिणे तरी तुम्ही सुज्ञ असा**

यार

लेखांक ५ श्री आषाढ शुा १३ शके १६१६

श्रीरामचं
द्र चरण नील
कंठ सोनदे
व शरण

आज्ञापत्र समस्त राजकायधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजेश्री रामचंद्र पंडित अमात्य ताहा देसमूख व देशपांडे ताा भूम सुा खमस तिसैन अलफ तर्फ मजकूर यैवजास राजश्री मल्हारजी भाडवलकर याकडे हुजुरून पेशजी च दिधले आहे येथील खडणीचा यैवज साल मजकुरी मारनुलेस पावणे संताजी घोरपडे याच्या सनदेने दुसरियाकडे दोनी रुके घाल ते गैरमजुरा होऊन तुम्ही आपले केले पावाल हे नेमस्त समजणे छ ११ जिलकाद **निदेस समक्ष**

लेखन
सीमा समु
लसती

सुरु सुद बार

---

लेखांक ६ श्री कशी १६१८

माहादेउ

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके २२ धातृनाम संवत्सरे वैशाख शुध चतुर्थी मंदवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजाराम छत्रपती याणी समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री रामचंद्र पंडित अमात्य हुकुमत पन्हा यांसि आज्ञा केली यैसी जे मल्हारजी बिन कुलथोजी भांडवलकर याणी स्वामीचे सेवेसी विदित केले कीं श्री-येथील पुजारेपण आपले पुर्वापर चालत आहे येसे असता श्री चे घडवे कथला करितात तरी स्वामीने गोतमुखे वर हक निवाडा करउन जैसा गोतमुखे निवाडा होईल तैसे पुजारेपण चालविले पाहिजे म्हणोन विनती केली त्यावरून तुम्हांस हे आज्ञापत्र सादर केले असे तरी तुम्हीं गोत जमा करउन त्यांवरी मल्हारजी भांडवलकर याची व घडये याची मनसुफी टाकून श्रीची आण घालून वर हक निवाडा करवणे गोतमुखें

मल्हारजी भाडवलकर यांचे पुजारेपण खरे जाले तरी याचे स्वाधीन करउन पूर्वापार चालल्याप्रमाणे चालवणे बडवे यांस कथला करू न देणे जाणिजे बहुत लिहिणे तरी तुम्ही सुज्ञ असा

मर्या
दॆयं विरा
जते

बार

~~~~~~~~~~

**लेखांक ७** मार्गशीर्ष वद्य ७ शनिवार शके १६२२

श्रीशंकर

राजेश्री राघो त्रिमल
सर सुभेदार सर देसमु
खी प्रां संचीव
गोसावी यास

॥छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्ये स्नो हिंदुराव घोरपडे दंडवत सुा ईहिदे मया आलफ रा मल्हारजी भाडवलकर यांस सुपे प्रां बारामतीची सरदेसमुखी आहे त्यास तुम्ही ईस्कील करिता म्हणौन विदित केले येसियांस पेसजी सरदेसमुखी मानुलेकडे जैसे चालत असेल त्याप्रो दुमाले करणे येविशई उजूर न करणे जाणिजे रा छ २० माहे रजब मोर्तबसुद

लेखन
मर्यादा

श्रीराजारामचर
णोत्पत्ते मालोजी घो
र्पडेः । सुतस्य वैरा
जेर्मुद्रा पण्मुख
स्य विराजते

~~~~~~~~~~

लेखांक ८   श्री   ज्येष्ठ वद्य १० शके १६३१

आज्ञापत्र समस्तसेनाधुरंधर विस्वासनिधी राजमान्य राजश्री चंद्रसेन जाधव-राउ सेनापती तां मोकदमानी मौजे करंजे सोमयाचे ता। निरथडी प्रा। पुणे सुहुर सन आसर आलफ मौजे मजकूर दतनाजी भाइपलकर दि॥ राजश्री बालाजी विस्वनाथ याजकडे मुकासा दिल्हा आहे तरी यासी रुजुपातीने वतौन संदणी प्रमाणे वसूल देणे जाणिजे छ २३ जमादिलासर मोर्तब सुद

विलसती
लेखनाव
धि मुद्रा



बार

---

१ 'मया' लिहिण्यास विसरलासें दिसतें।

लेखांक ९. कार्तिक शुा ५ शके १६३४

श्री

आज्ञापत्र समस्तराज्यकार्यधुरधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री पंत आमात्य तां मोकदमानी मौजे करजे तां निरथडी सुा सलास आशर मया व मौजे मजकूर येशाजी दताजी भाडवलकर याकडे मोकासा होता हाली त्याकडून दूर करून हाली सडोजी भाडव(ल)कर दिमती राजश्री दामाजी माणकेस्वर याकडे जमावाच्या बेगमी बदल मोकासा करार करून दिल्हा असे तरी तुम्ही मानुलेसी रुजु होऊन मौजे मजकूरचा मोकासबाबेचा वसूल यासि देणें जाणिजे छ ३ सौवाल पा॥ हुजूर

खं. चिं. मेहेंदळे

# ज्ञानेश्वरकृत शुकाष्टक–टीकेचा रचनाकाल

इ. स. १९०३ मध्यें " काव्यसंग्रहांत " प. लो. वा. ना. चिं. केळकर यांनी ज्ञानेश्वरांचा सदरील ग्रंथ संपादून प्रसिद्ध केला होता. प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांत आरंभीचें नमन बिलकुल नाहीं, पण समाप्ति मात्र ठाकठीक दिसते. एकंदर ओंवीसंख्या ४९ आहे. गुरु निवृत्तीचे नांवाचा उल्लेख आहे.

रा. माधवराव नारायण डाउ, वकील दारवा, यांजकडून पूर्तकाल कागदावर लिहिलेलें एक बाड आपल्या मंडळाकडे सुमारें एक वर्षापूर्वी आलें होतें. त्यांत लिहिले

त्या इतर प्रकरणांत वरील ग्रंथ हि उतरलेला आहे. एकंदर ओंवीसंख्या ७१ आहे. मूळ अष्टकाचे नऊ श्लोक हि दिलेले आहेत.

रा. डाऊ यांणीं आपले मातुश्रीस मुखोद्गत येत असलेलें हें प्रकरण उतारा करून रुपा करून वाडा सोबत पाठविलेलें मंडळाचे संग्रहीं आहे. त्यांत प्रारंभ असा–

श्रीशुक उवाच–अचिन्त्याव्यक्तरूपाय निर्गुणाय गुणात्मने । समस्तजगदाधारमूर्तये ब्रह्मणे नमः ॥ १ ॥ भेदाभेदौ सपदि इ. इ.

टीका–जयाचा भेदाभेद गळाला । इ. इ.

वाडांतील प्रतींत टीकारंभक वरील ओंवीच्या पूर्वी प्रास्ताविक २५ ओंव्या आहेत. त्या अशा–

## श्री ज्ञानराज

जय जय सकळवंद्या हिं वंद्या । गुरुत्वे होसी अविकार वेद्या ।
तो तुं निजात्म भोगिसी निःशब्दा । निजात्मरूपा ॥ १ ॥
वंद्य म्हणों तरी वंद्यासि ठाव नाहीं । तेथ गुरुत्वासि वाव पाहीं ।
मा निजात्मभोगीं निर्वाही । उरेल काई ॥ २ ॥
कैचा म्हणो तरि स्वतसिद्ध आहे । आहे म्हणे तरी विचारुनि पाहे ।
दोहिचा गमनि निर्वाह होय । तो चि स्वतसिद्ध ॥ ३ ॥
ऐसिया स्वतसिद्ध निर्वाहो । जरि होईल प्रत्यय सुखाव्रावो ।
तें तुझिया सुखाचा सुखानुभवो । होईल जाण ॥ ४ ॥
सुख आणि दुःख हे दोन्ही । हें जेथे गेलीं हारपोनि ।
तेथ तुझा तुं चि होउनी । नादसी स्वयें ॥ ५ ॥
ऐसा तुझा सुखानुभवो । प्रत्यय जयासि आला पाहावो ।
तो दोदील होईल सर्वांगें पाहा वो । तुझिये रूपे ॥ ६ ॥
तुझी रुपा फळली जयासि । तो स्वयें चि पावे निजात्मसुखासी ।
स्वबोध न संडे सर्वासि । हेळामात्रें ॥ ७ ॥
मग नमू ते आदि माया आदि शक्ति । जिचेनि बोधें होये अव्यक्ती ॥
ते मूळ माया मूळ प्रकृति । आदि बीजा ॥ ८ ॥
बीजिं बीजविस्तारु विरूढे । मागुतो तेथें चि दडे ।
तो मुळमाया अतडे । तुझेनि चि ॥ ९ ॥
तु जय अकर्पण करिसी । तैं आठव नाठव उलंडिसी ।
केवळ करोनि राहासी । निर्जिवस्तुसि ॥ १० ॥
आतां नमू तो आदिपुरुष सद्गुरु । जयाचेनि निरसे भवसागरु ।
आणि चिद्रत्नाचा आगरु । दावी दिठी ॥ ११ ॥

चिद्रत्नाची माळिका गोमटी । तुं घालीसि जरी पाटोवाटी ।
तरि पावेन उठाउठी । निजरूपासि ॥ १२ ॥
आतां असो हा अर्चनविभाग । संतासि नमू साष्टांग ।
आणि कवी ते जे चांग । सर्वज्ञ श्रोते ॥ १३ ॥
ऐसी ऐकोनि दीन वाणी । मग समस्त बोलले नाभि ना भी म्हणोनी
आतां वदे वाणीं करुनि । ग्रंथारंभ ॥ १४ ॥
जे बोलीले श्री शुकें । शुकाष्टक कवतुकें ।
ते बोल बोल सम्यक । सत्य करोनियां ॥ १५ ॥
ऐसे ऐकोनि संताचे वचन । बोलता जाला ज्ञानदेव आपण ।
म्हणे तुमचे रुपे करून । बोलेंन महाराष्ट्र ॥ १६ ॥
जे शुकवाणी अति गोल्यता । परिक्षितीसि निरोपिली तत्त्वता ।
नवा श्लोकिं स्वरूपता । दाविली ॥ १७ ॥
ते चि हें निरोपण । संस्कृताचे मऱ्हाष्ट जाण ॥
बोलिजेल वाणी करून । ते ऐंका ॥ १८ ॥
मग घालोनि लोटांगण । अभय कर द्यावा जि मजलागुन ।
तुमच्या रुपावैभवें करून । नेईन ग्रंथ सीद्धी ॥ १९ ॥
हे ऐकोनि निवृत्तीदेवो । म्हणे तुं ज्ञानदेवा अति प्रियो ।
आवडसी मज पाहो । जिवलग पै ॥ २० ॥
अति सखा वाटसी ज्ञानदेवा । म्हणौनि अळंगिला स्वभावा ।
सस्कृताचि मऱ्हाटिवा । बोलेन आतां ॥ २१ ॥
या शुकाष्टकाचि टिका । मऱ्हाष्ट वद तुं स्वमुखा ।
तेणे संत सज्जन संतोषु होतुं का । जे आत्मत्वत्तें ॥ २२ ॥
यां निवृत्तीचिया बोला । ज्ञानदेवो संतोषला ।
मग बोलता जाला । ग्रंथारंभ ॥ २३ ॥
हा ग्रंथ पाहतां मऱ्हाष्ट पर । केवळ वस्तू चि निरंतर ।
प्रबोधें होती आगर । स्वसुखाचे ॥ २४ ॥
चित्सुख हें पदोपदि पाहाता । नाहि ज्ञानासि दुर्लभता ।
तो चि अर्थ वदेन आता । म्हणे ज्ञानदेवो ॥ २५ ॥

शेवटील ओंव्याः—

येथीलिया वोवियाची गौल्यता । आणी कोठें नाहीं सर्वथा ।
वोवीहुनी वोवी आधिकता । निवृत्तिप्रसाद जाली असें ॥ ६९ ॥
येथोनि संपूर्ण जालें निरोपण । अर्थ अर्थविता निवृत्ती आपण ।
संपूर्ण संपूर्ण । संपूर्ण जालें ॥ ७० ॥

ग्रंथ सके बारासे सोळा तरि । पराजय नाम संवत्सरीं ।

कार्तीक शुक्ल द्वितीयां इंद्रायणांच्या तिरिं । ग्रंथ निर्धारि संपला ॥ ७१ ॥

छ ॥ इति श्री शुकाष्टक ॥ सह टीकायां संपूर्ण । श्री गुरुदेवतार्पणमस्तु ॥ श्री राम ॥ छ ॥

साठ संवत्सरांत पराजय नामक संवत्सर येत नाहीं, जय मात्र येतो. शक १२१६ या वर्षी जय संवत्सर येत आहे. नक्कलकारानें परा हीं अक्षरें चुकून जास्त लिहिलीं असण्याचा संभव आहे. पराभव संवत्सर शके १२२८ ला येतो म्हणजे ज्ञानेश्वरांचे समाधिशकानंतर बारा वर्षांनीं. तेव्हां पराभव हीं अक्षरें मूळांत नसावीं. **ज्ञानेश्वरी** शके १२१२ त केली व **स्वात्मानुभाव** हि" शके बारोत्तरें बारांत निवृत्तिदत्त ज्ञानेश्वरांनीं केला ( पहा स्वात्मानुभव ओंवी २५० ). तेव्हां वर दिलेला शुकाष्टकटीकेचा रचनाकाल म्हणजे कार्तिक शुद्ध द्वितीया शके १२१६ हा असंभवनीय दिसत नाहीं.

ग्रंथाची भाषा अर्वाचीन केलेली आहे. ज्ञानेश्वरांनीं ही टीका केली असल्याचें भिंगारकर व चांदोरकर सांगत आहेत.

सं. चिं. मेंहदळे

---

## मराठी कृष्णामाहात्म्य अथवा कृष्णातीरचा वाटाडचा

हें माहात्म्य उरवडें येथें पोतनीसांच्या दफ्तरांत सांपडलें. स्कंदपुराणांत कृष्णामाहात्म्य संस्कृतांत आहे, त्या वरून हें मराठी माहात्म्य मराठी गद्यांत उतरलें आहे. परंतु हें निव्वळ भाषांतर नाहीं. यांत एक विशेष असा आहे कीं कृष्णेच्या तीरावरील प्राचीन तीर्थांचा व अर्वाचीन देवळांचा नामनिर्देश यांत केला असून, तीर्थातीर्थांमधील अंतरें दिलीं आहेत व दोन्ही कांठच्या गांवांचीं अर्वाचीन प्रचलित मराठी नांवें दिलीं आहेत. कोणत्या ऋषीनें कोणत्या तीर्थी कोणते चमत्कार केले तें संस्कृत पुराणांतून घेतलें आहे, आणि बाकीचा मजकूर मराठी भाषान्तरकारानें स्वानुभवावरून रचिलेला आहे. तात्पर्य, प्रस्तुत माहात्म्य म्हणजे एक वाटाडेगिरीचें पुस्तक आहे. पेशवाईत वाटाडेगिरीचीं पुस्तकें नव्हतीं, असें विधान अज्ञानानें कित्येक लोक आजवर करीत आले आहेत, त्यांना हा ग्रंथ पाहून आपलें मत किंचित् बदलावें लागेल. प्रस्तुत ग्रंथ सबंद सांपडला नाहीं; अर्धामुर्धा त्रुटित हातीं आला आहे. ग्रंथाच्या दोन प्रती आहेत; दोन्ही प्रती मंडळाच्या संग्रहास ठेविल्या आहेत.

वि. का. राजवाडे

---

# दत्तनाथ उज्जनीकर

रा० चांदोरकरांच्या संत-काव्य-सूचींत ह्या कवीचें नांव आढळत नाहीं. त्यां कवीचा मठ उज्जनींत अद्यापि आहे. व त्यांत दत्त कवीची च नव्हे तर महीपति, शिवदिनकेसरी, गोपाळनाथ, केशव शिवराम, देवनाथ वगैरे कवींचीहि असंख्य हस्त-लिखित कविता मला पहावयास सांपडली. मठांतील दप्तरांत ज्ञानदेवकृत पासष्टी, तुकोबाकृत अनुभवामृत, जगन्नाथकृत ज्ञानबत्तीशी वगैरे कित्येक प्राचीन लिखित ग्रंथ हि पहावयास मिळाले. या एकट्या मठांत च संशोधकास संशोधनास ६।८ महिने पुरेल इतकी सामग्री सांपडेल. असो. हा साधु व त्यांचा मठ तिकडे फार प्रसिद्ध आहे. महीपति उज्जनीकरास आश्रय देणारा हा च दत्तनाथ होय. कवीनें आपलें वृत्त ऊर्फ परनाळका खालील कवितेंत गोंवलें आहे.

**परनाळका**

दत्त परंपरा, अनंत सोयरा
जोडील निर्धार, मायबाप ॥ १ ॥
वेडा जगनाथ, निंबराज नरहरी
प्राप्त गिरधारी; जनार्दन ॥ २ ॥
तेथे एकनाथ, चिनटला पाईं ।
दत्त भाडा तोही, दत्त वर हीं ॥ ३ ॥
भाऊ दत्त भावा, केशव, अनंत ।
दत्त मठीं राहात, राक्षस भुवनीं ॥ ४ ॥
परंपरा वरी, दत्त नारायण ।
दत्तगुरु चरण, भेटी जाहाल्या ॥ ५ ॥

या वरून हा कवि राक्षसभुवन येथील राहाणारा होता, असें दिसतें. असें सांगतात कीं, दत्तभाऊ ऊर्फ दत्तनाथ हे महादजी शिंद्यांबरोबर उत्तर हिंदुस्थानांत गेले होते ते माहादजी शिंद्यांबरोबर मथुरा, ग्वाल्हेर वगैरे मुक्कामीं असलेले उल्लेख हि त्यांचा घरच्या कागद पत्रांत सापडतात. पाथरगडच्या लढाईंत ते महादजी शिंद्या-बरोबर हजर होते, व तेथून आणलेले दोन ढोल अद्यापि उज्जनी येथील मठांत राखून ठेविले आहेत. पुढे ते महादजी शिंद्यांच्या च अनुरोधानें उज्जनीस मठ बांधून राहिले. ते मोठे सिद्ध व भविष्य वर्तविणारे होते, म्हणून महादजी त्यांच्या उदर-पूर्तीसाठीं गहानाबादची १२०००, ची सनद करून देत होते, पण दत्त भाऊनें तें मान्य केलें नाहीं. तरी शिंद्यांकडून त्यांच्या मठास सुमारें ४०० रु. चें वार्षिक नक्की उत्पन्न हल्लीं आहे. दत्त भाऊस मुलगा नव्हता म्हणून त्यांनीं आपले समक्ष आपल्या जांवयास—सद्भाऊस—आपल्या मागें स्थापिलें. त्याच्या वंशाच्या ताब्यांत

नउ आहे. दत्तनाथ १३६ वर्षांचे होऊन परलोकवासी जाहले, त्यांचा मृत्युकाल संवत् विक्रम १९०५ मार्गशीर्षांतात. दत्तभाऊंची बरीच कविता आहे. ती फार रसाळ. नमुन्यासाठीं खालीं एक देतों.

## पद.

भाउनि येइ विठाबाई। तुज विण मला कोणी नाहीं ॥ ध्रु० ॥
सर्वहि गण गोत आप्त आणि सुत तूंचि सखे आई ॥
कामक्रोधादिक गांजिति हे मज करूं गति कैसी काई ॥
जळावीण तळमळी मासा तव रूपें जीवन देई ॥
दत्त भाउ तव अंतरी लोळत आलिंगुनि प्रेम पान्हा देई ॥

या कवींची हिंदी कविता हि बरी च आहे.

भा. रा. भालेराव

---

# सेख महंमदकृत संतनामावळी

ज्या बाडांत ही संतनामावळी मला सांपडली त्यांत हिचें नांव महाआरति असं आहे; पण या आरतींत बहुतेक संत, ऋषी, मुनी, दशअवतार वगैरे सर्वांचीं नांवें आलीं असल्यामुळें महाआरतीपेक्षां संतनामावळी हें नांव देणें मला जास्त संयुक्तिक दिसतें. लेखकानें नांवें अशुद्ध लिहिल्यामुळें कांहीं नांवांचा स्पष्ट बोध होत नाही. हींत पुष्कळ नांवें—विशेषतः मुसलमान फकिरांचीं—नवीन सांपडतात. संतनामावळी खालील प्रमाणें:—

## माहाआरती

जये जये आरती पीरा पैगंबरा : गोसें कुतुब वलया रुसी आठ्यासी सहस्रां ॥ ध्रु० ॥
सद्गुरु वसिष्ठ दुर्वास : वाल्मीक व्यास : अठरा पर्वे चर्ची भारत उपदेस :
रामायण गीता भागवत : शास्त्रें कवि रास : उपनिषदें ज्ञानी प्रेम : बोध तत्वें साधूस १
सा दरुसनें परीख : नवनाथ सोळा सिध : चराचर खाणी वाणी : थावर जंगम श्रुति वेद :
विधि निषेध चोऱ्यासी : भेदुनी गोविंद : जैसा जळीं आळिपु : रवि तारा चांद ॥ २ ॥
निऊर्ती ज्ञानेश्वर : नामदेव खेचर : एको जनार्दन लोल्या : मुद्गल कबीर :
वटेस्वर सोपान : सुदामा विदुर : बजीद दादू कमळा : धना जाट कुबा सागर ॥ ३ ॥
सांवता कूर्मदास : गडगा पाळा सूरदास : चोखामेळा पुंडलीक : आवडे विठ्ठलास
रवणमोराळ सिध : काको मडक्या हरिदास : रेणुकानंदन बहिरा : कोंडो डागो त्रिमळदास ४
जयेराम तुकोबा : सिंधराजबाबा : आवे कळीग रघुनाथ : कवि जाल्हनमे गोसिवा :
रुक्मांगद भगीरथ : गौतम रंगजीवा उर्दूळ चांडा हनुमा : गंभीर चांदा बरवा ॥ ५ ॥

रामकृष्ण अक्रूर : उद्धव हरिश्चंद्र : जनक कर्ण श्रियाळ : भोज गोपिचंद्र :
चक्रवती विनायेक : विक्रम कुबीर : भर्तृहरी याज्ञवल्क्य : निंबराज गुणगंभीर ॥६॥
नारद मुकुंद ईस्याळ : चेकळीक कविकाळ : साबयैनां गोपजी पदारथ गोपाळ :
अंबऋषी प्रेमधर्म : संतबा वेल्हाळ : मयेकरण नारो : वंदे प्रजन पाळहाळ ॥ ७ ॥
सक संवत सरदाणव : अठरा पगड स्याहाणव : जये विजये भीमक : आपिळका
बिळस वासव :
नक्षत्र तिथी गिन्हे : भुवनें स्वर्ग देव : चित्रगुप्त निशिदीन : शुभाशुभ संचित वावो८
उपमन्या सुक धुरु : कुकुट स्वधीरू : सोम मंगळ बुध ब्रस्पत : दशदिशा सप्त वारु :
मार्क आगस्तीदाया : जति सति रनधीरू : द्वारका स्वेत विरंची : विष्णु गरुड महेश्वरु॥९॥
प्रल्हाद देवदंत : जोतालिंग विख्यात : जयदेव अच्युताश्रम : द्रिगदास भगवंत :
विश्वामित्र जनमेजय: वडवाळ नागेश वितंत: जमळा गोवधन : हिरालाल माणीक उद्त्त१०
दाउद मुकिहिळाळ रोहिदास गुंजलाल : सारजानंदन धाबा : वाका चाणुरजठी माळ :
सारंगा चोभा विप्र विश्वा : मजनु गरीब नवळ : सोनारु पाहडताळी : तिखर चर्पटी निंदुळ११
हाफीज सादीक मनसूर : तानसेन सैन मजुधार : काजी महंमुद जैना मीरा : बाबा
खबर लतीफ:
फरीद सया : जंसतार : इभराईम हरुणी : हिनदुनियामे जाहीर ॥ १२ ॥
सेषादिक काळया : निळकंठ बाळिया : माहालिंग तिमा दामोदर : वैजनाथ विरदाया :
कानिफा जाळंधी सोमा : पुरुषोत्तम येसया : गहिनिदास निपाणी : साति नंदनराया१३
राजनफुळ नैनसा : मन माछिंद्र मनसा : केवळ प्रकास दिनकर : जाधव माधव सु-
दसा :
जगमैत्र मुरारा सरज्या : गोविंदराज वळसा : ळमया बगुळराव : दीपमाळ भीळन
रसा ॥ १४ ॥
मछ कछ वान्हाव नरकळी : फरस वामन बळी : कळकी बौध भाडळ : जांबवंत
वतनमाळी :
पद्मनाभ लका थुळा : आम नमदार कळी : विवेकराज सम दम प्रमार्थ भद्रकाळा ।
हजरत मीरा : कादरी जाहीरा : चमक आरती : जाहीर बतीम फकीरा :
आरा सकुरसी : कांमीळ द्रवेस सुरा : सेख महंमद दरुस्या हीरा ॥ १६ ॥
श्रावण कार्तीक मदु : सत जाद साद ओध : सींभे चक्रवता : वाढ्या जगन्नाथ
इंद्रवधु :
सुलोचन नळ अंगद : सुग्रीव बिभीषण जरासंधु : भोमासुर बंगळा : कडकट जळबंदु १७

---

१ शिबी ?

३३ आवे कळीग ( ! )
३४ रघुनाथ
३५ गंभीरचांद
३६ निंबराज ( १५०० )
३७ येकलिक ( एकलिंग ! )
३८ गोपजी
३९ पदारथ ( प्राण !) गोपाळ
४० संतबा ( पवार )
४१ मयेकर्ण
४२ नारो ( नामदेवपुत्र ! )
४३ जयदेव
४४ अच्युताश्रम ( १५३०-४० )
४५ द्रिंगदास
४६ भगवंत
४७ वडवाळ नागेश ( १३१३ )
४८ जमळा गोवर्धन
४९ हिरालाल
५० माणीक ( बोधला !)
५१ दाउद
५२ रोहिदास ( चांभार )
५३ गुंजलाल
५४ सारजानंदन धाबा
५५ वाका
५६ सारंगा
५७ चोभा
५८ विप्र विश्वा
५९ मजनु
६० गरीब
६१ नयळ ( नरहरी !) सोनार
६२ हाफीज
६३ सादीक
६४ मनसूर
६५ तानसेन
६६ सैन
६७ काजी महंमुद
६८ जैना
६९ मीरा
७० याग्रा सबर
७१ लतीफ
७२ फरीद सय्या
७३ इभराहिम हरुणी
७४ महालिंग ( १४८७ )
७५ तिमा
७६ दामोदर
७७ वैजनाथ ( वैद्यनाथ १५७३ ! )
७८ विरदाया
७९ पुरुषोत्तम
८० गहिनिदास
८१ नंदनराय
८२ जगमैत्र ( नागा १२५२ )
८३ मुरारी सरज्या
८४ गोविंदराज
८५ लमया
८६ बगुळराव
८७ पद्मनाभ
८८ हजरत मीरा कादरी जाहीरा
८९ बतीम फकीर
९० चांगा ( मुधेशा १४२७ )
९१ गोरा ( कुंभार )
९२ रायेभान तोड्या
९३ यरवंट अहीर
९४ यसवंत उद्धत
९५ ढमढेर कद्रु
९६ लकुपिया अर्जुन
९७ त्रिमला
९८ मालो ( १५८०—९० )
९९ हैबत

१०० औचित नागा(अवधूत नागा १५८२!) १०६ विश्वास
१०१ तोडरमल ( १४३० ) राजा ! १०७ सेस फरीद
१०२ जुळकरण १०८ सेना गगना न्हावी
१०३ अकबर ( १४४० )
१०४ बन शहिरी १०९ सेदा मका
१०५ सभू भिक्षुक ११० चतुर्भुज भिका

याप्रमाणें ज्यांचीं नांवें लागत नाहींत तीं सोडिलीं असतां एकशें दहा संतांची नामावलि तयार होत्ये. त्यांत कांहीं नांवें आपल्या परिचयाचीं आहेत, ( कित्येकांचा काल हि आपल्याला माहीत आहे ) कांहीं अगदीं नवीन च आहेत. असल्या नवीन नांवांची संख्या पन्नासाच्या जवळ जवळ भरत्ये; यांपैकीं पंधरा वीस नांवें यवनांचीं आहेत; आणि कांहींना लेखकाच्या लेखनदोषामुळें आपण मुकलों आहों. शेख महंमदांच्या ज्ञानसागरांत "हजरत मीरा पीर जहिरु" असा उल्लेख आलेला आहे. या संतनामावळींतलें ८८ वें नांव "हजरत मीरा कादरी जाहीरा" असें आहे. हें साम्य लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ७८ वें नांव "विरदाया" आहे. याचा चांगला बोध होत नाहीं ( अशीं नांवें या नामावळींत बरीं च आहेत. ); पण महिपतींनीं कथा सांगतांना, त्यांच्या घरीं देव सेवकरूपानें सेवा करण्यास राहिले असतां त्यांनीं आपलें नांव "विर्तिया" ठेविलें होतें, असा उल्लेख केला आहे. वास्तविक एका दृष्टीनें पाहिलें तर या नामसादृश्याचा अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं असें वाटतें; कारण महिपतीचें "विर्तिया" हें नांव देवाचें आहे भक्ताचें नव्हे; या नामावळींतील "विरदाया" हें भक्ताचें आहे-निदान असावें. यदाकदाचित् देवाचें असलें तरी त्यांत कांहीं मोठेसें बिघडत नाहीं. कारण नामावळींत देवाच्या अवतारांचीं व शुद्ध देवाचीं हि नांवें आलीं आहेत. असो.

लेखकानें अशुद्ध लेखन केल्यामुळें कांहीं नांवें दुर्बोध झालीं आहेत हें वर सांगितलें च आहे. उदाहरणार्थ, बावीस, तेवीस व चोवीस हीं नांवें निरनिराळीं आहेत कां एक च आहेत; त्याप्रमाणें सत्तावीस, अठ्ठावीस व एकूणतीस हीं हि निरनिराळीं कां एक च; याचा मुळांत तीं निरनिराळीं न तोडतां एका च ओळींत लिहिल्यामुळें स्पष्ट बोध होत नाहीं. चक्रवति विनायेक कोण ?

यांत एक आश्चर्य वाटण्यासारखी गोष्ट आहे. शेख महंमदांनीं आपल्या या सबंध संतनामावळींत-अथवा त्यांच्या म्हणण्याप्रमाणें महाआरतींत-आपल्या गुरूचा चुकून हि नामनिर्देश केलेला दिसत नाहीं. यांचे गुरु चांग ( चंद्र ) बोधले हे होत. तसें च यांचे समकालीन प्रल्हादबाबा, दाऊळबाबा व गोधडबाबा यांचीं हि नांवें शेख-महंमद देत नाहींत. नाहीं म्हणावयास एके ठिकाणीं फक्त प्रल्हाद असें नांव आलें आहे. पण तें स्नेह्याचें नसून पौराणिक प्रल्हादाचें असावें असें वाटतें; कसें हि असो पण

शेख महंमदांनीं आपल्या (शक १६१८) पूर्वीच्या बहुतेक साधुसंतांचा एकत्र संग्रह केला असल्यामुळें–आणि त्यांपैकीं जवळ जवळ पन्नासांचें तरी नवीन च दर्शन होत असल्यामुळें–महाराष्ट्र व महाराष्ट्रकाव्येतिहाससंशोधक त्यांचे ऋणी आहेत!

पां. मा. चांदोरकर

---

## चोरु मागाकृत नामहंसाची आरति

हा कवि मानभव आहे. मानभवी काव्यांत या "हंस" अगर "नामहंस" अवताराचें नांव पुष्कळदां येतें. दिशाभूल करण्यास कोठें कोठें मुद्दाम जुनीं रूपें योजितात. या पद्यकारांचीं नांवें हि मोठीं चमत्कारिक असतात. प्रस्तुत पद्यकाराचें नांव चोरुमागा आहे! असलें नांव अश्रुतपूर्व असून उच्च वर्णाच्या हिंदुसमाजांत तें ठेवलें जाण्याचा संभव नाहीं. कदाचित् असल्यास अद्यापि कोणाच्या आढळण्यांत आलेलें नसावें. निदान माझ्या तरी नाहीं. असो; आरतीचा आरंभ व शेवट खालील प्रमाणें:—

आरंभः—रुतीये ज्ञान तुवां विधातियासीं केलें।
दाउनि निजरुप हंस नाम वदीलें।
जयदेवा नामहंसा स्वयंशक्तिप्रकाशा।
आरती ओवाळीन शुद्ध चैतन्य व्यसा (?)।
प्रगटी अनादि मार्ग शुद्धचार्या पुरुषा॥

शेवटः—तुझ्या नामाची ध्वनि आइकिली व्यासमुखें।
एकादश पुराणीं, स्थापिला नागदेव भट मार्ग करुनी।
अवस्वरु चोरु मागा मागे प्रेमाची रासी। जयदेवा नामहंसा० ॥

चोरु मागा आपल्या पंथास **भटमार्ग** म्हणतो. लीळासंवादांत हि मानभवां पंथास भटमार्ग असें नांव दिल्याचें आठवतें. चक्रधर यानें हा पंथ काढिला तरी पण त्याचा प्रसार या नागदेव भटानें अथवा भटोबानें केला. हा चक्रधराचा पट्टशिष्य होता. या च चोरु मागानें स्वतः केलेल्या एका दहा कड्यी असलेल्या दत्ताच्या आरतीच्या शेवटीं किंकरु चोरु मागा असा आपला नामनिर्देश केलेला आहे.

पां. मा. चांदोरकर

---

# अवधूतस्वामीचा किंकर माधवेंद्र

सूचींत माधव या नांवाखालीं पांच निरनिराळे माधव दिले आहेत. पण हे अवधूतस्वामीकिंकर माधवेंद्र त्यांपैकीं नाहींत; एवढें च नव्हे तर माधवदास अगर माधवनाथ यांपैकीं हि नव्हत. माझ्या जवळील कांहीं बाडांत या माधवेंद्राचें काव्य पाहवयास सांपडलें. काव्य थोडें आहे; पण पहावयास सांपडलेल्या त्यांच्या या भूपाळ्या, अभंग, आरत्या इत्यादि खंड-काव्यांत त्यांच्या कालाबद्दल थोडीशी माहिती अगर तर्क करण्यास कोठें हि वाव मिळत नाहीं; फक्त यांचे गुरु अवधूत आहेत एवढें समजतें. याची दत्तावर च बहुतेक कविता आहे. कृष्णावर एक आरति आहे. कांहीं गुरूंवर अष्टकें आहेत. एका ठिकाणा यांनीं आपला राव माधवेंद्र असा उल्लेख केला आहे. हे दशनामपंथापैकीं 'पुरी' सांप्रदायी होते व यांचे शिष्य कोणी आनंदपुरी म्हणून होते, अशी तोंडी माहिती एका पुरी मठांतील हल्लींच्या विद्यमान मठपतीनें ( माधवेंद्रांची कविता ज्यांत आहे अशीं बाडें व इतर कांहीं पोथ्या मला ज्यांच्यापासून मिळाल्या त्यांची इच्छा, त्यांचें व त्या गांवाचें नांव प्रसिद्ध करूं नये अशी आहे. या च गांवीं एक पुरी पंथाचा मठ आहे; तेथल्या विद्यमान मठपतीनें ) दिली आहे व त्यांच्या च सांगण्यावरून माधवेंद्र हे १२५ । १५० वर्षांपूर्वी हयात होते व त्यांची समाधी खानदेशांत च शिरड या गांवीं आहे असें हि समजतें. आणि या माधवेंद्राची एक श्रीकृष्ण आरति आहे, ती मोठी गोड आहे. यांनीं "अवधूत सद्गुरु पूर्ण भेटला । संकटामधून दास सोडिला" याप्रमाणें एका अष्टकाच्या शेवटीं व तसा च "उठा उठा सकल जन वाचे वदा गुरुवचन, प्रभात झाली तमानिरसन, सद्गुरु दिनकर प्रकाशला" असा जिचा आरंभ आहे, असल्या भूपाळीच्या शेवटीं 'अवधूत स्वामीचा किंकर माधवेंद्र अनाथ पामर' अन्यायें क्षमा करी दातार, यापरी सावध साधु होती" असा आपल्या अवधूत गुरूचा स्पष्ट नामनिर्देश केला आहे.

पां. श्री. चांदोरकर

---

# श्रीओंकारेश्वर येथील शिलालेख

हे ओंकारेश्वर म्हणजे प्रसिद्ध ज्योतिर्लिंगांपैकीं ओंकारेश्वर नसून खानदेशांतील रावेर तालुक्यामधील खुद्द रावेर गांवापासून कोस दीड कोसावर असलेलें एक महादेवाचें रम्य स्थान होय. स्थान खरोखर च रम्य आहे. एक लहान नदी पश्चिमेकडून पूर्वाभिमुख

वाहत येऊन देवळाच्या पायथ्याशीं वळण घेऊन दक्षिणेकडे गेली आहे. देवळाच्या दक्षिण व पूर्व बाजूस वृक्षच्छाया आहे. देवळाच्या सभोंवार कोट आहे व आंत शिरावयाचा मुख्य दरवाजा दक्षिणेस आहे. आंत आल्यावर दरवाजा व देऊळ यांत पटांगण आहे, देवळाच्या पुढें सभामंडप असून देऊळ पूर्वाभिमुखी आहे. पूर्वेच्या बाजूस उजव्या हाताला कोंपऱ्यांत एक लहान ओवरी काढलेली असून त्यांत शेषशायीची मूर्ति आहे. शेषासकट सबंध मूर्तीची लांबी जवळ जवळ सात विती असून मूर्तीस दोन च हात आहेत. शेषाला तोंडें पांच आहेत. जवळ लक्ष्मीची हि मूर्ति आहे. या तिन्ही मूर्ति फार झिजून गेल्या आहेत व ज्याप्रमाणें पंढरीची श्रीपांडुरंगमूर्ति वाळूची आहे म्हणून प्रवाद आहे ( हा प्रमाद निर्मूल आहे.) त्याप्रमाणें च या हि मूर्ति वालुकामय आहेत असें सांगण्यांत येतें, पण तें खरें नसून मूर्ति प्राचीन असल्यानें पाषाण झिजून गेला आहे इतकें च. या मूर्ति यादवकालीन असून त्या येथें कोणी तरी आणि कोठून तरी उचलून आणून ठेविल्या आहेत. असे प्रकार अश्रुतपूर्व नसून पुष्कळ ठिकाणीं प्रत्यक्ष घडलेले दृष्टीस पडतात. देवळाच्या डाव्या बाजूस दुसऱ्या कोंपऱ्यांत भुयारवजा एका लहानशा ओवरींत एक कार्तीक स्वामीची व एक गणपतीची अशा दोन मूर्ति आहेत. पैकीं कार्तीक स्वामीची मूर्ति सुंदर आहे. सभामंडपाजवळ एक कारंजें आहे. हल्लीं त्यांत पाणी येत नाहीं; समोर च एक दीपमाळ आहे. पूर्वेच्या बाजूकडील कोटास एक दार असून तेथून पलीकडे जाण्यास मार्ग आहे. पलीकडे २।३ कुंडें असून डोंगरांतून जमीनीच्या गर्भातून आलेलें पाणी प्रथम गायमुखाच्या द्वारें सर्वांत लहान असलेल्या कुंडांत येतें व नंतर क्रमाक्रमानें मोठमोठ्या कुंडांतून जाऊन अखेरीस उजवे बाजूस वहात जाणाऱ्या नदीच्या पात्रांत जाऊन पडतें. कुंडाच्या पलीकडे पूर्व बाजूस २ समाधी आहेत; जुन्या आहेत; पण वर कांहीं हि लेख नाहीं. मुख्य देऊळ महादेवाचें आहे आणि त्याचें च नांव श्रीओंकारेश्वर असें आहे. गाभारा लहान आहे व आंत जावयाचें दार जुन्या पद्धतीप्रमाणें ठेंगणें आहे. या दाराच्या खालीं ३ पायऱ्या असून त्यांपैकीं शेवटच्या पायरीवर च प्रस्तुतचा लेख कोरलेला आहे. लेख अर्वाचीन आहे. लेखाच्या शेवटीं फक्त ११९० असा आंकडा खोदलेला आहे. हा शालीवाहन शक नाहीं हें उघड च आहे. लेखकानें ११९० च्या मागें अगर पुढें कालनिदर्शक अक्षरें—शक, संवत अगर सन इ०—खोदलेलीं नाहींत. पण लेखाच्या मजकुरावरून व इतर परिस्थितीवरून हा फसली सन असावा असें वाटतें, आणि म्हणून तो प्राचीन नसून जवळ जवळ अर्वाचीन च आहे असें मीं म्हटलें आहे.

लेख अजून चांगला शाबूत आहे. फक्त तिसऱ्या ओळींतील २।३ अक्षरें दगड झिजल्यामुळें बरोबर लागत नाहींत. लेखाची शिळा ( पायरी ) ३ विती लांब व १ वीत रुंद आहे. अक्षराची लांबी जवळ जवळ १ इंच आहे. एकदंर ओळी ३ आहेत. लेखांत फक्त एका व्यक्तीचें आडनांवासह एक सबंध नांव व त्या व्यक्तीचें रहाण्याचें गांव दिलें आहे, त्यावरून कांहीं च बोध

लांबी २३/४ व रुंदी १३/४ इंच आहे. अक्षर शालिवाहनाच्या बाराव्या शतकांतील मराठी बालबोध आहे. लेखकानें कोठें कोठें अक्षरांवरील मात्रा व कोठें काने गाळले आहेत. य, म, प, व, च हीं अक्षरें सारखीं च काढलीं आहेत. क्वचित् ठिकाणीं अक्षरें गाळलीं आहेत. व अक्षरें बारीक लिहिलीं आहेत, यामुळें मजकूर वाचण्यास जड जातें. अक्षरांचें खोदकाम मात्र चांगलें आहे. यामुळें सर्व अक्षरें चांगलीं दृष्टोत्पत्तीस येतात. यांत पोटाकडील अंगाचे १६ व पाठीकडील अंगास १७ मिळून ३३ ओळी आहेत. पोटाकडील अंगाचे डावे अंगास वरच्या कोपऱ्यावर ५ ओळींचा एक शिक्का असून त्याखालीं नांगराची निशाणी आहे.

२ रा. राजवाडे यांनीं मंडळाच्या शके १८३६ सालच्या वार्षिक इतिवृत्तांत पन्हाळगडच्या शिलाहारवंशीय दुसऱ्या भोजराजाचे तीन ताम्रपट छापले आहेत व तत्संबंधीं ऊहापोह हि केला आहे. प्रकुत ताम्रपट हि त्या च राजाचा, त्या च सालीं तयार झालेला व 'भोमणा' या एका च सोनारानें केलेला आहे. इतकें च नव्हे तर प्रकाशित केलेल्या तीन ताम्रपटांपैकीं पहिला ताम्रपट व प्रकुत ताम्रपट एका च महिन्यांत तयार झालेले आहेत. या दोन ताम्रपटांत विशेष हा कीं, पहिल्यांत श्रावण मासीं अनुराधा नक्षत्र असल्याचा उल्लेख आहे. प्रकुत ताम्रपटांत "सरावण" म्हणजे "श्रवण" नक्षत्र दिलें आहे. पहिल्यांतील नक्षत्रमान जुळत नसल्याचें रा० राजवाडे यांनीं ठरविलें आहे च. प्रकुत ताम्रपटांतील नक्षत्रमान जुळतें कीं नाहीं, तें गणित करून ठरविलें पाहिजे. प्रकाशित केलेल्या पूर्वोक्त ताम्रपटांपैकीं पहिल्यांत वईजापूर व दुसऱ्या दोहोंत पन्हाळगड येथें सिंहासन असल्याचा उल्लेख आहे. प्रकुत ताम्रपटांत कराडच्या सिंहासनाचा उल्लेख आहे.

३ रा० राजवाडे यांनीं पूर्वोक्त ताम्रपटांविषयीं ऊहापोह करतांना जीं विधानें केलीं आहेत तीं च प्रकुत ताम्रपटास लागू आहेत. त्या अनुमानांचें येथें संक्षेपतः पुनरावर्तन करितोंः—

( १ ) ताम्रपटाची भाषा शक ११२६ तील मराठी आहे म्हणजे ज्ञानेश्वरी भाषेच्या पूर्वीची शंभर वर्षांची आहे.

( २ ) भाषेचें स्थल करवीर इलाख्यांतलें च तत्कालीन आहे.

( ३ ) शक ११२६ त पन्हाळगडास शिलाहार वंशीय राजा दुसरा भोज राज्य करीत होता, त्याच्याकरितां हे ताम्रपट बनविलें आहेत.

( ४ ) या ताम्रपटांत ४१० अशीं अक्षरें आहेत. ह्या अक्षरांचा अर्थ इतका च कीं, ही मोजणी शिलाहाराच्या राज्यसंस्थापनेपासूनची आहे. शिलाहार शक असें जेथें म्हणावयाचें तेथें गांवढ्या गांवांतील लेखक शालीवाहन शक म्हणतो इतकें च.

( ५ ) शिलाहारांची मूळ भाषा मराठी होती. शक ७१६ त हि ती त्यांची मायभाषा होती व त्या कालीं ती भाषा चांगली प्रचलित होती.

लांबी २¾ व रुंदी १½ इंच आहे. अक्षर शालिवाहनाच्या बाराव्या शतकांतील मराठी बाळबोध आहे. लेखकानें कोठें कोठें अक्षरांवरील मात्रा व कोठें कानें गाळले आहेत. च, म, प, य, व हीं अक्षरें सारखीं व काढलीं आहेत. क्वचित् ठिकाणीं अक्षरें गाळलीं आहेत. ग अक्षरें बारीक लिहिलीं आहेत, यामुळें नजरचूक वाचण्यात जड जातें. अक्षरांचें खोदकाम मात्र चांगलें आहे. यामुळें सर्व अक्षरें चांगलीं दृष्टोत्पत्तीस येतात. यांत पोटाकडील अंगाचे १६ व पाठीकडील अंगास १७ मिळून ३३ ओळी आहेत. पोटाकडील अंगाचे डावे अंगास वरच्या कोपऱ्यावर ५ ओळींचा एक शिक्का असून त्याखालीं नांगराची निशाणी आहे.

२ रा. राजवाडे यांनीं मंडळाच्या शके १८३६ सालच्या वार्षिक इतिवृत्तांत पन्हाळगडच्या शिलाहारवंशीय दुसऱ्या भोजराजाचे तीन ताम्रपट छापले आहेत व तत्संबंधीं ऊहापोह हि केला आहे. प्रस्तुत ताम्रपट हि त्या च राजाचा, त्या च सालीं तयार झालेला व 'भोमणा' या एका च सोनारानें केलेला आहे. इतकें च नव्हे तर प्रकाशित केलेल्या तीन ताम्रपटांपैकीं पहिला ताम्रपट व प्रस्तुत ताम्रपट एका च महिन्यांत तयार झालेले आहेत. या दोन ताम्रपटांत विशेष हा कीं, पहिल्यांत श्रावण मासीं अनुराधा नक्षत्र असल्याचा उल्लेख आहे. प्रस्तुत ताम्रपटांत "सरावण" म्हणजे "श्रवण" नक्षत्र दिलें आहे. पहिल्यांतील नक्षत्रमान जुळत नसल्याचें रा० राजवाडे यांनीं ठरविलें आहे च. प्रस्तुत ताम्रपटांतील नक्षत्रमान जुळतें कीं नाहीं, तें गणित करून ठरविलें पाहिजे. प्रकाशित केलेल्या पूर्वोक्त ताम्रपटांपैकीं पहिल्यांत वईजापूर व दुसऱ्या दोहोंत पन्हाळगड येथें सिंहासन असल्याचा उल्लेख आहे. प्रस्तुत ताम्रपटांत कराडच्या सिंहासनाचा उल्लेख आहे.

३ रा० राजवाडे यांनीं पूर्वोक्त ताम्रपटांविषयीं ऊहापोह करतांना जीं विधानें केलीं आहेत तीं च प्रस्तुत ताम्रपटास लागू आहेत. त्या अनुमानांचें येथें संक्षेपतः पुनरावर्तन करितों:—

(१) ताम्रपटाची भाषा शक ११२६ तील मराठी आहे म्हणजे ज्ञानेश्वरी भाषेच्या पूर्वीची शंभर वर्षांची आहे.

(२) भाषेचें स्थल करवीर इलाख्यांतलें च तत्कालीन आहे.

(३) शक ११२६ त पन्हाळगडास शिलाहार वंशीय राजा दुसरा भोज राज्य करीत होता, त्याच्याकरितां हे ताम्रपट बनविले आहेत.

(४) या ताम्रपटांत ४१० अशीं अक्षरें आहेत. ह्या अक्षरांचा अर्थ इतका च कीं, ही मोजणी शिलाहारांच्या राज्यसंस्थापनेपासूनची आहे. शिलाहार शक असें जेथें म्हणावयाचें तेथें गांवढ्या गांवांतील लेखक शालीवाहन शक म्हणतो इतकें च.

(५) शिलाहारांची मूळ भाषा मराठी होती. शक ७१६ त हि ती त्यांची मातृभाषा होती व त्या कालीं ती भाषा चांगली प्रचलित होती.

२९ ईरव सत हसत सोनारा सो
३० मणाच हसलकी पत्र घडवी
३१ ल यास आसते मानीती तर
३२ वरची पातक होती चद्र सरल
३३ .... पाडवा रकाना

शिकंदरलाल आतार

## शिवछत्रपतींची आग्र्याहून सुटका झाली ती मित्ती

शिवछत्रपतींची औरंगजेबाच्या कैदेंतून सुटका झाली ती मित्ती संस्मरणीय आहे. ही हकीकत नक्की कोणत्या तारखेस घडली, हें ठरविण्याचा माझा मानस आहे

शिवछत्रपतींची दरबारांत झालेली भेट व पुढें नजरकैदेंतून झालेली आकस्मिक सुटका या गोष्टींबद्दल मराठी बखरींतून कमी अधिक वर्णन सांपडतें परंतु नक्की मित्ती कोणा बखरकारानें दिलेली माझ्या पाहण्यांत नाहीं. मुसलमानी तवारिखांतून अनुक्रमें १८ जिल्काद व २७ सफर अशा मित्या दिलेल्या आहेत. प्रो. यदुनाथ सरकार व त्यांचा अनुवाद करणारे रा. सरदेसाई या उभयतांनीं या च मित्त्या ग्राह्य धरलेल्या आहेत. यांकरितां सुटकेच्या मित्तीची शहानिशा करूं.

सातारा येथें मिळालेल्या व सध्यां ठाणें येथें छापिले जात असलेल्या माझ्या 'भोसल्यांच्या बखरींत शिवाजी महाराज गुरुवारीं पळाले, असें स्पष्ट दिलेलें आहे. दतियाचा राजा दलपतराय याचा कामगार भीमसेन बुंदेला यानें लिहिलेल्या आपल्या बखरींत गुरुवार च दिला आहे. मुसलमान लोकांत गुरुवार हा दिवस पवित्र मानण्यांत येतो. या दिवशीं शिवछत्रपतींकडून नवस म्हणून मिठाईच्या बंग्या पिराचे दर्ग्यांत पाठविल्या जात, व या च दिवशीचा फायदा घेऊन, शिवाजीमहाराज संभाजीसह पेटाऱ्यांत बसून निसटले, ही गोष्ट लक्षांत येतां शिवछत्रपतींची गुरुवारीं सुटका झाली, असें जवळ जवळ ठरल्या सारखें होतें. सुदैवानें 'जेधे यांच्या शकावलींत शिवाजी महाराज "श्रावण वद्य द्वादसी आगरेहून पेटारियांत बैसोन पळाले" असा स्पष्ट निर्देश आल्यामुळें व गणितानें श्रावण वद्य द्वादशीस गुरवार येत असल्यामुळें शिवछत्रपति शके १५८८ श्रावण वद्य द्वादशीस गुरुवारीं आग्र्याहून निसटले, असें निःसंशय म्हणतां येतें. या दिवशीं

त्याचप्रमाणें एका देशांतील लोक दुसऱ्या देशांत जाऊन राज्यकर्ते म्हणून अगर अन्य प्रकारें तेथें वसाहत करून राहिले तरी आपल्या कुलदेवतांचें विस्मरण त्यांस होत नाहीं. वारंवार ते आपल्या कुलदेवतांच्या दर्शनास स्वदेशांत येतात. शिंदेसरकारचा कुलस्वामी रत्नागिरीचा जोतिबा आहे. ह्या घराण्यांतील कोणता हि पुरुष आज तागायत ह्या आपल्या कुलदेवतेच्या दर्शनास आल्यावांचून राहिला नाहीं. त्याचप्रमाणें जेजुरीचा खंडोबा हा होळकरांचा कुलस्वामी आहे. होळकरांच्या घराण्यासंबंधानें हि शिंदेसरकारच्या प्रमाणें च चाल चालत आली आहे. आपापल्या कुलदेवतांच्या स्थानीं मराठे व ब्राह्मण राजेरजवाड्यांनीं मोठमोठे खर्च चालू ठेविले होते व अजूनपर्यंत हि कित्येकांकडून चालत आहेत. तात्पर्य, कुलदैवत कुलधर्म व कुलाचार ह्या गोष्टी इतिहाससंशोधकांस विचारणीय आहेत.

सांप्रत पुष्कळ लोक पोटोबा देवाच्या पाठीस लागून हवे तिकडे भटकत आहेत. त्यांनीं आपलीं कुलदैवतें व कुलाचार ह्यांस फांटा दिला आहे. व ही आपण मोठी सुधारणा केली आहे असें त्यांस वाटतें! परंतु, कुलदैवतें व कुलाचार ह्यांबरोबर आपण आपल्या इतिहासास हि फांटा देऊन तो विसरत आहों हें त्यांच्या लक्षांत येत नाहीं.

आज मी जे दोन कुलधर्म किंवा कुलाचार इतिहास-संशोधक मंडळापुढें सांगत आहे, ते कोणत्या देवतांसंबंधानें आहेत हें व त्या नांवांचे देव आणि त्यांचीं देवळें हीं मला कोठें आढळलीं नाहींत. (१) पहिला कुलधर्म किंवा कुलाचार 'ब्रह्म' ह्या नांवाचा आहे व (२) दुसरा 'मायराणीची किंवा सतीची पूजा' हा आहे.
प्रथम ब्रह्माचें वर्णन करून मग मायराणीचें करूं.

(१) ब्रह्म—आश्विन वद्य १३ त्रयोदशीच्या दिवशीं म्हणजे दिवाळीच्या सणांतील प्रथम दिवशीं घरच्या मुख्यानें सायंकालपर्यंत उपाशी राहावें. तों-पर्यंत स्वयंपाक—पुरणपोळीचा—तयार झालेला असतो. सायंकाळीं घरधन्यानें स्नान करून स्वयंपाकघरांत जाऊन, एका खांबा शेजारीं पूजासाहित्य घेऊन पाट मांडून बसावें. तेथें जवळ च, एक पात्र, सर्व पदार्थ भरपूर वाढून ठेवलेलें असतें. इतकें झाल्यावर स्वयंपाक घराचें दार लावून घेऊन कोणीही तेथें राहत नाहीं, घरधनी एकटा च राहतो. मग तो नग्न होऊन खांबाची पूजा करितो व वाढलेल्या पात्रावर बसून यथेच्छ जेवतो व जवळ ठेवलेल्या पात्रांत आंचवून धोतर नेसून बाहेर येतो. नंतर ब्राह्मण, सुवासिनी व घरची सर्व मंडळी घरच्या देवास नैवेद्य दाखवून जेवावयास बसतात. हा कुलधर्म कोल्हापूर वगैरे दक्षिण प्रांतीं विशेष आहे म्हणतात. स्मार्त देशस्थ ब्राह्मणांत, लिंगायत लोकांत व कोष्टी वगैरे इतर लोकांत हि हा कुलाचार चालत आहे. हा कुलाचार "अहं ब्रह्मास्मि" ह्या अद्वैतवाद्यांच्या

मुख्य वाक्याच्या अर्थाच्या अनर्थापासून उत्पन्न झालेला दिसतो. ह्या कुलाचारांतील, स्वयंपाकाचें पाणी आणणें व स्वयंपाक करणें या प्रकारांत हि निरनिराळ्या पद्धती आहेत; असो.

२) **मायराणी**—हा शब्द माया ह्या शब्दापासून झालेला दिसतो. ह्या देवीचें देऊळ कोठें हि आढळत नाहीं. परंतु, लोकांच्या देव्हाऱ्यांत हिच्या नांवाचा एक टाक करून बसविलेला आढळतो. हा कुळधर्म म्हणजे [illegible] केलेल्या विधवेचें पूजन होय. अशी पूजन करून घेणारी स्त्री [illegible] मिळते. जेव्हां कधीं मिळेल तेव्हां हा कुळधर्म उरकून घेतात. तिला येस हळदकुंकू देतात. तें ती आपल्या कपाळीं लावते. [illegible] मस्तकावर तिचें पूजन करितात. लुगडें, खण व चांगली दक्षिणा तिला देतात आणि जेवू घालून तिची रवानगी करितात. मायेचें जें स्वरूप वर्णन करितात त्यावरून कांहीं एक प्रकारच्या समजुतीनें ह्या 'मायराणी'ची उत्पत्ति झाली असावी*.

कृ. वि. आचार्य

---

## अम्रखेडच्या आद्याचार्यांच्या वडील शाखेची वंशावळ

---

* टीप — तुकारामानें एके ठिकाणीं "नव्हे जानाई जोखाई मायराणी म्हेसाबाई ॥ माझा बळिया पंढरीराव जो ह्या देवांचाही देव ॥" असा मायराणीचा उल्लेख केला आहे. ह्यावरून हा कुळाचार पुष्कळ जुना दिसतो. 'राजरा देवीची सवाष्ण' म्हणून एक असा च प्रकार जुन्नर, नगर, नाशीक वगैरे प्रांतीं आहे.

§ शेषदासाचार्य

- वरदराजाचार्य
  - रामकेशवाचार्य
    - शेषदासाचार्य (इ.स. १९१३ त हयात)
- रामाचार्य
  - हयग्रीवाचार्य
    - भीमाचार्य
    - राघवाचार्य
    - नारायणाचार्य
  - कृष्णाचार्य
  - रघुनाथाचार्य
    - अनंताचार्य (१९१३ त हयात)
    - गोविंदरामाचार्य (१९१३ हयात)
  - अण्णाचार्य
    - श्रीनिवासाचार्य (१९१३ हयात)
    - रंगाचार्य (१९१३ हयात)
- श्रीनिवासाचार्य (संतान नाहीं)

ह्या घराण्याकडे १ अमखेड, २ भुय्यार, ३ पडगानूर, ४ बेळ्ळोळी, ५ दिकसंगी, ६ जंगलगी वगैरे इनाम गांवें व सुमारें ४०,००० चाळीस हजार रुपये वसुलाचीं चालतात. हीं सव गांवें विजापुर जिल्ह्यांतील इंडी तालुक्यांत आहेत. हीं देणगी श्रीमंत बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे यांनीं दिलेली आहे. ह्या गांवांपैकीं अमखेडची सनद-ह्या पूर्वीं च एके वेळीं मंडळापुढें ठेवलेली आहे. ह्या विद्वान् घराण्याचा उपयोग मोंगलाई प्रांतांत पेशव्यांचीं कारस्थानें चालत असतांना त्यांस फार झाला. मोगलांच्या पदरच्या वैष्णव मंडळावर ह्या आद्याचार्यांच्या घराण्यांतील पुरुषांचें फार वजन असे असें सांगतात.

कृ. वि. आचार्य

## उद्धवचिद्घनकृत त्रिलोचन-चरित्र

उद्धवचिद्घनांचीं नागनाथ, बहिरंभट, हंसराज, श्रियाळ, गोरा कुंभार इत्यादि लहान लहान चारित्रपर काव्यें काव्यसंग्रहांत प्रसिद्ध झालेलीं आहेत. उद्धवचिद्घनांना हिंदी चांगलें अवगत होतें; त्यांनीं हिंदींत हि कांहीं काव्यरचना केलेली आहे. प्रस्तुतचे त्रिलोचनचरित्र हि हिंदींतलें च आहे. सदतीस कडव्यांचें हें कवित्त आहे. उद्धव हे भगवंताचे प्रेमळ भक्त होते आणि त्यांनीं आपल्या प्रेमळ वाणीनें त्याचे अनेकवार गुण गाईले आहेत. त्रिलोचन-कवित्त हि असें च प्रेमळ आहे. अद्याप तें अप्रसिद्ध होतें. खानदेशांत येरंडोल गांवीं एका सद्गृहस्थाच्या घरीं एका बाडांत तें आढळलें. लेखकानें भाषाप्रयोग अशुद्ध केलेले आहेत. व मला हिंदी भाषा चांगलीशी अवगत नसल्यामुळें कवित्तांतलीं कांहीं अशुद्धें तशीं च रहाण्याचा संभव आहे. असो.

या कवित्तांत पहिल्या सहा कडव्यांत प्रभुगुणवर्णनप्रसंगीं, संकटकाळीं ज्यांची लाज राखिली अशा, कांहीं संतांचा उद्धवांनीं ओघानें नामनिर्देश केला आहे. त्यांतील चौथ्या कडव्यांतील "*ठाकुरुमण पितापुत्र" मला अपरिचित आहेत. यांची कथा माझ्या ऐकण्यांत नांहीं. चरित्र खालील प्रमाणें आहे.

### त्रिलोचन-चरित्र

सुन हो भाई रे। माधो साध सदाई रे ॥ धृ० ॥
देहरा फेरो, दूध पियो, ठार मारी गाय जिवाई।
नामदेवको संकट राख्यो, आनके मांढियां छाई ॥ १ ॥

---

*'धर्मजागृती'च्या गेल्या अंकांत रा. खापर्डे यांनीं एक संवाद दिला आहे. हा कबीर व समन यांचा संवाद असून तो दोहारूपांत आहे. तेवढ्यावरून समन हे कबीरसमकालीन होते असें दिसतें, पण त्यांची विशेष माहिती आढळत नाहीं.
१ महादेवाचें देऊळ फिरविल्याची कथा.

सेनाजीके स्वरूप धरके आप भए हरनाई ।
प्याला भरके बीख पचावे पावे मीराबाई ॥२॥

धना जाटको खेत जमायो कुवा दास कुंभारा ।
कबीरके घर पठडा ल्यावे राघोजी बनज्यारा ॥ ३ ॥

शाहुसंमण पितापुत्रको नेकी कह्या न जावे ।
कर्माबाई खिचडीभोजन आप गुपाला पावे ॥ ४ ॥

गंगा आप कठोडी प्रगटे सोदासा रोहिदासा ।
सीतल जल भर ल्यावे झारी *जनजसवंत प्यासा ॥ ५ ॥

तुलसीके घर पठडा ल्यावे राघोदास बनजाज्या ।
त्रिलोचनका सेवक होवे तीन लोकका वासा ॥ ६ ॥

खांदे कमली भेर पगरी चूप दरवाजे आया ।
रामराम कर त्रिलोचननें आपने निकट बुलाया ॥ ७ ॥

किसका कौन कहां रहते हो केंव दरवाजे ठाडा ।
जातपात कहो नाम निशाणी बचनबचनको झाडा ॥ ८ ॥

अपना आपन मातपिता नहिं निरंजनको वासा ।
जातपातकुलगोत न जानूं तीन लोक रहिवासा ॥ ९ ॥

दयाभाव ज्याके घर नहिं तिस दरवाजा ना जाऊं ।
खेत ज्योत (?) सब हुन्नर जाणुं प्रीतीनाम कहाऊं ॥ १० ॥

बिश्वकर्मा मेय कहाऊ बढाई संगत रासा ।
भोत भातके कुंभ बनाऊं कपडे धोऊं खासा ॥ ११ ॥

ले आरसी निजरूप दिखाऊं दाढी सीर सवारूं ।
नरनारीजन कास लगाऊं जलमें पार उतारूं ॥ १२ ॥

अंगीया लहगा चरण ज्यामा बहुते रीसी ज्याणु ।
भातभातके बाग लगाऊं बहु बिध सोंगे ल्याऊं ॥ १३ ॥

लिखना पढना सबहु जानू परखनां जिनसाना ।
ताळ पखवाज गाऊं नाचूं बिया वेद पुराणा ॥ १४ ॥

लेवदेवी उदीम चिकरा साहूकारी चोरी ।
आगमपंथकी खबर बलाऊं जानूं तेरी मेरी ॥ १५ ॥

---

* खानदेशांतील तापीतीरचे एक संत. हल्लीं यांचा मठ नंदुरबार तालुक्यातील निझर या गांवीं आहे.

जो कहे सो करूं चाकरी पेट भरके खाऊं ।
अष्टौ ज्याम दिन न जाणुं जो मागे सो ल्याऊं ॥ १६॥
त्रिलोचन कहे सुनरे भाई तुजको कौन न राखे ।
ऐसा चतुरा ज्यामें हो के के करता है धोके ॥ १७ ॥
कहे बिर्तिया करतें पिसते माई टिके न कोई ।
किंचित् अंतर जब कछु जानु तबहि उदास होई ॥ १८ ॥
कारणा पिसना सिद्ध निसिदिन पाक बनावे सारा ।
जब मागत तब भोजन दीजे कबहुं न राखे भुकेरा ॥ १९ ॥
त्रिलोचननें त्रिया बुलाई कहे हरिहरा दासी ।
पेट निमित्त रहत बिर्तिया सेवा याकी कैसी ॥ २० ॥
देखनका तो आनंदरूपी सबहुं भरहे यामों ।
क्या जानुं यह कवन पुरेखवा बचन राख मनहीमों ॥ २१ ॥
बचन सुन मंदीरमो आयी पूरण रसोई बनाई ।
आवो बिर्तिया भोजन पावो कणक थालभर ल्याई ॥ २२ ॥
पके सेरकी येक पक रोसी ( टी ? ) ऐसी दस बीस खाई ।
भात सालना ( ? ) सबही खाकर तबही भूक न जाई ॥ २३ ॥
चार पसेरी गूड फुटाने पलमों येक चरवाने ।
कच्ची दाल सातु और चुडवे जो लावे सो खावे ॥ २४ ॥
इतना तो जलआधार न्याहारी रोटी और पकावे ।
माई कहती एक घडीमों खेतकाम कर ल्यावे ॥ २५ ॥
जायँ बिर्तिया तबहि आया सारा खेत जमाया ।
बोया बोया और जमाया पूरणकंन्न बढाया ॥ २६ ॥
मुझकूं माई भूक लगी है मनकी रोटी कीयी ।
अबही भूक गयी नही मेरी सेवा और बताई ॥ २७ ॥
येक घडीमों माडी सोपे मंदिर आप बनावे ।
बैल चरावे घोडे धोवे लकडी चारा लावे ॥ २८ ॥
भूक लगी है खावो रोटी या खबर दूरकी ल्याई ।
येक घडीमो बंदर ल्यावे भूक लगी है माई ॥ २९ ॥
करते पिसते निसिदिन माई भोजन नींद न जाने ।
मस्तक अँगीया मैला कपडा कवन धोयके आने ॥ ३० ॥

---

१ खि. २ परुष. ३ जा. ४ आंगड ?

आवो विर्तिया भोजन मागे सब सुधबुध विसराई ।
येक समय सुख दुःखके साधीन सुखी पडो अनई ( ! ) ॥ ३१ ॥
कहे मेरी इन इन दिनमों बाहिर कबहूं न देखी ।
बहुत दिनसे सुख न धुया कहुन दुखसे दुखी ॥ ३२ ॥
सुखदुख दोनों कछुं न ज्यानो कवन विर्तिया आया ।
करते पिसते भोजन देते निसिदिनि धाक लगाया ॥ ३३ ॥
अंतरजामी[3] इतना सुनके तबहि आलोप[4] होवे ।
घडी दोघडी पहर दुपारी केवन[5] विर्तिया आवे ॥ ३४ ॥
आवो विर्तिया दरसन देवो नहीं तो प्राण छोडूं ।
आग लगाऊं देह जलाऊं कंठ सुरीसो तोडूं ॥ ३५॥
भाव जानके श्रीहरी प्रगटे पीतांबर वनमाला ।
शंखचक्र कर कनक कुंडलें मंडित मुगुट विसाला ॥ ३६ ॥
चरणोंपर निज सीस चढावे त्रिलोचन सुख पावे ।
देवभक्तको पावन प्रेमा **उद्धवचिद्धन** गावे ॥ ३७ ॥

उद्धवांनीं, ( १ ) नामदेव, ( २ ) सेना न्हावी, ( ३ ) मीराबाई, ( ४ ) धनाजाट, ( ५ ) कुंभाकुंभार, ( ६ ) कबीर, ( ७ ) शाहु, (८) संमण, (९) कर्माबाई, (१०) सो (सूर?), दास, (११) रोहिदास, (१२) जनजसवंत, (१३) तुलसीदास, (१४) राघोदास, (१५) बजाज्या ? या पंधरा संतांचा नामनिर्देश केलेला आहे. यांतील ३।४ जणांखेरीज बाकीचे सर्व उत्तर हिंदुस्थानांतले च आहेत. कवित जर हिंदींत तर त्यांत हिंदुस्थानांत झालेले संत घेतले म्हणजे जास्त चांगलें, अशी दृष्टि कवित्तरचनेच्या वेळीं उद्धवांची असेल, कोणीं सांगावें ?

**पां. मा. चांदोरकर**

# निवृत्तिदेवकृत भगवद्गीतेची समओवी टीका

१ हा ग्रंथ पैठणें येथील कृष्णदयार्णवांचे मठांतून रा. केशवराव नारायण नगरकर, शाळामास्तर घोडेगांव, जि. अहमदनगर यांचे मार्फत मला मिळाला. त्यास सुमारें १॥ वर्ष झालें. ग्रंथ त्रुटित आहे; म्हणजे पहिला अध्याय ५ वी ओंवी ते १२ अध्याय ५ वी ओंवी पर्यंत, असा आहे. यामुळें सध्यां तरी या ग्रंथाचे आद्यंतास आपण मुकलों आहों. उपलब्ध ग्रंथाचीं बहुतेक पत्रें दुहेरी चिकटविलेल्या कागदावर लिहिलीं आहेत. ग्रंथ बरा च अशुद्ध लिहिला आहे. पहिल्या अध्यायांतील एकुणतिसावे ओंवींत टीकाकार आपला नामनिर्देश करतो तो असा—

---

१ हेरी म्हणजे सखी ? २ कोणत्या. ३ अंतर्ज्ञानी. ४ अदृश्य. ५ केव्हां.

आतां भगवत्तगीतेचा अभिप्रावो । म्हराटियां करीन प्रस्तावो । धनिवित्त असे निवृत्तिदेवो । येथामती ॥ २९ ॥

याखेरीज ग्रंथकाराचा नामोल्लेख नाहीं. हे निवृत्तिदेव कोण असावेत ? प्रसिद्ध ज्ञानेश्वरांचे गुरु व वडील बंधु निवृत्तिनाथ ह्यांचे नांवावर उत्तरगीता टीका, वृत्तिबोध व किरकोळ अभंग मोडत आहेत. नामदेवानें 'निवृत्तिदेवें ग्रंथ केला होता सार । ठेविला समोर विठोबाच्या ' ॥ ( आवटे-नामदेवगाथा अभंग ९३५ ) आणि ' सोपानदेवें ग्रंथ केला होता सार । ठेविला समोर निवृत्तीच्या ॥ ( आवटे-नामदेवगाथा अभंग ८६३ ) अशा निवृत्ति व सोपान ह्यांनीं केलेल्या ' सार ' ग्रंथांचा उल्लेख केलेला आहे. हे ' सार ' ग्रंथ बहुधा भगवद्गीतेचे सार म्हणून असावेत. ह्यांपैकीं ' सोपानदेवी ' हा ग्रंथ रा. आवटे यांनीं शके १८३६ सालीं प्रसिद्ध केला आहे. व तो भगवद्गीतेवर प्रायः समओवी टीकापर आहे. ह्या ग्रंथांत चार ठिकाणीं सोपान ह्या नांवाचा उल्लेख आलेला आहे.

२ मला उपलब्ध झालेली पोथी ही वरील ग्रंथाप्रमाणें च प्रायः समओवी श्रीमत्भगवद्गीतेवर टीका आहे. कचित् ठिकाणीं मूळ श्लोकास एका ओवी ऐवजीं तीन चार ओव्या हि घातल्या आहेत. ५२ वे पृष्ठावर समासांत एके बाजूस ' गी० ' व दुसरे बाजूस ' कृष्ण' एवढें च लिहिलेलें आहे. अध्याय ५ ओवी ३ यांत व अध्याय १ ओवी २१ मध्यें ' परेश ' शब्द आला आहे. यावरून मनांत थोडी शंका येते कीं, मानभाव पंथाशीं ह्या ग्रंथाचा संबंध नसेलना ?

जिविचें जाणोनी परेशें । सांगो आदरीलें उल्हासें । पार्था अेकपां जेसें असें । तें सागेन तुज ॥ ३ ॥ अ. ५

तुं गुणाचा ओंशु । सकळ विद्येचा परेसु ( शु ) । तुज नमिया होये हरुशु । परबंधरचेने ॥ २१ ॥ अ. १

असो; ह्या ग्रंथ लिहितांना वापरलेला कागद, रकार व ळकार काढण्याची धाटणी आणि भाषेचें स्थूल स्वरूप यांवरून ही पोथी २०० वर्षांचे अलिकडे खास लिहिली गेली नाहीं असें म्हणतां येतें.

निवृत्तिदेवांनीं केलेल्या भगवद्गीतेवरील मराठी टीकेचा उल्लेख ज्ञानेश्वर खालील ओंवींत ध्वनिरूपानें करीत असावेत असें वाटतें.

> तीरें संस्कृताचीं गहनें । तोडूनि मऱ्हाटिया केलीं शब्दसोपानें ।
> रचिलीं धर्मनिधानें । निवृत्तिदेवें ॥ ९ ॥
>
> राजवाडे-ज्ञानेश्वरी ११-९

परंतु, या ग्रंथांत विशेष मगदूर व सत्त्व दृग्गोचर होत नाहीं. कदाचित् गीतेवर मराठींत प्रथम झालेल्या व तो त्यांच्या गुरूंनीं केलेल्या टीकारूप अगर साररूप

प्रयत्नाचा निर्देश ज्ञानेश्वरांनीं आदरानें केला असावा. या ग्रंथाची सबंध जुनी व शुद्ध प्रत मिळाल्यावर वरील बाबीचा निकाल लागण्यास मदत होईल.

उपलब्ध झालेल्या पोथींत प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं जो 'इति श्रीमत्०... योगोनाम...अध्यायः' असा संकल्प असतो त्यांतील योग हा शब्द अध्याय १ व ११ यांत गाळलेला आहे व चोथे अध्यायास ' कर्मसंन्यास योग' आणि आठव्यास ' महापुरुष योग ' असें म्हटलें आहे.

या टीकेंतील भाषांतराचा अथवा सारांशाचा नमुना ( अध्याय २ श्लोक ४६ यावानर्थ उदपाने० )—

टिका ॥ ऐसा का तृषार्थु प्राणि ॥ उदक घे तृषेचिये पुरवणी ॥

तेसी यां ब्राह्मणाची बोलणी । कार्यापुरति ॥ ९५ ॥

आतां, या ग्रंथांत माझे समजुतीनें भाषेच्या जुनेपणाचीं जीं उदाहरणें व प्रचारांत नसलेले जे शब्द आढळून आले ते खालीं नमूद करतों.

येयां ( २–५० ), येयांचे ( ३–१३ ), तवं ( सर्वत्र ), प्र = ज्ञ ( सर्वत्र ) येयांविणें ( २–५३ ), माझेया ( ४–७ ), जाणितलयां साठिं ( ४–६६ ), झांत्रा ( २–६ ), वायोथें ( ४–५९ ), तुयें ( १–२२ ), कौरवार्थे ( १–६० ), हंतुनि= हाणून ( १–७१ ), वेगळावे = वेगळा होतो (६–७०), आहात्ळ वाहालिं (८–११ ), अवस्वरीं ( ८–४० ), मतें = मातें, घते, प्रतिवावो = प्रत्यवाय(२–८४ ), रवंदाळि= नाश, सळ = स्पर्धा, बरोबरी, म्हणौनु, धनु अस्तुकिते जाले = धनुष्य वर उचलिलें, हरिजेति ( २–८० ), संग्रामु करि पांदुडवांदुडि ( ४–७९ ), घेपवे ( ५–५ ).

तेव्हां, सोपानदेवाप्रमाणें निवृत्तिदेवांनीं च केलेली ही समओवी टीका असावी.

**गं. ना. मुजुमदार**

---

# वारकरी संप्रदाय व समर्थ संप्रदाय यांतील विरोधाभास

श्रीक्षेत्र पंढरपूर व आळंदी येथें आषाढी व कार्तिकी एकादश्यांस नैयमिक दर्शनासाठीं अनुक्रमें शुक्ल व कृष्ण पक्षांत वारी करणाऱ्यांस प्रायः वारकरी म्हणतात. त्यांच्या संप्रदायाचें युक्त व ऐतिहासिक नामाभिधान भागवत हें आहे; परंतु अलिकडे त्यास वारकरी संप्रदाय म्हणण्याची चाल रूढ झाली आहे. हें नूतन नामकरण बहुधा तुकारामाचे अन्वयांतील महाप्पा वाशीकर यांचे वेळेपासून प्राप्त झालें असावें. मात्र त्याला ग्रंथोक्त अगर वाचनिक आधार मला आढळला नाहीं. या संप्रदायांतील कांहीं

लोकांच्या आग्रही एकान्तिकत्वाची मजल इतकी गेलेली आढळण्यांत आली होती कीं, भंडाऱ्याचे प्रसंगीं एखाद्यानें रामदासी श्लोक म्हटला कीं पंगतींत अर्ध्या जेवणावरून वारकरी उठावयाचे ! तसें च कांहीं ब्राह्मण वारकरी त्रिकाल संध्यादि विहित सनातन आचार सोडून पताकेच्या पदराचें टोक पाण्यांत भिजवून तें पाणी तीर्थ म्हणून घेतात व तेवढ्यानें च विहित आचार भागला असें समजतात !

२ समर्थ रामदासी संप्रदायांत तर विहित सनातन आचारावर मुख्य कटाक्ष आहे. या संप्रदायाचे अनुयायी ब्राह्मणेतरांत फार थोडे आढळतात. या संप्रदायांत एकान्तिक रामोपासना आहे व हनुमंत हे संप्रदायपरंपरेंत गणले जातात.

३ वरील दोन्ही संप्रदायांतील उपास्यें अनुक्रमें श्रीविठ्ठल व श्रीरामचंद्र एका च विष्णूचे अवतार आहेत. पंढरी हें तीर्थ अथवा पीठ अद्वैत आहे; एकदेशी नव्हे. अशी परंपरेची वस्तुस्थिति असतां " पांडुरंग हा चंद्र रुपाचा, इतर देव आणे पावल्या सुद्धां " इत्यादिक भावनांचा व उद्गारांचा उगम निःसंशय अलिकडील काळांत आलेला आहे. यांच्या मुळाशीं स्वतःची वडेजाव, हेकटपणा, अज्ञान व स्वार्थ हीं स्पष्ट-पणें दिसून येतात.

४ रामदास स्वामींचीं जीं उपलब्ध चरित्रें आहेत त्यांतील त्यांच्या पंढरीची यात्रादि प्रसंगांचे वर्णनांतील अर्थवादात्मक भाग वगळला असतां असें निदर्शनास येतें कीं, भागवत संप्रदायाशीं त्यांचें वर्तन तटकपणाचें नमून मिळतें घेण्याचें होतें. उदाहरणार्थ, उद्धवसुतकृत रामदास-चरित्र, अध्याय २० वा, हनुमंतस्वामीची बखर-दुसरी आवृत्ती, पृष्ठें १७८-१८८, दासविश्रामधाम पटल ५६ आणि ७५ व महीपतिकृत संतविजय अध्याय २१ वा पाहणें. समर्थांनीं केलेलें विठ्ठलाचें नमन प्रसिद्ध च आहे. समकालीन संतांचें—विशेषें करून तुकारामबावा देहूकर यांचें—समर्थांशीं वर्तन प्रेमभावाचें दिसतें. संतविजयांत तुकारामबावा सज्जनगडास गेले होते वगैरे वर्णन आलें आहे. वर उल्लेखिलेला प्रसंग शके १५७० सालांतील आषाढ अगर कार्तिक महिन्यांतील असावा.

५ समर्थसंप्रदायी ह. भ. प. केशवबुवा रामदासी सज्जनगड, या तरुण, चौकस व साक्षपी गृहस्थांमार्फत वरील संबंधांत जी माहिती मला नवीन कळली ती संकलित रीतीनें नमूद करीत आहें:—

(अ) पंढरपुरांत श्रीपंढरीनाथाचे देवळांत श्रीसमर्थांनीं स्थापिलेला मारुती आहे. हल्लीं त्या मारुतीचे कमानीस कुलूप घालतात व मूर्ती दर्शनास उघडी ठेवीत नाहींत !

(आ) पंढरीहून सांगोल्यास जातांना माणनदीचे कांठीं मेथवाड येथें समर्थांस सांपडलेल्या श्रीपांडुरंगाच्या मूर्तीची स्थापना त्यांनीं च केलेली आहे.

पलिकडील तीरावर देवळें येथें त्यांनीं स्थापिलेला मारुती आहे. अंतोबा कुळकरणी मेथवाडकर यांस समर्थांचा अनुग्रहप्रसाद झाला होता. मेथवाडचे समर्थसांप्रदायी पंढरपुरास वरील मारुतीचे दर्शनास जाण्याची चाल अद्याप आहे.

( इ ) तुकारामबुवांचे शिष्य निळोबा पिंपळणेरकर यांचे वंशज माहाडिकांचें तारळें ( जि. सातारा ) येथें राहतात. त्यांस हल्लीं नागपुरे असें आडनांव पडलें आहे. ही मंडळी सज्जनगडास वारीस जाण्याची परंपरा चालू आहे.

( उ ) मोगलाईंत उदगीरचे उत्तरेस सुमारें १६ कोसांवर शिरूर येथें समर्थसंप्रदायाचा मठ आहे. तेथील मठपतीजवळ आपल्या चिपळ्या व वीणा निळोबांनीं संप्रदायपरंपरेच्या रक्षणार्थ त्यांचे पश्चात् याच्या असा तुकोबांचा निळोबांस निरोप होता.

वरील ( अ—उ ) कलमांत दिलेली माहिती वाचानिक अगर कागदपत्रांचे पुराव्यानें मला अद्याप निश्चित करतां आली नाहीं.

**खं. चिं. मेहेंदळे**

---

# श्रीघुसृणेश्वराचा प्रासाद आणि शिवालय तीर्थ यांचा जीर्णोद्धार

वेरुळास श्रीघुसृणेश्वराचा प्रासाद आणि **शिवालय** तीर्थ हीं प्रथम कोणीं बांधिलीं याचा पत्ता लागत नाहीं. परंतु त्यांचा जीर्णोद्धार केल्याबद्दल दाखले सांपडतात. ते असे:—

१ **शिवाजीचा** आजा जो **मालोजी भोंसला** त्यानें शके १५२१ ( इ० स० १५९९ ) च्या सुमारास " वेरुळीं श्री सदाशिवाचें देवालय व **शेवाल** तीर्थ जीर्ण बहुता दिवसांचे पाहून त्यांचा जीर्णोद्धार केला." असा, बडोदें येथें शके १८१७ मध्यें प्रसिद्ध झालेल्या शिवदिग्विजय ग्रंथाच्या ३८ व्या पृष्ठावर दाखला सांपडतो. ग्रंथकार आपल्या लिहिण्यास आधार देत नाहीं.

२ त्यानंतर शके १६५२ ( इ० स० १७३० ) मध्यें **मल्हारराव होळकराची** स्त्री **गौतमाबाई** हिनें श्रीघुसृणेश्वराच्या प्रासादाचा जीर्णोद्धार केल्याचा लेख प्रासादावर खोदला आहे. प्रासाद श्रीत्र्यंबकेश्वराच्या प्रासादासारखा च आहे, पण लहानसर आहे. भोंवतालचें पटांगण हि तितकें विस्तीर्ण नाहीं.

---

१ ह्या ज्योतिर्लिंगास 'घृष्णेश्वर' म्हणण्याचा पाठ आहे. पण 'घृष्णेश्वर ह्या नांवाचा कांहीं अर्थ बसत नाहीं. 'घुसृणेश्वर' यांत 'घुसृण' शब्दाचा अर्थ 'केशर' असा आहे. बारा ज्योतिर्लिंगांच्या नामावळींत हि " हिमालये तु केदारं घुसृणेशं शिवालये " असें म्हटलें आहे. बृहत्स्तोत्ररत्नाकर, पृष्ठ १३२, स्तोत्र ६१ पाहावें.

३ शिवालय तीर्थाचा जीर्णोद्धार, अहल्याबाई होळकरीण हिनें शके १६९१ ( इ० स० १७६९ ) मध्यें केल्याचा लेख तीर्थावर खोदला आहे. हें शिवालय तीर्थ आयताकृतीचें विस्तीर्ण असून चारी बाजूंनीं संगीन घोटींव चिऱ्यांनीं बांधिलेलें आहे. हल्लीं त्यांत नीळ उत्पन्न होऊन पाणी खराब झालें आहे.

का. ना. साने.

## बेगमपूर ( जि. सोलापूर ) हें नांव कां पडलें ?

सोलापूर जिल्ह्यांत माचनूर नजीक बेगमपूर नांवाचें एक खेडें आहे. बेगमपूर हें नांव औरंगजेबाच्या एका मुलीच्या मृत्युस्थानावरून पडलें, असा प्रचलित समज आहे. शालोपयोगी इतिहासाच्या वाङांतून या बाबीचा उल्लेख आलेला आहे. यांत तथ्य किती तें पाहूं.

औरंगजेबास एकंदर पांच मुली होत्या. त्यांपैकीं बदरुन्निसा व झेबुन्निसा या अनुक्रमें इ. स. १६७० व १७०२ मध्यें उत्तर हिंदुस्थानांत वारल्या. औरंगजेबाबरोबर दक्षिणेंत येऊन, त्याचा कारभार पाहणारी झीनत-उन्-निसा ही हि औरंगजेबानंतर बऱ्याच वर्षांनीं दिल्लीकडेस च वारली. बाकी मिहिरुन्निसा व जुबदत उन्निसा या दोन राहिल्या. त्या मात्र औरंगजेब दक्षिणेंत आल्यावर म्हणजे अनुक्रमें जून १७०६, व फेब्रुवारी १७०७ मध्यें कालाधीन झाल्या. मिहिरुन्निसा ईस इ. स. १६८८ मध्यें दक्षिणेंतून परत दिल्लीस पाठविण्यांत आलें होतें. ती परत दक्षिणेंत आपल्या बापाकडे आल्याचा आढळ होत नाहीं; ती दिल्लीस च वारली असावी. याप्रमाणें औरंगजेबाच्या मुलींचे मृत्यूची हवाल आहे. त्याचे पांच मुलींपैकीं एक हि दक्षिणेंत गुदरल्याचा दाखला मिळत नाहीं. अशा स्थितींत, औरंगजेबाच्या कन्येची तुरबत बेगमपूर येथें आहे, व त्यामुळें त्या गांवास बेगमपूर असें नांव पडलें, असें विधान चटकन् करितां येत नाहीं. यास भक्कम पुरावा च पाहिजे. दुसरें, बेगमपूर अशा नांवांचीं कित्येक खेडीं आहेत, हें वेगळें च.

पां. न. पटवर्धन

---

१ घृष्णेश्वराचें देवालय आणि शिवालय तीर्थ हीं ह्या लेखकानें सन इ० १८९४ मध्यें पाहिलीं व त्या वेळीं च त्यांवरील नांवें व वर्षें टिपून घेतलीं.

# अकण्णा व मादण्णा यांचे संबंधीं कांहीं नवीन माहिती

कुतुबशाहींत आकण्णा व मादण्णा असे दोन ब्राह्मण मुत्सद्दी होऊन गेले. यांचा अंत औरंगजेबाचे गोवळकोंड्यावरील स्वारीचे धामधुमींत अत्यंत क्रूर रीतीनें झाला. व्यंकार्जीचे कारस्थानापूर्वी या उभयतां बंधूंनीं शिवछत्रपतीस मोठी थोरली मेजवानी केली होती, असा आपल्या इकडील बखरींत उल्लेख आहे. हे ब्राह्मण असून मुत्सद्दी होते, एवढा च यांचे संबंधींचा खुलासा सांपडतो. मला यांचे माहितींत किंचित् भर घालावयाची आहे. ती ही कीं—

१ अकण्णा व मादण्णा हे सख्खे बंधु होत.

२ यांचीं मूळ नांवें अकरस भानजी व माधो भानजी अशीं होतीं. भानजी हें अर्थात् यांच्या वाडिलांचें नांव.

३ हे देशस्थ, ऋग्वेदी, शाखा आश्वलायन, गोत्र भारद्वाज, त्रिप्रवर.

४ आडनांव **पिंगळी**.

५ यांचे वंशज वारंगळ नजीक हनमकोंडा येथें व आसपास आपल्या देशमुखी वृत्तीवर उपजीविका करितात.

६ निजामसरकारचे हद्दींत भानजीपेठ म्हणून गांव आहे.

**पां. न. पटवर्धन**

# राजे विठ्ठल सुंदर यांची माहिती

राजे विठ्ठल सुंदर यांचें नांव प्रसिद्ध असून, ते राक्षसभुवनचे लढाईत कामास आले. हे मूळ कोण, कोठील व यांचे वंशज सध्यां कोठें आहेत एवढें च या ठिकाणीं नमूद करून ठेवितों.

विठ्ठल सुंदर हे मूळचे संगमनेरचे राहणार. देशस्थ, यजुर्वेदी ब्राह्मण, आडनांव परशुरामी.

निजामचे राज्यांत राजा गणेश या नांवानें ओंळखिली जाणारी एक जागीर आहे. औरंगाबादेकडील पिंपरी वगैरे गांवें या जागिरींत मोडतात. ही च विठ्ठल सुंदर यांची जागीर होय. विठ्ठल सुंदरांचे वंशज हैदराबादेस शालीबंडावर राहतात. विद्यमान पुरुष अज्ञान असून, जागीर व मिळकत कोर्ट ऑफ वॉर्डस् कडे आहे.

**पां. न. पटवर्धन**

# अर्नाळा किल्यावरील शिलालेख

ठाणें जिल्ह्यांत आगाशी नजीक अर्नाळा येथें एक जंजिरा आहे. हा मजबूत असून त्यास दोन दरवाजे व दहा बुरुज आहेत. किल्यांत मुख्य तीन देवालयें आहेत. १ शंकराचें, २ देवीचें, व ३ पिराचें. पिराचे देवालयाचें शिल्प हिंदुपद्धतीचें आहे. किल्याचे बाहेर एक भवानीचें देवालय आहे. वेतरणा समुद्रास मिळते त्या ठिकाणीं संगमावर च हा किल्ला उभारलेला आहे. शक १६५९त सदरहू किल्ला श्रीमंत बाजीराव पेशव्यांनीं शंकराजी केशव फडके-हसबनीस यांजकरवीं बांधविला. किल्याचें शिल्पकाम करणारा कोणी तुळाजीसुत बाजी हा होता. त्याची समाधी हल्लींचे अर्नाळा गांवांत आहे. किल्याचे मुख्य दरवाजावर खालील लेख दगडावर कोरून बसविलेला आहे. लेख बाळबोधींत असून लेखाच्या सहा ओळी आहेत. सभोंवार महिरप कोरलेली आहे. लेख खालील प्रमाणें:—

१ बाजिराव अमात्य मुख्य सुमति आज्ञापि
२ ले शंकरा : पाश्चात्यांस वधूनि सिंधुउदरिं बांधा त्वरे
३ जांजिरा : अर्नाळा जळदुर्ग चिंतुनि मनि बाजि तुळाजिसुना
४ शिल्पज्ञें दृढ शौर्य जाणुनि तया दुर्गासि संस्थापिता : १ ॥ अंकबाण
५ रस चंद्र शकातें जेष्ट पिंगळ सीतेंदु दिनातें पंचमी ध्रुवमु पु
६ ष्य हि जेव्हां : येशवंत बुरुजाकृति तेव्हां : २ ॥ १६५९

२ दुरुस्ती नसल्यामुळें किल्ला मोडकळीस आलेला आहे. हल्लीं ज्या गांवास अर्नाळा म्हणण्यांत येतें, तो गांव वस्तुतः नवीन च वसलेला आहे. पूर्वी तेथें किल्याची चौकी होती. किल्यानजीक मच्छीमार कोळ्यांची अद्यापि हि वस्ती आहे.

स. म. दिवेकर
पां. न. पटवर्धन

# एक कोष्टक

५ पांच हात ५ पांच मुठी = १ काठी
२० काठ्या लांब १ काठी रुंद = १ पांड
२० पांड = १ बिघा
६० बिघे = १ पाव
४ पाव = १ चाहूर
१ चाहूर = ६४ कुरगी
८ नवटाक = १ चाहूर

दर कुरगीस ८० भाराच्या पक्क्या शेरानें आठ शेर बी पेरणीस लागतें. ह्यांतील विघ्यास अदिलशाही विघा म्हणतात.

हें कोष्टक अमखेड, ता. इंडी जि. विजापूर येथील कागदांत सांपडलें. कुरगी नांवाचें व नवटाक किंवा टाक या नांवाचें जमिनीचें माप कागदोपत्रीं आढळतें.

क्ष. वि. आचार्य कालगांवकर

## मुक्ताबाईचे दोन अप्रकाशित अभंग

( १ )

थै थै म्हणका रे गोपाळा । भेदु जाणे तो विरुळा ॥ धु ० ॥
आशा मनसा हे गाइ थोरी । इचें दुभतें घरोघरीं ॥
सिद्धा साधकांसी चारी । इनें नाडिलें ब्रह्मचारी ॥ १
गाये चरणावीण धांवे । तीस बहुता जनाची सवे ॥
वाळीसारिखा घेतला जींवें । तऱ्हीं त्या रावणासी नव्हतें ठावें ॥ २
गाइनें हाटीलीं इंद्रासी सींगे । त्याचे सर्वांगीं पाडीलीं भगें ॥
आहील्या गौतमें श्रापीली रागें । तरी त्या चंद्रासी कळंक मागे ॥ ३
गाय वोथरली ईश्वरासी । सींगें रोवीलीं दोहीं कुसी ॥
त्राहे त्राहे रुसीकेसी । कही या गाइवेगळें करीसी ॥ ४
गाये लागली शुकदेवापाठीं । त्यानें फिरोन हाटीली काठी ॥
लपों गेला गिरीकपाटीं । त्यास मोक्ष जाला वैकुंठी ॥ ५
गाये नामदेवें त्रासीली । हृदवीणें खुटा सोडीली ॥
ज्ञानदेवें भोवडीली । इतुकें देखोनी मुक्ताई हांसीली ॥ ६

( २ )

योगिया म्हणवी आणी इंद्रियाचा रंक । तयाचा विवेक जाळीं परता ॥ १ ॥
तपोनिधी आणी इच्छेचा पाईक । तयाचा विवेक जाळीं परता ॥ २ ॥
वेदशास्त्र आणी वितंडवादक । तयाचा विवेक जाळीं परता ॥ ३ ॥
मुक्ताई म्हणे परमार्थ माईक । तयाचा विवेक जाळीं परता ॥ ४ ॥

असे हे दोन अभंग डोमगांव मठांतील बाड अनुक्रमांक १२ यांत आढळले. मला वाटतें ते अप्रकाशित आहेत.

शं. श्री. देव

# शहाजीची स्त्री नरसाबाई

१ पुढील असल दानपत्र शके १६०९ पौष वद्य ३० रविवारचें असून तें सातारकर राजोपाध्यांच्या दप्तरांत मिळालें. या सालीं पौष व॥ ३० रोजीं पडलेल्या अर्धोदय महापर्वकालीं शहाजीची स्त्री नरसाबाई इनें बाळंभट आरवीकर यांस दानपत्रांत दिलेला भाग अग्रहार दिला.

२ दानपत्रांत नरसाबाईचा मुलगा राजे संतोजी याचा उल्लेख आहे. संतोजीचा उल्लेख मराठी बखरींतून आलेला आहे; हा संतोजी कर्नाटकांत होता. तिकडे त्यानें शिवाजी महाराज व राजाराम महाराज यांच्या कारकीर्दींत पराक्रम गाजविला होता. त्याच्या आईचें म्ह० शहाजीच्या तिसऱ्या स्त्रीचें नांव आज तागायत अज्ञात होतें. या दानपत्रावरून नरसाबाई हें या स्त्रीचें नांव होतें असें नवीन च कळतें.

३ नरसाबाई हीं नांवावरून कर्नाटकांतील होय हें उघड होतें. डफ व इतर बखरकार यांचे लिहिण्याप्रमाणें ही शहाजीची रखेली होती कां स्त्री होती, याचा मात्र उलगडा होत नाहीं.

४ नरसांबपूर हें नांव नरसाबाईवरून पडलें ही विशेष गोष्ट दानपत्रांत नमूद केलेली आहे.

श्रीमंगल्लमूर्ती मोडी – असल

॥ ७

स्वस्ति श्री शाळीवाहन शकाब्दां शके
१६०९ प्रभवनाम संवछर पुस्य बहु
ल आमावास्या भानवासरे श्रीम-
तु रामेश्वरभट याचे पुत्र प्र-
भाकरभट याचे पौत्र बाळं-
भट सूत्र आशलायेन गोत्र शा-
कल्ये सोा अरवीकर उपनाम
उपाधे यांसी-माहाराज-राज-
श्री शहाजी राजे भोसले यांची
स्त्री राजश्री संतोजी राजियां-
ची माता राजश्री नरसाबाई
लिहून दिधले दानपत्र ऐसे

जे पुस्य बहुळ अमावास्यां
मानवासरे अर्धोदय माह्य पर्व-
काली श्रीरत्नेश्वर श्रीतीर्थे
नरसांबापुर अग्रार केले थाल नर-
संबापुर पूर्वनाम तोरपाडी
नपिनूरचे पूर्वभागी नांमटचे दक्षण
भागी पुद्पटचे उत्तरभागी इ-
कोगानचे पश्चमभागी देश ना
तापिनूर या चेंटवाल प्रांत त्रिशान-
ल या गांवी क्षेत्रे केली २३ तेवीस
त्यामधे तुम्हास येक क्षेत्र येणे प्र-
मार्गे संख्या करून सहिरण्योद-
क धारादत्त दानपूर्वक येक क्षेत्र
दिधले असे नजी पुंजी व तोप व झाड
झाडोरा व सुवर्न अदाये व धान्य अदाये
निधि निक्षेप जल तरु पाशाण अक्षणी
आगामी सिधी साध्य अस्टभोग तेज
स्वाम्य या सकळ समुदाये सहित क्षेत्र दिधले
असे तरी पुत्र पौत्र पारंपर्य आचंद्रार्क
सर्वमान्य फळ भोगवटा येकरून सुखी
असिले पाहिजे

(शिक्का) पां. ग. पटवर्धन

---

*दानपालनयोर्मध्ये दानाच्छ्रेयोनुपालनं । दानात्स्वर्गमवाप्नोति पालनादच्युतं पदम् ॥१॥ स्वदत्ताद् द्विगुणं पुण्यं परदत्तानुपालनं ॥ परदत्तापहारेण स्वदत्तं निष्फलं भवेत् ॥ २ ॥ स्वदत्तां परदत्तां वा यो हरेत वसुंधरां । षष्टी वर्ष सहस्राणी विष्ठायां जायते कृमिः ॥ ३ ॥

---

* हे तीन श्लोक या दानपत्राचे पाठीमागें असून बालबोधी लिपींत लिहिलेले आहेत.

# औरंगजेबाच्या मूर्तिभंजकत्वाविषयीं दंतकथा

अलीकडे औरंगजेब मूर्तिभंजक किंवा हिंदूंचा छळ करणारा म्हटलें म्हणजे तें मुसलमान लोकांस अगदीं खपतनासें झालें आहे. त्यांची मनोवृत्ति इतकी नाजूक अलीकडे च कां झाली कोण जाणे ! परंतु आपल्या लोकांमध्यें औरंगाचें मूर्तिभंजकत्व प्रसिद्ध आहे; व त्याविषयीं अनेक दंतकथा आपणामध्यें प्रचलित आहेत. त्यांपैकीं कांहीं येथें नमूद करूं.

१ **श्रीवाराणशी** क्षेत्रीं **श्रीविश्वनाथाचें** देवालय औरंगानें फोडल्याविषयीं इतिहासांतरीं दाखले आहेत. देवाच्या प्रासादाचा विध्वंस करून त्यानें तेथें मशीद बांधिली, ती अद्याप हि शाबूद आहे. मुसलमानांचा स्पर्श टाळण्यास्तव **विश्वेश्वरानें भागीरथी**मध्यें उडी घेतल्याची दंतकथा आपल्या लोकांत प्रसिद्ध आहे. जेथें **विश्वेश्वरानें** उडी घेतली त्या स्थलास **मणिकर्णिका** तीर्थ म्हणतात. **मणिकर्णिका** तीर्थांत बिल्वदळें वाहिलीं असतां बुडतात व तीं जलमग्न होऊन राहिलेल्या विश्वेश्वरास पावतात, अशी भाविक जनांची आपणांमध्यें पूर्ण श्रद्धा आहे. याप्रमाणें **बिंदुमाधवाचा** प्रासाद उद्ध्वस्त करून तेथें हि **औरंगानें** मशीद बांधिली. **बिंदुमाधवा**ची भग्न झालेली मूर्ति काशीस एका सावकाराकडे ठेविली आहे.

२ ही नर्मदेच्या पलीकडील प्रदेशांतली कथा झाली. दक्षिणेमध्यें औरंगजेबास **मलिकंब**राचें 'खडकी' शहर व त्या भोंवतालचा प्रदेश आवडत असे. तो तेथें दक्षिणचा सुभेदार असतां राहूं लागला. **खडकीस** त्यानें '**औरंगाबाद**' असें नांव दिलें. **औरंगाबादे**नजीक 'रोझा' गांव हि त्याच्या आवडीचें ठिकाण होतें. त्या गांवाच्या खालीं च **वेरूळ** आहे. वेरूळच्या डोंगरांत बौद्धांचीं व हिंदूंचीं लेणीं आहेत. त्यांतील मूर्ति प्रचंड पण सुरेख अशा आहेत. परंतु त्या सर्व छिन्नभिन्न केलेल्या आहेत; त्यांमध्यें एक हि सबंध मूर्ति सांपडावयाची नाहीं. हें सर्व कृत्य औरंगजेबाचें च. त्याविषयीं एक दंतकथा अशी आहे कीः—वेरूळच्या लेण्यांत 'नीळकंठेश्वर' म्हणून जें लेणें आहे त्यांतील नीळकंठेश्वराच्या बाणास स्नान घातलें म्हणजे तो बाण पाहणारास त्यांत पूर्वजन्मीं आपण कोणत्या योनींत होतों तें स्पष्ट दिसत असे ! **औरंग** जेव्हां तें लेणें भंगण्यास गेला तेव्हां लेण्याच्या बचावासाठीं, लोकांनीं अशा प्रकारचा बाण येथें आहे याकरितां हें लेणें आपण फोडूं नये म्हणून त्याची विनवणी केली. त्या विनवणीवरून, मी पूर्व जन्मीं कोण होतों तें पाहूं या, म्हणून त्यानें बाणास स्नान घालविलें व आंत पाहतों तों त्यास कुत्रा दिसला ! कुत्रा जसा आपणांमध्यें तसा मुसलमानांत हि फार अपवित्र मानितात. आपण पूर्वजन्मीं कुत्रा होतो हें पाहातां च औरंगास अत्यंत क्रोध चढून लेण्यांत कडबा भरून आग लावण्याचा हुकूम त्यानें सोडला. कडब्याच्या आगीनें लेण्याची खराबी झाली व सर्व मूर्ति भंगून गेल्या. ही दंतकथा वेरुळास अद्याप सांगतात. **नीळकंठेश्वराचा**

बाण इतका नितळ व तेजस्वी आहे कीं अद्याप हि त्यावर पाणी ओतून पाहूं लागलें असतां त्यांत आपलें तोंड चांगलें दिसतें.

३ **श्रीत्र्यंबकेश्वराचें** देवालय प्रथम हेमाडपंती तऱ्हेचें होतें. त्याचा विध्वंस करून औरंगजेबानें शेजारीं च मशीद बांधिली. पुढें ती मशीद मोडून **बाळाजी बाजीराव पेशव्यानें** देवळाच्या जागेवर हल्लींचा टोलेजंग प्रासाद बांधिला, असें पेशव्यांची नजर आणि **त्र्यंबक**वर्णन या ग्रंथांत लिहिलें आहे.

४ **भीमा-नीरा** संगमावरील **नरसिंगपूर** येथें **नरसिंहाचें** स्थान आहे. तेथें औरंगजेब गेला असतां देवळांतून विंचू, सर्प वगैरे विषारी कीटक निघून त्याच्या सैन्यास उपद्रव देऊं लागले. या कारणानें तो त्या देवास सोडून पुढें तसा च चालता झाला; अशी दंतकथा आहे. पण दुसरी हकिकत अशी आहे कीं, औरंगजेब येण्याच्या वेळीं मूळ मूर्ति पुजाऱ्यांनीं नदीच्या वाळवंटांत लपवून ठेविली व दुसरी च एक मूर्ति घडवून देवळांत स्थापिली. हल्लीं नरसिंगपुरास देवळाच्या गाभाऱ्यांत नरसिंहाच्या दोन मूर्ति आहेत. त्याचें कारण हें च असावें. शिवकाव्य, चमत्कार सात, यामध्यें पुढील श्लोक आढळतात ते असे:--

ततोऽसौ यवनाधीशो नीरा-भीमरथीगतम् ॥
नृसिंहादिपुरं यातः प्रतिमास्फोटनोद्यतः ॥ ४० ॥
वृश्चिकोरगसंकाशान् कीटान् प्राणापहारकान् ॥
देवालयाद्विनिर्यातान् दृष्ट्वाग्रे प्रययौ खलः ॥ ४१ ॥

५ याप्रमाणें च **पंढपूरच्या विठोबाचा** हि बचाव मूळ मूर्ति लपवून ठेवून दुसरी बसवून केला असावा. पण **शिव**काव्याच्या सातव्या चमत्कारामध्यें म्हटलें आहे कीं, औरंगजेब आला असतां त्यास बडव्यांनीं देवावरील फुलांचा गजरा दिला. गजऱ्यांत एक केंस **औरं**गाच्या नजरेस आला, व तुमच्या देवास केंस असतात काय? असें विचारल्यावरून **बडवे,** होय असें तर बोलून गेले. कोठें आहेत ते दाखवा असें म्हणतां च बडव्यांची पांचावर धारण बसून त्यांनीं देवाची करुणा भाकिली. तों देवाच्या डोकीवर काळेभोर लांब व दाट असे केंस दिसूं लागले! ह्या चमत्कारामुळें **विठोबाचा** त्या वेळीं बचाव झाला!! शिवकाव्यांत पुढील श्लोक आहेत:—

यद्यदेव नगरं ययौ प्रभुस्तत्र तत्र विशिखोऽरुणन्नृपान् ॥
देवता अपि पुरे पुरे स्थिताः स्फोटयन्नथ ययौ स पंढरीम् ॥ १२ ॥
विठ्ठलस्य परिचारकास्तदा देवतागलगतां सुमालिकाम् ॥
नारिकेलमपि तस्य ते पुरः स्थापयंत इदमूचिरे द्विजाः ॥ १३ ॥
विष्णुरत्र भगवान् घनप्रभो रक्ष्य एष भवता दयावता ॥
माल्यगं कुटिलकुंतलं स वै संविलोक्य समुवाच तान्द्विजान् ॥ १४ ॥

विठ्ठलस्य शिरसीह कुंतलाः संति किं वदत भो द्विजास्तदा ॥
कश्चन स्मृतहरिं नमन् जगौ संति विठ्ठलशिरस्यहो कचाः ॥ १५ ॥
इत्युक्तवंतं विप्रं तं यवनः प्रत्यभाषत ॥
एवं चेत्तर्हि तं देवं मां प्रदर्शय सत्वरम् ॥ १६ ॥
ओमित्युक्त्वा ततः शीघ्रं देवालयमगाद्विजः ॥
साष्टांगं प्रणिपत्याह सत्यं कुरु वचो मम ॥ १७ ॥
प्रासादं समुपेत्यासौ देवदेवस्य मस्तके ॥
तुतोष कुन्तलान्दृष्ट्वा लंबमानान्घनान्बहून् ॥ १८ ॥
अतितुष्टः स यवनः साष्टांगं प्रणनाम तम् ॥
भूषणानि च वासांसि विठ्ठलाय ददौ मुदा ॥ १९ ॥

६ **जेजुरीस औरंगाचे** लोक **खंडोबाच्या** देवळास उपद्रव देण्यास गेले. त्यांनीं देवळास जाण्याच्या पायऱ्यांवरील कांहीं कमानी फोडल्या, तों देवाचा हवालदार **यशवंतराव** याच्या वरच्या बाजूस खडकास एक छिद्र आहे; त्यांतून हजारों भुंगे बाहेर पडले व त्यांनीं त्या लोकांस बेजार करून त्यांचा पाठलाग केला! भुंग्यांचा मारा इतका झाला कीं, शेवटीं **औरंगानें** सोन्याचा भुंगा करून त्यास पाचूचे पंख व मोतीं लावून तो देवास अर्पण केला! तेव्हां एकदांचे भुंगे परत गेले!! तो भुंगा देवाच्या जामदारखान्यांत होता. तो रामोशांच्या दंग्यांत नाहींसा झाला म्हणून सांगतात. ( वि. ज्ञा. वि. पु. ४६ अंक २ पृष्ठ ५० पहा. ) ह्या दंतकथेंत वर्णिलेली **खंडोबाची** सामक्षा पाहून **औरंगानें** त्यास ' अजमतखान ' असें नांव दिलें, असें हि कळतें. अजमतखान हें नांव **औरंगानें** दिलें असल्याबद्दल **मोल्स्वर्थ** हि आपल्या कोशांत ' अजमत ' शब्दाचा Powerfulness, Living Virtue वगैरे अर्थ देऊन पुढें लिहितो:— " Hence the name अजमतखान given by Aurangzeb to the idol of जेजोरी, because he was constrained to flee before the manifestations of its active divinity."

७ **यवत** रेल्वेस्टेशनाजवळ **भुलेश्वराचें** ( बहुलेश्वराचें ! ) देवालय प्रेक्षणीय असें आहे. ह्या देवालयाच्या भिंतींवर भारतांतील निरनिराळे देखावे उठावांत खोदले आहेत. परंतु त्या लहानसर च पण सुबक मूर्तींतील एक हि शाबूद राहिली नाहीं! सर्व मूर्ति छिन्नभिन्न करून टाकिलेल्या आहेत. हें हि कृत्य औरंगजेबाचें च म्हणून शेजारच्या **माळशिरस** गांवचे लोक सांगतात ( वि० ज्ञा० पु० ४६ अंक २ पृष्ठें ५३।५४ पहावीं ).

**का. ना. साने**

# जुनीं मराठी गीतें

## गुराख्यांचीं गाणीं

भारत-इतिहास-संशोधक-मंडळानें "हदगा ऊर्फ भोंडलें", "धनगरांच्या ओंव्या" व "स्त्री-गीतें" प्रकाशित करून मराठी भाषेचें सोपपत्तिक अध्ययन करणारांस एक महत्त्वाचें साधन प्राप्त करून दिलें आहे. प्रस्तुत गाण्यांत एक प्रकारचा काव्यरस व तद्भूत गोडी आहे. हीं गाणीं परंपरेनें मुखोमुखीं चालत आलेलीं असतात. गुराख्यांचीं कांहीं गीतें तर मोठीं सुरस व कित्येक सर्ग होतील, अशीं दीर्घ असतात. "हम्मा गीत" म्हणून गुराख्यांचें गाई, बैल व वासरें यांस अनुलक्षून एक काव्य आहे; तें फार च सुंदर असून, त्याचे कित्येक सर्ग आहेत.

### गीत १ लें

( सांगणारः—ज्ञानू कृष्णा वाणी. )

काळा बैल पागला ॥ पागला ॥ वणव्या डोंगरिं लागला ॥ लागला ॥ चल्ला जाऊ ॥ वन पाऊ ॥ वनांत आगीन जळती ॥ जळती ॥ चल्ला जाऊ ॥ आगीन पाऊ ॥ आगीन पान्यानं ईजती ॥ ईजती ॥ चल्ला जाऊ ॥ पानी पाऊ ॥ पानी पसार मांडीत ॥ मांडीत ॥ चल्ला जाऊ ॥ पसार पाऊ ॥ पसार लांडग फाडीत ॥ फाडीत ॥ चल्ला जाऊ ॥ लांडग पाऊ ॥ लांडग वासर तोडत्याती ॥ तोडत्याती ॥ चल्ला जाऊ ॥ वासर पाऊ ॥ वासर पित्याती गयाला ॥ गयाला ॥ चल्ला जाऊ ॥ गयी पाऊ ॥ गईला धनी पिळीत ॥ पिळीत ॥ चल्ला जाऊ ॥ धनी पाऊ ॥ धनी दुदान दडवीत ॥ दडवीत ॥ चल्ला जाऊ ॥ दुदान पाऊ ॥ दुदान दडवीत कुंभार ॥ कुंभार ॥ चल्ला जाऊ ॥ कुंभार पाऊ ॥ कुंभार चाक दडवीत ॥ दडवीत ॥ चल्ला जाऊ ॥ चाक पाऊ ॥ चाक सुतार तासीत ॥ तासीत ॥ चल्ला जाऊ ॥ सुतार पाऊ ॥ सुतार किकर दडवीत ॥ दडवीत ॥ चल्ला जाऊ ॥ किकर पाऊ ॥ किकर लव्हार घडवीत ॥ घडवीत ॥ चल्ला जाऊ ॥ लव्हार पाऊ ॥ लव्हार भाता दडवीत ॥ दडवीत ॥ चल्ला जाऊ ॥ भाता पाऊ ॥ भाता चांबार शीवीत ॥ शीवीत ॥ चल्ला जाऊ ॥ चांबार पाऊ ॥ चांबार रापी दडवीत ॥ दडवीत ॥ चल्ला जाऊ ॥ रापी पाऊ ॥ रापी म्वाट शीवीती ॥ शीवीती ॥ चल्ला जाऊ ॥ म्वाट पाऊ ॥ म्वाट पोचलीं विहिरीला ॥ विहिरीला ॥ चल्ला जाऊ ॥ विहिर पाऊ ॥ विहिर भरली पाण्यान ॥ पाण्यान ॥ चल्ला जाऊ ॥ पाणी पाऊ ॥ पाणी चाललय पाटान ॥ ॥पाटान ॥चल्ला जाऊ॥ पाट पाऊ ॥ पाट पोचला बागला ॥ बागला ॥ चल्ला जाऊ ॥ बाग पाऊ ॥ बाग भरली फुलान ॥ फुलान ॥ चल्ला जाऊ ॥ फुलं पाऊ ॥ फुलं गुरव तोडीतो ॥ तोडीतो ॥ चल्ला जाऊ ॥ गुरव पाऊ ॥ गुरव दुरान शीवीतो ॥ शीवीतो ॥ चल्ला जाऊ ॥ दुरान पाऊ ॥ दुरान गंगेला चडवीतो ॥ चडवीतो ॥

## गीत २ रें

चाड बांदिल काचाच ॥ काचाच ॥ बैल जुपिली तीसाची ॥ तीसाची ॥ आमच्या गांवचा लक्ष्मी पांड्या । लक्ष्मी पांड्या ॥ त्याला झाल्या सोळा खंड्या ॥ सोळा खंड्या॥ सोळा खंड्याच नव मण भूस ॥ नव मण भूस ॥ आटकर पटकर तेल्याला॥ तेल्याला। तेली म्हणतो॥ रविन घाना॥ पाडिन मेना॥ गुरवाचा॥ गुरवाचा ॥ गुरव म्हणतो ॥ शिविन पत्रावळी ॥ देईन गंगला ॥ गंगला ॥ गंग म्हणती ॥ वडीन तोर ॥ पाडीन मोर ॥ मांगाचा ॥ मांगाचा ॥ मांग म्हणतो ॥ आटिन नाडा ॥ घालिन येडा ॥ नांगराला ॥ नांगराला॥ नांगुर म्हनतो॥ वडिन तास॥ करीन नास॥ जिम्नीचा ॥ जिम्नीचा ॥ जमिन म्हणती ॥ पिकविन खंड्या ॥ पाडिन लेंड्या ॥ कुणब्याच्या ॥ कुणब्याच्या ॥ कुणबी म्हणतो ॥ देईन चावडी ॥ करीन वावडी ॥ कुरकळण्याची ॥ कुरकळण्याची ॥ कुरकळणी म्हणतो ॥ लिविन चिटी ॥ घालिन भेटी ॥ सरकारला ॥ सरकारला ॥

## गीत ३ रें

'भ्र' गे मोरी ॥ धार काड पोरी ॥ पोरीची बोट ॥ बाग लोट ॥ हंबू तंबूचा । ड पाला ॥ ड पाला ॥ डवरी गोसावी, र नाला ॥ र नाला ॥ जेटा झाडिल, र गेला ॥ र गेला ॥ ती जट पडली, र लवनी र लवनी॥ लवनी तवनीचा, र तागू ॥ र तागू ॥ तागू पिल्याची, र जाळी ॥ र जाळी ॥ सीता कोंडली, र माळी ॥ र माळी ॥ माळा मुरडीचा, र काटा ॥ र काटा ॥ गया लागल्या, र वाटा ॥ र वाटा ॥ वाटतिटचा, र वाणी ॥ र वाणी ॥ गय्या परतल्या, र पाणी ॥ र पाणी ॥ पाणथडीचा, र मासा ॥ र मासा ॥ गय्या लागल्या, र देसा ॥ र देसा ॥ र र देसाचा, र याळू ॥ र याळू ॥ नंदी बैल, र खेळू ॥ र खेळू ॥ खेळ खेळ पुतळया, र चांया ॥ र चांया ॥ बैल डिराकला, र पांड्या ॥ र पांड्या ॥ पांड्याच्या गयांत, र अन्ना ॥ र अन्ना ॥ जानी गाई, र सुतळी ॥ र सुतळी ॥ जानी गाईच्या गळ्यांत, र पेंड ॥ र पेंड ॥ आज वसीन दह्या दुधाच चार लोंड ॥

## गीत ४ थें

करड्यांत करड काकाकू ॥ काकाकू ॥ असा बैल गुन्नाचा ॥ गुन्नाचा ॥ पाटिव शेंडा फुल्लाचा ॥ फुल्लाचा ॥ फूल गेल देवरशी ॥ देवरशी ॥ मलुचा मलुचा गुड संचाळ ॥ गुड संचाळ ॥ गुड गेला करवंदजाळी ॥ करवंदजाळी ॥ करवंदजाळीला आला राग ॥ आला राग ॥ राग। सरसा मारला ढाण्या वाग ॥

## गीत ५ वें

( सांगणारः—महादू विठोबा थोरात )

आगाड्याच मगाड ॥ गाड्याच रुमण ॥ गाडा गेला येशी ॥ तीन पाया ताशी ॥ वाण्याची भांग ॥ चोरटा मांग ॥ उडाली मुंगी ॥ तुडला नाडा ॥ आमच्या ढोरांत, गणेश पाडा ॥ [ अमक्याच्या ] ढोरांत, लांडा रेडा ॥

## गीत ६ वें

( सांगणारः—रंगो गोविंदा लाटणे )

वाकडी तिकडी बावळ ॥ त्यावर बसला व्हला ॥ व्हला न्हव गुजर ॥ बाळा बैल भुजर ॥ बाळ्या बैलाची येसन ॥ निळ्या घोडीवर बसन ॥ निळ्या घोडीचा खरारा ॥ आमच्या नागोबाळा सोन्याचा फरारा ॥

## गीत ७ वें

( सांगणारः—पांडू लखू पाटील )

दण दण दिवाळी ॥ गाई म्हशी ओवाळी ॥ गाय म्हशी चौर ॥ बैल न्हवर ॥ न्हवर कुणाच ॥ किस्ण देवाच ॥ किस्ण देवाला बगुन गुन गुन डोळ ॥ अमाला बगून सायाच लोळ ॥ लोळता लोळता गेल टेका ॥ फट गौळीच्या लेका ॥ अंकर करचील ॥ निंकर करचील ॥ रिंगणीच्या झाडा खायन वाकून जाशील ॥ रिंगणीचा मोडला काटा ॥ काटा न्हव कोंकळी ॥ जानी गाई पुतळी ॥ इंड भुंड रेशीम गोंड ॥ आज वर्सान द्या दुधाच लोंड ॥

## गीत ८ वें

खडकावर होत बेल ॥ त्वारें पेल पाणी ॥ पोर पोर हाग्या ॥ सरावण देक्या ॥ काय लेका नांगऱ्या ॥ नांगऱ्याच ढोवळ ॥ काटा निगळ ॥ काटा सर ॥ गोटा भर ॥ गोचीड गोमाशी झड ॥ आमच्या नागोबाला शेर शेर तूप ॥

## गीत ९ वें

आटक मटक बाळू दादाच कलतानि कुटक ॥ बाळू दादान दावल याक सुगाड ॥ नारू माळ्याच धरल कुचाड ॥ नारू माळ्यान दावल वांग ॥ हावालदाराला जाऊन सांग ॥ हावालदारान दावला दट्या ॥ बाळा गुरव झाला लट्या ॥ बाळा गुरवान दावल दानव ॥ म्हादू न्हाव्यावर आल वनव ॥ म्हादू न्हाव्यान दावला वस्तारा ॥ लिंगू परटाची मान कुसकरा ॥ लिंगू परटान दावली घडी ॥

जाऊन तारा तांबुळणीच्या घरी ।। तारा तांबुळणीन दावली पकाल ।। आंबाऱ्या मांगाला जाऊन हकाल ।। आंबऱ्या मांगान दावली दोरी ।। नारू माळ्यावर आली फेरी ।। नारू माळ्यान दावला मुळा ।। रावजी वाळ्या झाला खुळा ।। रावजी वाळ्यान दावली लिकनी ।। कृष्णा पलुसकराला हाना फुकनी ।।

### गीत १० वें

( सांगणारः--दादू बाळा भोई )

कानोबा शेट्याला मोडला काटा ।।कानोबा शेट्याला मोडला काटा ।। गया लागल्या वाटा कानोबा ।। गया लागल्या वाटा कानोबा ।। वाटत हुता वाणी कानोबा ।। वाटतहुता वाणी कानोबा गया लागल्या पाणी कानोबा ।। गया लागल्या पाणी कानोबा ।। पाण्यांत हुता मगर कानोबा ।। पाण्यांत हुता मगर कानोबा ।। गया लागल्या डोंगर कानोबा ।। गया लागल्या डोंगर कानोबा ।। डोंगरांत हुता येळू कानोबा ।। डोंगरांत हुता येळू कानोबा ।। गया लागल्या खेळू कानोबा ।। गया लागल्या खेळू कानोबा ।। खेळ खुट्याचा पंद्या कानोबा ।। खेळ खुट्याचा पंद्या कानोबा ।। बैल डिराकला नंद्या कानोबा ।। बैल डिराकला नंद्या कानोबा ।। नंद्या बैलाचा निळा खरारा ।। नंद्या बैलाचा निळा खरारा ।। आमच्या नागोबाला सोन्या रुप्याचा फरारा ।।

**शिकंदर लाल आतार**

# अफळापूर ऊर्फ सैदापूर ऊर्फ शिवापूर हा अग्रहार धारण करणाऱ्या कऱ्हाड क्षेत्रांतील ब्राह्मणांची यादी

कऱ्हाड क्षेत्र फार प्राचीन आहे. राजसूय यज्ञाच्या वेळीं पांडवांच्या दक्षिण-दिग्विजयांत कऱ्हाड प्रांताचें नांव आहे. येथील ब्राह्मणांचीं घराणीं हि फार जुनीं आहेत. त्यांस कऱ्हाड प्रांतांत व इतरत्र हि ठिकठिकाणीं इनामें आहेत; त्यामुळें हीं घराणीं कऱ्हाडाशिवाय इतर ठिकाणीं म्हणजे क्षेत्र माहुली, पाल, मसूर, कोल्हापूर वगैरे पुष्कळ ठिकाणीं पसरलीं आहेत

कऱ्हाड क्षेत्र प्रसिद्ध व प्राचीन असल्यामुळें प्राचीन ब्राह्मणांचीं घराणीं येथें असणें जसें संभवनीय आहे तसें च नवीं नवीं ब्राह्मणघराणीं येथें येऊन राहणें हि संभवनीय आहे.

आज आपणापुढें अफळापूर ऊर्फ सैदापूर ऊर्फ शिवापूर नांवाच्या अग्रहाराचें

धारण करणाऱ्या ब्राह्मणांची जी यादी ठेविली आहे, तींत २२८ ब्राह्मणांचीं नांवें आलीं आहेत. ही यादी सुहुर ( सुरू ) सन समान तिसैन अलफ छ २१ माहे मोहरमं ह्या दिवशीं लिहिली आहे. इंग्रजी वर्ष इ. स. १६९७ हें येतें. म्हणजे यादी २२० वर्षांची जुनी आहे.

ही यादी अस्सल नसून नक्कल आहे. कारण हिच्यावर शिक्का-शिक्के नाहींत. ह्या च २२८ ब्राह्मणांस राजशक २४ मध्यें रामचंद्र पंडित अमात्य यांणी सनद करून देऊन सैदापूर गांवचें नांव शिवापूर ठेविलें. ह्या गांवाचें नांव पूर्वी अफळापूर होतें, असें राजशक २५ मधील श्री. राजारामछत्रपतींच्या सनदेवरून दिसतें. राजशक २४ ईश्वरनाम संवत्सर श्रावण बहुल अष्टमी म्हणजे गोकुळअष्टमी ह्या दिवशीं रामचंद्र पंडित अमात्य यांणी ब्राह्मणास अग्रहार करून दिला. व त्या च दिवशींची राजाराम छत्रपतींची ही सनद आहे. म्हणजे अमात्यांच्या देणगीस हें छत्रपतींचें दुमालपत्र किंवा संमतिपत्र आहे. अमात्यांची सनद अगर तिची नक्कल मला पहावयास मिळाली नाहीं. तथापि ही सनद सैदापूर येथील प्रतिनिधींच्या अमलांतील दिवाणी कोर्टांत दि. मु. नं. ६१ ( १९१०।१९११ ) ह्यांत साक्षीदार भगवंत बहिरव गिजरे यांनीं त्यांची जबानी गुदरल्यावरून पाहावयास मिळाली. व सदरहू यादीच्या डोक्यावर हि "बरहुकूम सनद राजेश्री रामचंद्र पंडित्य अमात्य" असा शेरा आहे. ह्या यादींत २२८ ब्राह्मणांचीं नांवें व त्यांस मिळणाऱ्या धान्याच्या नेमणुका हि दिल्या आहेत.

जो जो प्रांत शिवाजीराजाच्या हस्तगत झाला तेथील वतनदारांच्या व धर्मादाय देणगीच्या जमिनी सरकारांत अमानत करून त्या जमिनींच्या उत्पन्नाचा सुमार करून वतनदारास नक्त नेमणुका द्याव्या व धर्मादाय जमिनींतील धान्याच्या उत्पन्नाचा कयास करून ब्राह्मण वगैरेस धान्याच्या नेमणुका, ब्राह्मणाची योग्यता पाहून देत जाव्या असा परिपाठ त्यानें सुरू केला होता. ही चाल राजारामाच्या कारकीर्दीच्या अखेरपर्यंत चालू होती असें ह्या यादीवरून दिसतें. राजशक २५ बहुधान्य संवत्सरीं आषाढ शु॥ ८ रोजीं राजाराम छत्रपती यांनीं जी निराळी सनद करून दिली तींत ब्राह्मणांनीं विदित केलेला मजकूर जमेस धरला आहे; तो असा:--"तुह्मी स्वामीसमीप वसंतगडच्या मुकामीं... विदित केले कीं आपण ( आपणा ) ब्राह्मणसमुदायास आदलशाहाचे वेळेस इनामभूमी चालत होती या उपरी महाराज राजश्री कैलासवासी स्वामीस देश अर्जानी जाहला त्याही वरघाट कुली इनामती अमानत केल्या ते समयीं आपली इनामभूमी अमानत करून ब्राह्मण पाहून त्यास धर्मादायाची मोईन करून देऊन पाववीत होते तेणेकरून योगक्षेम चालपून क्षेत्रीं वास करून राहिलो होतो त्या उपरी आलीकडे देशामधे तांत्राची धामधूम जाहली होती तेणेकरून देश उद्वस केला" वगैरे वगैरे. यावरून शिवाजी राजाची धर्मादायाची व्यवस्था

कशी होती हें कळून येतें. ब्राह्मण पाहून नेमणूक चालू करावयाची म्हणजे त्यांच्या तहाहयात ती चालावयाची. परंतु संभाजीच्या वधानंतर देशांत पुन्हां मोंगलाची ( तांब्राची ) धामधूम झाली व ती हि व्यवस्था नाहींशी झाली. पुन्हां राजारामाच्या कारकीर्दींत स्थीरस्थावर झाल्यावर त्याभोंवतीं हे ब्राह्मण जमले व त्यांनीं ह्या गांव मिळविला. तथापि ह्या यादीवरून दिसतें कीं, शिवाजीची व्यवस्था कायम च ठेविली होती.

ही यादी अनेक दृष्टींनीं विचारणीय आहे. ह्यापैकीं कांहीं विचारांचें दिग्दर्शन करितों

यादीवरून दिसतें कीं, चांगल्या विद्वान् ब्राह्मणास गांवच्या उत्पन्नापैकीं २ खंडी धान्याची नेमणूक दिली आहे.

एका च घरांत बापलेक किंवा भाऊभाऊ जर चांगले विद्वान् असतील तर त्यास निरनिराळ्या नेमणुका दिल्या आहेत.

सामान्य ब्राह्मणास तीन मणाची नेमणूक दिलेली आहे म्हणजे रोज सुमारें अच्छेर धान्य पडलें.

अशा प्रकारच्या देणगींत तारतम्य नाहीं असें कोण म्हणेल ?

ह्यापुढें राज्याभिषेक शके ३४ ह्या वर्षी शाहूमहाराजांनीं सनद करून दिली. पुढें जमिनी वांटून घेऊन वंशपरंपरेनें धारा देण्याची वहिवाट पडली. ब्राह्मण पाहून गांवचें उत्पन्न वांटून देण्याची चाल बुडाली.

ह्या यादीचे दोन भाग केले आहेत. एका भागांत स्मार्त ब्राह्मणांची व दुसऱ्यांत वैष्णव ब्राह्मणांचीं नांवें दिलीं आहेत. स्मार्त ब्राह्मणांची संख्या १५८ आहे. त्यांत एका त्रिलोचनगिरी नांवाच्या गोसाव्याची हि गणना केली आहे. वैष्णव ब्राह्मणांची संख्या ७० दिली आहे. ह्यावरून त्या काळीं महाराष्ट्रांतलि क्षेत्रांतून वैष्णव समाज निराळा लेखण्याइतकी त्यांची योग्यता व संख्या होती असें दिसतें. स्मार्त ब्राह्मणांच्या आडनावांची संख्या ३३ आहे व वैष्णव ब्राह्मणांच्या आडनावांची संख्या २१आहे. तीं आडनांवें येणेंप्रमाणें:--

स्मार्तांचीं आडनांवें-- १ गिजरे, २ वैद ( वैद्य ), ३ खीरसागर ( क्षीरसागर ह्यांजकडे ग्रामोपाध्यायांचा अधिकार आहे ), ४ अरणके ( अराणके ), ५ पटवर्धन, ६ पुराणीक, ७ उवराणे ( उंबराणी ), ८ अयाचित, ९ डोईफोडे, १० पाठक, ११ मोने, १२ बुराडे, १३ अध्यापक, १४ जोसी, १५ धडके, १६ अटकेकर, १७ पळसवडे, १८ मारुलकर, १९ पाउसे ( पावशे ), २० सिराळकर, २१ भिडसगावकर, २२ वळवड ( डे ), २३ ढवळीकर, २४ सागणे, २५ अग्निहोत्री, २६ भिलवडीकर, २७ साळवेकर, २८ पुजारे, २९ जिरे, ३० दरसे, ३१ गरुड, ३२ पंढरपुरकर, ३३ धोंडी.

वैष्णवांचीं आडनांवें—१ अष्टपुत्रे, २ अवधाने, ३ अयाचित, ४ घळसासे (सी), ५ काळे, ६ कुंभारे, ७ घडाळे, ८ केसादुरी, ९ कर्मीत, १० जांबळे, ११ जगरे, १२ झिजर्डे, १३ टोणपे, १४ टोके, १५ निरले (नेरलेकर), १६ मुंज्यामणी, १७ येरी, १८ रोटी, १९ वरखेडी, २० लुटुपटु, २१ सरडे.

ह्याप्रमाणें २२८ सनद्–वाल्या ब्राह्मणांचीं आडनांवें आहेत. सनद्वाल्यांची नांवनिशी व नेमणुका दिल्यावर महालमजकूर खर्च ४ खंडी धान्य दिलें आहे. त्याबद्दल " बाबती सादिलवार खर्च निा भट ब्राह्मण यह्या केलीं ४ " असें लिहून पोटी तपशील दिला आहे. त्यांत "तुकणभट विन अंतभट विद्वास खंडी १ व येन खर्चाबद्दल खंडी ३" असें लिहिलें आहे. ह्याप्रमाणें विद्वास किंवा विद्वांस हें एक आडनांव आलें आहे.

ऐन खर्च भागून कांहीं शिल्लक राहिल्यास ती सनद्वाल्यांशिवाय, त्यांच्या निस्‌बतीनें एखाद्या विद्वान् ब्राह्मणास देत असत असें दिसतें.

ह्या यादीवरून आपल्या महाराष्ट्र ब्राह्मणांतील भेदोपभेदाबद्दल २२० वर्षांपूर्वीची कांहीं माहिती मिळते कीं काय तें पाहूं:—वर लिहिलेल्या ५५ आडनांवांपैकीं पाठक व डोईफोडे हे दोन वाजसनी शाखेचे यजुर्वेदी ब्राह्मण आहेत व ते स्मार्त आहेत. शंकराचार्यांच्या अद्वैत मताचा आग्रहपूर्वक अभिमान धरणारे जर कोणी महाराष्ट्रांत असतील तर ते हे यजुर्वेदी ब्राह्मण आहेत.

जांबळे आणि सरडे हे सहवासी म्हणजे ज्यांस आपण 'सवाशे' ब्राह्मण म्हणतों त्यांपैकीं आहेत व हे वैष्णव आहेत. सवाशे ब्राह्मण सर्व वैष्णव च आहेत. वैष्णवामध्यें सुमारें ३०० वर्षांपूर्वी राघवेंद्रस्वामींचा म्हणून जो मठ स्थापन झाला त्या मठाचे हे शिष्य आहेत. मठांत सर्व ब्राह्मण ह्यांस पंक्तीस घेऊन जेवतात; परंतु मठाबाहेर त्यांच्या पंक्तीस बसत नाहींत. हल्लीं दक्षिण महाराष्ट्र किंवा उत्तर कर्नाटक ह्या प्रांतांत ब्राह्मण लोकांत, सवाशे लोकांच्या पंक्ति–पावनत्वाबद्दल मोठा वाद माजून राहिला आहे. ह्या यादींत दानयोग्य ब्राह्मणांत त्यांची गणना केलेली आहे. कऱ्हाडास त्यांस षट्कर्माधिकारी सर्व ब्राह्मणांबरोबर निमंत्रण असतें, पंक्तिव्यवहार मात्र होत नाहीं. हल्लीं ह्यांच्यासंबंधानें पाहतां राघवेंद्रमठाचे श्रीस्वामी व त्यांचे शिष्य हा पक्ष ह्यांस अनुकूळ आहे व उत्तरादिमठाचे श्रीस्वामी व त्यांचें शिष्यमंडळ हा दुसरा पक्ष त्यांस प्रतिकूळ आहे. महाराष्ट्रांतील कोणी विद्वान् अशा कामांत पडून योग्य सुधारणा करील काय ? वर दिलेली दोन यजुर्वेदी घराणीं व दोन सहवासी ऊर्फ सवाशांचीं घराणीं खेरीज करून बाकी सर्व घराणीं ऋग्वेदी देशस्थांचीं आहेत. मराठी राज्याच्या काळाच्या पूर्वार्द्धांत सर्व कामांत हे च लोक पुढारी असत व उत्तरार्धांत चित्पावन लोकांच्या चलतीच्या कालांत त्यांच्या सांथाशीं सांदा लावून काम करणारे हि हे च लोक होते. ह्या यादीवरून दुसरें असें हि दिसून येतें कीं, दक्षिणमहाराष्ट्रांत प्राचीन

काळापासून ऋग्वेदी लोकांचीच वस्ती असावा; यजुर्वेदी लोक महाराष्ट्रांत मागून आलेले असावेत.

ह्या यादींत पटवर्धन म्हणून एक आडनांव आहे. कोकणस्थांपैकीं सर्व विश्रुत असं पटवर्धन सरदारांचें घराणें असल्यामुळें हें घराणें कोकणस्थांचें असावें असें प्रथम वाटतें. परंतु, शोधा अंतीं हे पटवर्धन ऋग्वेदी देशस्थ आहेत असें समजलें. मी कऱ्हाडास तीन वर्षें होतों व ह्या घराण्यापैकीं एक गृहस्थ माझ्या शाळेंत तालीम मास्तर होते–ते अजून हि त्याच जागीं आहेत. मी हि त्यांस कोकणस्थ च समजत असे. परंतु दोन वर्षांपूर्वी कऱ्हाडास सदरहू यादी तेथील मामोपाध्यांकडे मिळाली तेव्हां सहज शोध करीत असतां बोलण्यांत हे पटवर्धन देशस्थ असून काश्यप गोत्री आहेत असें समजलें. ह्यांच्या भाऊबंदांचीं घरें कोल्हापुराकडे व फलटणास आहेत. कोकणस्थ पटवर्धन कौंडण्य गोत्री आहेत. कोकणस्थ व कऱ्हाडे आणि ह्याहून हि अल्पसंख्याक ब्राह्मणांच्या पोटवर्गांतील लोकांचीं आडनांवें जरी ठरीव असल्यासारखीं दिसतात तरी त्यांवरून अमुक व्यक्ति अमुक पोटवर्गांतील आहे असें निश्चयानें सांगणें बरोबर होणार नाहीं. आपल्या महाराष्ट्रांतील जुने इतिहाससंशोधक विद्वद्वर्य डॉक्टर भांडारकर ह्यांच्या दक्षिणेच्या प्राचीन इतिहासाच्या इंग्रजी पुस्तकाचें नारायण विष्णु बापटकृत मराठी भाषांतर वाचीत असतां पृष्ठ २३५ वर दिलेला शोध ह्या यादीवरून डळमळूं पाहतो. सदर पृष्ठांत असें लिहिलें आहे कीं:—"बेळगांव तालुक्यांत सांपडलेले एक ताम्रपट्टावर कोरलेलें दानपत्र आहे. त्यावर शके ११७१ हि मिती आहे. त्यांत मजकूर आहे तो येणेप्रमाणें–बीच ऊर्फ बीचण्ण म्हणून जो सिंघणाचा दक्षिणेकडील मुलुखाचा प्रतिनिधि होता त्याचा मल्ल ऊर्फ मल्लिसेट्टी नांवाचा एक वडील भाऊ होता; व तो स्वतः कुहुण्डि प्रांतावरचा अधिकारी होता. तो मल्लिसेट्टि मुदुगल ( म्हणजे बहुशः अलीकडील काळचे मुदुगल ) येथें राहत असे. त्यानें आपला यजमान कृष्णराजा ह्याची मंजुरी घेऊन बागेवाडी ह्या गांवीं निरनिराळ्या गोत्रांच्या बत्तीस ब्राह्मणांस जमिनी दान दिल्या. ह्या बत्तीस ब्राह्मणांचीं उपनामें सांगितलेलीं आहेत. त्यांत अर्वाचीन कालीन महाराष्ट्रीय ब्राह्मणांच्या उपनामांपैकीं कांहीं आहेत हें पाहून कौतुक वाटतें. उदाहरणार्थ, चित्पावन ब्राह्मणांच्या प्रसिद्ध उपनामांतील पटवर्धन व घैसास हीं आणि देशस्थ ब्राह्मणांच्या उपनामांतील घळिसास, घाळिस, व पाठक हीं. ह्या च ११७१ तील ताम्रपटाच्या बाबतींत उहापोह, आपल्या मंडळाच्या शके १८३७ तील तृतीय संमेलनाच्या प्रसंगीं प्रसिद्ध संशोधक रा. रा. चांदोरकर वकीलसाहेब ह्यांनीं " शके ११८१ मधील चालुक्यांचा एक ताम्रपट " ह्या विषयावर निबंध वाचला त्या निबंधांत केला आहे. हे दोन्ही ताम्रपट व ११८२ तील एक ताम्रपट ह्यांतील ब्राह्मणांचीं आडनांवें व गोत्रें ह्यांचा एकत्र विचार त्यांनीं केला आहे. त्यांत पटवर्धन ह्यांचें कौंडिण्य गोत्र दिलेलें नाहीं. पटवर्धन उपनांवाच्या ब्राह्मणांचीं दहा गोत्रें त्यांनीं दिलीं आहेत. व हल्लीं काश्यप, कौंडिण्य व जामदग्नि ह्या तीन गोत्रांचे पटवर्धन आढळतात असें त्यांचें म्हणणें आहे. पैकीं काश्यप गोत्राचे

कऱ्हाडकर देशस्थ पटवर्धन आहेत. रा. चांदोरकर ह्यांचे पटवर्धन कोणत्या पोटभेदां-पैकीं आहेत कोण जाणे !

दक्षिणच्या इतिहासांतील पटवर्धन हें आडनांव देशस्थांत आढळल्यावर घैसास हें आडनांव देशस्थांत आहे काय, ह्याचा शोध केल्यानंतर साताऱ्याजवळ पाटखळ बोर-खळ ह्या गांवचे जोशी कुळकरणी, घैसास उपनांवाचे भारद्वाज गोत्री आहेत, असें आढ-ळलें. कोंकणस्थ घैसास हि भारद्वाज गोत्री च आहेत तर मग ताम्रपटांतील घैसास कोण ! देशस्थ कीं कोंकणस्थ, असा संशय उत्पन्न होतो. घैसास ह्याचें दुसरें रूप घळीसास असें राजवाडे म्हणतात. परंतु ह्या यादींत 'घळसासे' दिले आहेत व ते घळसासी ह्या नांवानें कऱ्हाडास प्रसिद्ध असून त्यांचीं घरें हि तेथें वरीं च आहेत; व ते जामदग्नि गोत्री आहेत. तात्पर्य, ११७१ तील ताम्रपटांत आलेले ब्राह्मण पटवर्धन, घळीसास व पाठक हे ह्या कऱ्हाडच्या २२० वर्षांच्या यादींत हि आहेत. ह्या बत्तीस हि ब्राह्मणांचीं उपनामें ताम्रपटांत आहेत म्हणतात; पण तीं मला पहावयास मिळालीं नाहींत. तीं मिळवून त्यांशीं ही यादी ताडून पाहिल्यास ह्या यादींतील आणखी कांहीं आडनांवें हि त्यांत आढळतील. कऱ्हाडक्षेत्रस्थ ब्राह्मण कुळें अनेक राज्यक्रांत्यांतील सुखदुःखें अनुभवून टिकून राहिले आहेत. अशा प्रकारच्या शोधापासून आमचें अविनाशित्व किती टिकावूं आहे व तें कां ह्याचा इतिहास आपणांस कळूं लागेल.

मला असें वाटूं लागलें आहे कीं, शोधांतीं कोंकणस्थ, कऱ्हाडे यांतील आड-नांवें देशस्थांत बहुतेक सांपडतील. देशस्थ हे फार प्राचीन वतनदार लोक असल्या-मुळें देशमुख, देशपांडे, कुळकर्णी, पाटील, जोशी, सबनीस, दिवाण वगैरे अनेक प्रकारचीं हुद्यांचीं नांवें च आडनांवें म्हणून आपल्यापुढें जोडतात. आपलीं खरीं आड-नांवें लावीत नाहींत. त्यांचा शोध झाला तर कोंकणांतील सर्व ब्राह्मणसमाज देशावरून कोंकणांत जाऊन वसाहती करून राहिले व कांहीं कारणांनीं निराळे समाज पोटसमाज बनले असें ठरेल. व ऐतिहासिक शोधांचें पर्यवसान—आम्ही सर्व एकच वृक्षाच्या शाखा कसे आहों हें—आपणांस कळून येईल.

आतां, मुख्य अग्रहार जो सैदापूर गांव त्याविषयीं दोन शब्द लिहून आटपतें घेतों. हा गांव कऱ्हाड क्षेत्राच्या उत्तरेस कृष्णा नदीच्या कांठीं आहे. कृष्णा व कोयना ह्या नद्यांच्या संगमावरील नाव उतरून पलीकडे गेलें कीं हा गांव लागतो. गांवांत पावकेश्वराचें मोठें देऊळ आहे. व ह्या यादींत लिहिलेलीं सर्व देवस्थानें तेथें आहेत. तेथें परशुरामाची आई जी रेणुकादेवी तिचें देऊळ आहे व नदीच्या पलीकडे खोडशी गांवाजवळ जमदग्नीचें देऊळ आहे. अशी आख्यायिका आहे कीं, जम-दग्न आपल्या पत्नीसह कऱ्हाड क्षेत्राचें माहात्म्य वाराणसीतुल्य करण्यासाठीं आले. ते नदीपलीकडे पोंचले व रेणुकादेवी अस्पर्शा झाल्यामुळें पलीकडे राहिली, ह्या-बद्दल कऱ्हाडास एक म्हण आहे "कऱ्हाड होणार होतें काशी, पण रेणुका झाली विटाळशी".

हा गांव श्री. पंतप्रतिनिधींच्या जहागिरींत मोडतो. त्यामुळें तो प्रतिनिधींनीं च ब्राह्मणांस दिला असावा असें पाहणारांस वाटतें. हल्लींचें कऱ्हाड क्षेत्र प्रतिनिधींनीं पुन्हां वसविलें असून, ह्या क्षेत्रावर त्यांची पूर्ण कृपा आहे. व हें च त्यांच्या जहागिरींचें मुख्य ठिकाण होतें.

---

( पहिला बंद गहाळ झाला आहे व दुसऱ्या बंदाचा वरील
भाग डाव्या उजव्या बाजूस थोडथोडा फाटला
आहे बाकी सर्व शाबूद आहे. )

| ( फाटका भाग ) | केले ।२५ बाकी<br>करार बिघे<br>८५ | की खालसात<br>चावर ॥५ ( फाटले )<br>बाकी करार के(फाटले)<br>ले बिघे ८५ |
|---|---|---|

माहार जमीन
।२० पैकीं खा-
लसात केले बि-
घे ( फाटले ) बाकी
करार केले ८५
बरहुकूम सनद राजेश्री रामचंद्र
पंडित अमात्य

येकूण जमीन चावर २।१५ वजा केले बाकी
जमीन चावर १६॥१५ येकूण गला कैली द-
सेरी सोळूले खंडी
१६१॥१।

ता॥

| अवल जमीन चावर १४॥<br>दर चावरे रमारमी गहू कै-<br>ली खंडी १० येकूण गला<br>कैली दी॥ खंडी<br>१४७॥। | दुम जमीन चावर<br>१॥१५ दर चावरे<br>रमारमी गहू कैली<br>खंडी ७॥ येकूण गला<br>कैली दी॥ खंडी<br>१४८१। |
|---|---|

यासी नावनिसी

देवस्थानें वेरीज

| गला कैली खंडी | तेल वजन |
|---|---|
| १।२ | ।२॥५ |

| | गला | तेल वजन |
|---|---|---|
| श्री रेणुका देवी | ।२ | ०२। |
| श्री हणमंत | ०३॥ | ०१०५ |
| श्री पावकेस्वर | ०३॥ | ०१०५ |
| श्री नरसिंह जल: देवता | ०३॥ | ०१०५ |
| श्री येकवीरा | ०३॥ | ०१०५ |
| मसीद | ।० | ०१०५ |
| | १।२ | ।२॥५ |

ब्राह्मण असामी २२८ येकूण गला

कैली खंडी

१५१॥२।

स्मार्थ असामी १५८ येकूण गला

खंडी

१०९॥१

कीता येक १

| | असामी | गला |
|---|---|---|
| मोरेस्वर भट बिन विस्वनाथभट गिजरे | १ | २ |

कीता येक २

| | असामी | गला |
|---|---|---|
| नारायण भट बिन पोस भट ढवळीकर | १ | २ |

| | असामी | गला |
|---|---|---|
| बाळंभट बिन रामभट गिजरे | १ | १ |
| नीळकंठभट बिन हरभट गिजरे | १ | १० |
| विस्वनाथभट बिन बाळंभट गिजरे | १ | १० |
| ब्रायदेभट बिन | | |

| | असामी | गला |
|---|---|---|
| चंद्रभट बिन संभभट ढवळीकर | १ | १० |
| रामभट बिन चंद्र-भट ढवळीकर | १ | ।॥। |
| लक्ष्मणभट बिन माहादेवभट ढवळीकर | १ | १० |
| गोविंद्भट बिन | १ | १० |

| असामी | | गला |
|---|---|---|
| निळंभट गिजरे | १ | १८ |
| नरसीहभट बिन | | |
| अपद्देभट गिजरे | १ | १८ |
| माह्द्देभट बिन | | ·।।। |
| अपद्देभट गिजरे | १ | |
| केशवभट बिन | | १८ |
| पंढरीभट गिजरे | १ | |
| माह्द्देभट बिन | | ·।। |
| पंढरीभट गिजरे | १ | |
| अंतभट बिन | | १८ |
| क्रस्णभट गिजरे | १ | |
| कासीभट बिन | | ·।। |
| नामराजभट गिजरे | १ | |
| हरभट बिन | | ·। |
| सामराजभट गिजरे | १ | |
| सिवरामभट बिन | | ·।।। |
| नरसीभट गिजरे | १ | |
| भद्रभट बिन | | १८ |
| हरभट गिजरे | १ | |
| लक्षमणभट बिन | २ | १८ |
| रुद्रभट व कासी· भट बिन रुद्रभट गिजरे | | |
| गदाधरभट बिन | १ | ·।। |
| रुद्रभट गिजरे | | |
| वीरेस्वरभट बिन | १ | १ |
| विस्वनाथभट गिजरे | | |
| हरीभट बिन | १ | १८ |
| मानभट वैद | | |
| लक्षमणभट बिन | १ | १८ |
| हरभट वैद | | |

| असामी | | गला |
|---|---|---|
| गोसभट हबळीकर | | |
| माहादे(व?)भट बिन | १ | ·।।। |
| चद्रभट हबळीकर | | |
| बाळंभट बिन | १ | १।। |
| हरभट पुराणीक | | |
| विठलभट बिन | १ | १८ |
| लिगणभट अभि· होत्री भिलवडीकर | | |
| गोविंदजोसी बिन | १ | १८ |
| हरजोसी | | |
| लक्ष्मण जोसी बिन | १ | ·।।। |
| गोविंद जोसी | | |
| अंतभट बिन | १ | १८ |
| रुद्रभट धडके | | |
| अपजोसी बिन | १ | ·।।। |
| अंतजोसी | | |
| नरसीभट बिन | १ | ·।।। |
| तुफणभट घोडी | | |
| अपद्देभट बिन | १ | ·।। |
| रघुनाथभट दरसे | | |
| विठलभट बिन | १ | ·।।। |
| नारायेणभट दरसे | | |
| अंतभट वेद बिन | १ | ·।।। |
| लक्षमणभट अध्यापक पंढरपूरकर | | |
| विनायकभट बिन | १ | ·।। |
| सागरभट गरुड | | |
| आपद्देभट बिन | १ | ·।। |
| सागरभट गरुड | | |
| रघुनाथभट बिन | १ | ·।। |
| नारायेणभट दरसे | | |
| रामभट बिन | | |

पलिकडील तीरावर देवळें येथें त्यांनीं स्थापिलेला मारुती आहे. अंतोबा कुळकरणी मेथवाडकर यांस समर्थांचा अनुग्रहप्रसाद झाला होता. मेथवाडचे समर्थसांप्रदायी पंढरपुरास वरील मारुतीचे दर्शनास जाण्याची चाल अद्याप आहे.

( इ ) तुकारामप्रभुंचे शिष्य निळोबा पिंपळणेरकर यांचे वंशज माहाडिकांचें तारळें ( जि. सातारा ) येथें राहतात. त्यांस हल्लीं नागपुरे असें आडनांव पडलें आहे. ही मंडळी सज्जनगडास वारीस जाण्याची परंपरा चालू आहे.

( उ ) मोगलाईंत उदगीरचे उत्तरेस सुमारें १६ कोसांवर शिरूर येथें समर्थसंप्रदायाचा मठ आहे. तेथील मठपतीजवळ आपल्या चिपळ्या व वीणा निळोबांनीं संप्रदायपरंपरेच्या रक्षणार्थ त्यांचे पश्चात् द्याव्या असा तुकोबांचा निळोबांस निरोप होता.

वरील ( अ—उ ) कलमांत दिलेली माहिती वाचनिक अगर कागदपत्रांचे पुराव्यानें मला अद्याप निश्चित करतां आली नाहीं.

**खं. चिं. मेहेंदळे**

## श्रीघुसृणेश्वराचा प्रासाद आणि शिवालयतीर्थ यांचा जीर्णोद्धार

वेरुळास श्रीघुसृणेश्वराचा प्रासाद आणि शिवालय तीर्थ हीं प्रथम कोणीं बांधिलीं याचा पत्ता लागत नाहीं. परंतु त्यांचा जीर्णोद्धार केल्याबद्दल दाखले सांपडतात. ते असेः—

१ शिवाजीचा आजा जो मालोजी भोंसला त्यानें शके १५२१ ( इ० स० १५९९ ) च्या सुमारास " वेरुळीं श्री सदाशिवाचें देवालय व शेवाल तीर्थ जीर्ण बहुत दिवसांचे पाहून त्यांचा जीर्णोद्धार केला." असा, बडोदें येथें शके १८१७ मध्यें प्रसिद्ध झालेल्या शिवदिग्विजय ग्रंथाच्या ३८ व्या पृष्ठावर दाखला सांपडतो. ग्रंथकार आपल्या लिहिण्यास आधार देत नाहीं.

२ त्यानंतर शके १६५२ ( इ० स० १७३० ) मध्यें मल्हारराव होळकराची स्त्री गौतमाबाई हिनें श्रीघुसृणेश्वराच्या प्रासादाचा जीर्णोद्धार केल्याचा लेख प्रासादावर खोदला आहे. प्रासाद श्रीत्र्यंबकेश्वराच्या प्रासादासारखा च आहे, पण लहानसर आहे. भोंवतालचें पटांगण हि तितकें विस्तीर्ण नाहीं.

---

१ ह्या ज्योतिर्लिंगास 'घृष्णेश्वर' म्हणण्याचा पाठ आहे. पण 'घृष्णेश्वर ह्या नांवाचा कांहीं अर्थ बसत नाहीं. 'घुसृणेश्वर' यांत 'घुसृण' शब्दाचा अर्थ 'केशर' असा आहे. बारा ज्योतिर्लिंगांच्या नामावळींत हि " हिमालये तु केदारं घुसृणेशं शिवालये " असें म्हटलें आहे. बृहत्स्तोत्ररत्नाकर, पृष्ठ १३२, स्तोत्र ६१ पाहावें.

३ शिवालय तीर्थाचा जीर्णोद्धार, अहल्याबाई होळकरीण हिनें शके १६९१ ( इ० स० १७६९ ) मध्यें केल्याचा लेख तीर्थावर खोदला आहे. हें शिवालय तीर्थ आयताकृतीचें विस्तीर्ण असून चारी बाजूंनीं संगीन घोटींव चिऱ्यांनीं बांधिलेलें आहे. हल्लीं त्यांत नीळ उत्पन्न होऊन पाणी खराब झालें आहे.

का. ना. साने.

## बेगमपूर ( जि. सोलापूर ) हें नांव कां पडलें ?

सोलापूर जिल्ह्यांत माचनूर नजीक बेगमपूर नांवाचें एक खेडें आहे. बेगमपूर हें नांव औरंगजेबाच्या एका मुलीच्या मृत्युस्थानावरून पडलें, असा प्रचलित समज आहे. शालोपयोगी इतिहासाच्या वाड्मयांतून या बाबीचा उल्लेख आलेला आहे. यांत तथ्य किती तें पाहूं.

औरंगजेबास एकंदर पांच मुली होत्या. त्यांपैकीं बदरनिसा व झेबुनिसा या अनुक्रमें इ. स. १६७० व १७०२ मध्यें उत्तर हिंदुस्थानांत वारल्या. औरंगजेबाबरोबर दक्षिणेंत येऊन, त्याचा कारभार पाहणारी झीनत-उ-निसा ही हि औरंगजेबानंतर बऱ्याच वर्षांनीं दिल्लीकडेस च वारली. बाकी मिहिरउन्निसा व झुबूदत उनिसा या दोन राहिल्या. त्या मात्र औरंगजेब दक्षिणेंत आल्यावर म्हणजे अनुक्रमें जून १७०६, व फेब्रुवारी १७०७ मध्यें कालाधीन झाल्या. मिहिरउन्निसा ईस इ. स. १६८८ मध्यें दक्षिणेंतून परत दिल्लीस पाठविण्यांत आलें होतें. ती परत दक्षिणेंत आपल्या बापाकडे आल्याचा आढळ होत नाहीं; ती दिल्लीस च वारली असावी. याप्रमाणें औरंगजेबाच्या मुलींचे मृत्यूची हकीकत आहे. त्याचे पांच मुलींपैकीं एक हि दक्षिणेंत गुदरल्याचा दाखला मिळत नाहीं. अशा स्थितींत, औरंगजेबाच्या कन्येची तुरबत बेगमपूर येथें आहे, व त्यामुळें त्या गांवास बेगमपूर असें नांव पडलें, असें विधान चटकन् करितां येत नाहीं. यास भक्कम पुरावा च पाहिजे. दुसरें, बेगमपूर अशा नांवांचीं कित्येक खेडीं आहेत, हें वेगळें च.

पां. न. पटवर्धन

---

१ घुसृणेश्वराचें देवालय आणि शिवालय तीर्थ हीं ह्या लेखकानें सन इ० १८९४ मध्यें पाहिलीं व त्या वेळीं च त्यांवरील नांवें व वर्षें टिपून घेतलीं.

# अकण्णा व मादण्णा यांचे संबंधीं कांहीं नवीन माहिती

कुतुबशाहींत आकण्णा व मादण्णा असे दोन ब्राह्मण मुत्सद्दी होऊन गेले. यांचा अंत औरंगजेबाचे गोवळकोंड्यावरलि स्वारीचे धामधुमींत अत्यंत क्रूर रीतीनें झाला. व्यंकाजीचे कारस्थानापूर्वी या उभयतां बंधूंनी शिवछत्रपतीस मोठी थोरली मेजवानी केली होती, असा आपल्या इकडील बखरींत उल्लेख आहे. हे ब्राह्मण असून मुत्सद्दी होते, एवढा च यांचे संबंधींचा खुलासा सांपडतो. मला यांचे माहितींत किंचित् भर घालावयाची आहे. ती ही कीं—

१ अकण्णा व मादण्णा हे सख्खे बंधु होत.

२ यांचीं मूळ नांवें अकरस भानजी व माधो भानजी अशीं होतीं. भानजी हें अर्थात् यांच्या वाडिलांचें नांव.

३ हे देशस्थ, ऋग्वेदी, शाखा आश्वलायन, गोत्र भारद्वाज, त्रिप्रवर.

४ आडनांव **पिंगळी.**

५ यांचे वंशज वारंगळ नजीक हनमकोंडा येथें व आसपास आपल्या देशमुखी वृत्तीवर उपजीविका करितात.

६ निजामसरकारचे हद्दींत भानजीपेठ म्हणून गांव आहे.

**पां. न. पटवर्धन**

---

# राजे विठ्ठल सुंदर यांची माहिती

राजे विठ्ठल सुंदर यांचें नांव प्रसिद्ध असून, ते राक्षसभुवनचे लढाईंत कामास आले. हे मूळ कोण, कोठील व यांचे वंशज सध्यां कोठें आहेत एवढें च या ठिकाणीं नमूद करून ठेवितों.

विठ्ठल सुंदर हे मूळचे संगमनेरचे राहणार. देशस्थ, यजुर्वेदी ब्राह्मण, आडनांव परशुरामी.

निजामचे राज्यांत राजा गणेश या नांवानें ओळखिली जाणारी एक जागीर आहे. औरंगाबादेकडील पिंपरी वगैरे गांवें या जागिरींत मोडतात. ही च विठ्ठल सुंदर यांची जागीर होय. विठ्ठल सुंदरांचे वंशज हैदराबादेंत शालीबंडास राहतात. विद्यमान पुरुष अज्ञान असून, जागीर व मिळकत कोर्ट ऑफ वॉर्डस् कडे आहे.

**पां. न. पटवर्धन**

# अर्नाळा किल्यावरील शिलालेख

ठाणें जिल्ह्यांत आगाशी नजीक अर्नाळा येथें एक जंजिरा आहे. हा मजबूत असून त्यास दोन दरवाजे व दहा बुरुज आहेत. किल्यांत मुख्य तीन देवालयें आहेत. १ शंकराचें, २ देवीचें, व ३ पिराचें. पिराचे देवालयाचें शिल्प हिंदुपद्धतीचें आहे. किल्याचे बाहेर एक भवानीचें देवालय आहे. वेतरणा समुद्रास मिळते त्या ठिकाणीं संगमावर च हा किल्ला उभारलेला आहे. शक १६५९त सदरहू किल्ला श्रीमंत बाजीराव पेशव्यांनीं शंकराजी केशव फडके–हसबनीस यांजकरवीं बांधविला. किल्याचें शिल्पकाम करणारा कोणी तुळाजीसुत बाजी हा होता. त्याची समाधी हल्लींचे अर्नाळा गांवांत आहे. किल्याचे मुख्य दरवाजावर खालील लेख दगडावर कोरून बसविलेला आहे. लेख बाळबोधींत असून लेखाच्या सहा ओळी आहेत. सभोंवार महिरप कोरलेली आहे. लेख खालील प्रमाणें:—

१ बाजिराव अमात्य मुख्य सुमति आज्ञापि
२ ले शंकरा : पाश्चात्यांस वधूनि सिंधुउदरि बांधा त्वरे
३ जांजिरा : अर्नाळा जळदुर्ग चिंतुनि मनि बाजि तुळाजिसुता
४ शिल्पज्ञें दृढ शौर्य जाणुनि तया दुर्गासि संस्थापिता : १ ॥ अंकबाण
५ रस चंद्र शकातें जेष्ट पिंगळ सीतेंदु दिनाते पंचमी ध्रुवसु पु
६ ष्य हि जेव्हा : येशवंत बुरुजाकृति तेव्हां : २ ॥ १६५९

२ दुरुस्ती नसल्यामुळें किल्ला मोडकळीस आलेला आहे. हल्लीं ज्या गांवास अर्नाळा म्हणण्यांत येतें, तो गांव वस्तुत: नवीन च वसलेला आहे. पूर्वी तेथें किल्याची चौकी होती. किल्यानजीक मच्छीमार कोळ्यांची अद्यापि हि वस्ती आहे.

स. म. दिवेकर
पां. न. पटवर्धन

## एक कोष्टक

५ पांच हात ५ पांच मुठी = १ काठी
२० काठ्या लांब १ काठी रुंद = १ पांड
२० पांड = १ बिघा
६० बिघे = १ पाव
४ पाव = १ चाहूर
१ चाहूर = ६४ कुरगी
८ नवटाक = १ चाहूर

दर कुरगीस ८० भाराच्या पक्क्या शेरानें आठ शेर बीं पेरणीस लागतें. त्यांतील चिप्यास अदिलशाही चिपा म्हणतात.

हें कोष्टक अमखेड, ता. इंडी जि. विजापूर येथील कागदांत सांपडलें. कुरगी नांवाचें व नवटाक किंवा टाक या नांवाचें जमिनीचें माप कागदोपत्रीं आढळतें.

कृ. वि. आचार्य कालगांवकर

## मुक्ताबाईचे दोन अप्रकाशित अभंग

(१)

थै थै म्हणका रे गोपाळा । भेद जाणे तो विरुळा ॥ ध्रु० ॥
आशा मनसा हे गाइ थोरी । इचें दुभतें घरोघरीं ॥
सिद्धा साधकांसी चारी । इनें नाडिलें ब्रह्मचारी ॥ १
गाये चरणावीण धांवे । तीस बहुता जनाची सवे ॥
वाळीसारिखा घेतला जावें । तऱ्हीं त्या रावणासी नव्हतें ठावें ॥ २
गाइनें हाटीलीं इंद्रासी सींगे । त्याचे सर्वांगीं पाडीलीं भगें ॥
आहील्या गौतमें श्रापीली रागें । तरी त्या चंद्रासी कळंक मागे ॥ ३
गाय वोथरली ईश्वरासी । सींगें रोवीलीं दोहीं कुसीं ॥
त्राहे त्राहे रुसीकेसी । कही या गाइवेगळें करीसी ॥ ४
गाये लागली शुकदेवापाठीं । त्यानें फिरोन हाटीली काठी ॥
लपों गेला गिरीकपाटीं । त्यास मोक्ष जाला वैकुंठीं ॥ ५
गाये नामदेवें त्रासीली । हृदवीणें खुटा सोडीली ॥
ज्ञानदेवें भोवडीली । इतुकें देखोनी मुक्ताई हांसीली ॥ ६

(२)

योगिया म्हणवी आणी इंद्रियाचा रंक । तयाचा विवेक जाळीं परता ॥ १ ॥
तपोनिधी आणी इच्छेचा पाईक । तयाचा विवेक जाळीं परता ॥ २ ॥
वेदशास्त्र आणी वितंडवादक । तयाचा विवेक जाळीं परता ॥ ३ ॥
मुक्ताई म्हणे परमार्थ माईक । तयाचा विवेक जाळीं परता ॥ ४ ॥

असे हे दोन अभंग डोमगांव मठांतील बाड अनुक्रमांक १२ यांत आढळले. मला वाटतें ते अप्रकाशित आहेत.

शं. श्री. देव

# शहाजीची स्त्री नरसाबाई

१ पुढील असल दानपत्र शके १६०९ पौष वद्य ३० रविवारचें असून तें सातारकर राजोपाध्यांच्या दप्तरांत मिळालें. या सालीं पौष व॥ ३० रोजीं पडलेल्या अर्धोदय महापर्वकालीं शहाजीची स्त्री नरसाबाई इनें बाळंभट आरवीकर यांस दानपत्रांत दिलेला भाग अग्रहार दिला.

२ दानपत्रांत नरसाबाईचा मुलगा राजे संतोजी याचा उल्लेख आहे. संतोजीचा उल्लेख मराठी बखरींतून आलेला आहे; हा संतोजी कर्नाटकांत होता. तिकडे त्यानें शिवाजी महाराज व राजाराम महाराज यांच्या कारकीर्दींत पराक्रम गाजविला होता. त्याच्या आईचें म्ह० शहाजीच्या तिसऱ्या स्त्रीचें नांव आज तागायत अज्ञात होतें. या दानपत्रावरून नरसाबाई हें या स्त्रीचें नांव होतें असें नवीन च कळतें.

३ नरसाबाई हीं नांवावरून कर्नाटकांतील होय हें उघड होतें. डफ व इतर बखरकार यांचे लिहिण्याप्रमाणें ही शहाजीची रखेली होती कां स्त्री होती, याचा मात्र उलगडा होत नाहीं.

४ नरसांबपूर हें नांव नरसाबाईवरून पडलें ही विशेष गोष्ट दानपत्रांत नमूद केलेली आहे.

श्रीमंगलमूर्ती मोडी – असल

॥ ॐ

स्वस्ति श्री शाळीवाहन शकाब्दां शके
१६०९ प्रभवनाम संवछर पुस्य बहु
ल आमावास्या भानवासरे श्रीम-
तु रामेश्वरभट याचे पुत्र प्र-
भाकरभट याचे पौत्र बाळं-
भट सूत्र आशलायेन गोत्र शा-
कल्ये सो॥ अरवीकर उपनाम
उपाधे यांसी-माहाराज-राज-
श्री शहाजी राजे भोसले यांची
स्त्री राजश्री संतोजी राजियां-
ची माता राजश्री नरसाबाई
लिहून दिधले दानपत्र ऐसे

जे पुस्य बहुल अमावास्यां
भानवासरे अर्धोदय माहा पर्व-
काली श्रीपरमेश्वर प्रीतीर्थ
नरसांबापुर अग्रार केले ग्राम नर-
संबापुर पूर्वनाम तोरपाडी
तायेनूरचे पूर्वभागी मांबटचे दक्षण
भागी पुदपटचे उतरभागी इ'
कोणामचे पछमभागी देश ना
तायेनूर पा बेंटवाल प्रांत त्रिणाम-
ल या गांवी क्षेत्रे केली २३ तेवीस
त्यामधे तुम्हास येक क्षेत्र येणे प्र-
माणे संख्या करून सहिरण्योद-
क धारादत दानपूर्वक येक क्षेत्र
दिधले असे नजी पुजी व तोप व झाड
झाडोरा व सुवर्ण अदाये व धान्य अदाये
निधि निक्षेप जल तरु पाशाण अक्षणी
आगामी सिधी साध्य अस्टभोग तेज
स्नाम या सकळ समुदाये सहित क्षेत्र दधिले
असे तरी पुत्र पौत्र पारंपर्य आचंद्रार्क
सर्वमान्य फल भोगवटा घेऊन सुखी
असिले पाहिजे

(शिक्का) **पां. म. पटवर्धन**

---

*दानपालनयोर्मध्ये दानाद्रेयोमुपालनं । दानात्स्वर्गमवाप्नोती पालनादच्युतं पदम् ॥१॥ स्वदत्ता द्विगुणं पुण्यं परदत्तानुपालनं ॥ परदत्तापहारेण स्वदत्त निश्फलं भवेत् ॥ २ ॥ स्वदत्तां परदत्ता वा यो हरेत वसुंधरा । शस्टी वर्ष सहस्त्राणी वाम्रायां जायते क्रीमीः ॥ ३ ॥

---

* हे तीन श्लोक या दानपत्राचे पाठीमागे असून बाळबोधी लिपींत लिहि-लेले आहेत.

# औरंगजेबाच्या मूर्तिभंजकत्वाविषयीं दंतकथा

अलीकडे औरंगजेब मूर्तिभंजक किंवा हिंदूंचा छळ करणारा म्हटलें म्हणजे तें मुसलमान लोकांस अगदीं खपतनासें झालें आहे. त्यांची मनोवृत्ति इतकी नाजूक अलीकडे च कां झाली कोण जाणे ! परंतु आपल्या लोकांमध्यें औरंगाचें मूर्तिभंजकत्व प्रसिद्ध आहे; व त्याविषयीं अनेक दंतकथा आपणामध्यें प्रचलित आहेत. त्यांपैकीं कांहीं येथें नमूद करूं.

१ **श्रीवाराणशी** क्षेत्रीं **श्रीविश्वनाथाचें** देवालय औरंगानें फोडल्याविषयीं इतिहासांतरीं दाखले आहेत. देवाच्या प्रासादाचा विध्वंस करून त्यानें तेथें मशीद बांधिली, ती अद्याप हि शाबूद आहे. मुसलमानांचा स्पर्श टाळण्यास्तव **विश्वेश्वरानें भागीरथी**मध्यें उडी घेतल्याची दंतकथा आपल्या लोकांत प्रसिद्ध आहे. जेथें **विश्वेश्वरानें** उडी घेतली त्या स्थलास **मणिकर्णिका** तीर्थ म्हणतात. **मणिकर्णिका** तीर्थांत बिल्वदळें वाहिलीं असतां बुडतात व तीं जलमग्न होऊन राहिलेल्या विश्वेश्वरास पावतात, अशी भाविक जनांची आपणांमध्यें पूर्ण श्रद्धा आहे. याप्रमाणें **बिंदुमाधवाचा** प्रासाद उद्ध्वस्त करून तेथें हि **औरंगानें** मशीद बांधिली. **बिंदुमाधवा**ची भग्न झालेली मूर्ति काशीस एका सावकाराकडे ठेविली आहे.

२ ही नर्मदेच्या पलीकडील प्रदेशांतली कथा झाली. दक्षिणेमध्यें औरंगजेबास **मलिकंबराचें** 'खडकी' शहर व त्या भोंवतालचा प्रदेश आवडत असे. तो तेथें दक्षिणचा सुभेदार असतां राहूं लागला. **खडकीस** त्यानें '**औरंगाबाद**' असें नांव दिलें. **औरंगाबादे**नजीक 'रोझा' गांव हि त्याच्या आवडीचें ठिकाण होतें. त्या गांवाच्या खालीं च **वेरूळ** आहे. **वेरूळ**च्या डोंगरांत बौद्धांचीं व हिंदूंचीं लेणीं आहेत. त्यांतील मूर्ति प्रचंड पण सुरेख अशा आहेत. परंतु त्या सर्व छिन्नभिन्न केलेल्या आहेत; त्यांमध्यें एक हि सबंध मूर्ति सांपडावयाची नाहीं. हें सर्व कृत्य औरंगजेबाचें च. त्याविषयीं एक दंतकथा अशी आहे कीं:—**वेरूळ**च्या लेण्यांत 'नीळकंठेश्वर' म्हणून जें लेणें आहे त्यांतील नीळकंठेश्वराच्या बाणास स्नान घातलें म्हणजे तो बाण पाहणारास त्यांत पूर्वजन्मीं आपण कोणत्या योनींत होतों तें स्पष्ट दिसत असे ! **औरंग** जेव्हां तें लेणें भंगण्यास गेला तेव्हां लेण्याच्या बचावासाठीं, लोकांनीं अशा प्रकारचा बाण येथें आहे याकारितां हें लेणें आपण फोडूं नये म्हणून त्याची विनवणी केली. त्या विनवणीवरून, मी पूर्व जन्मीं कोण होतों तें पाहूं या, म्हणून त्यानें बाणास स्नान घालविलें व आंत पाहतों तों त्यास कुत्रा दिसला ! कुत्रा जसा आपणांमध्यें तसा मुसलमानांत हि फार अपवित्र मानितात. आपण पूर्वजन्मीं

# जुनीं मराठी गीतें

## गुराख्यांचीं गाणीं

भारत-इतिहास-संशोधक-मंडळानें "**हदगा ऊर्फ भोंडला**", "**धनगरांच्या ओंव्या**" व "स्त्री-गीतें" प्रकाशित करून मराठी भाषेचें सोपपत्तिक अध्ययन करणारांस एक महत्त्वाचें साधन प्राप्त करून दिलें आहे. प्रस्तुत गाण्यांत एक प्रकारचा काव्यरस व तद्भूत गोडी आहे. हीं गाणीं परंपरेनें मुखोमुखीं चालत आलेलीं असतात. गुराख्यांचीं कांहीं गीतें तर मोठी सुरस व कित्येक सर्ग होतील; अशीं दीर्घ असतात. "**हम्मा गीत**" म्हणून गुराख्यांचें गाई, बैल व वासरें यांस अनुलक्षून एक काव्य आहे; तें फार च सुंदर असून, त्याचे कित्येक सर्ग आहेत.

### गीत १ लें

( सांगणारः—ज्ञानू कृष्णा वाणी. )

काळा बैल पागला ॥ पागला ॥ वणव्या डोंगरिं लागला ॥ लागला ॥ चल्ला जाऊ ॥ वन पाऊ ॥ वनांत आगीन जळती ॥ जळती ॥ चल्ला जाऊ ॥ आगीन पाऊ ॥ आगीन पान्यानें ईजती ॥ ईजती ॥ चल्ला जाऊ ॥ पानी पाऊ ॥ पानी पसार मांडीत ॥ मांडीत ॥ चल्ला जाऊ ॥ पसार पाऊ ॥ पसार लांडग फाडीत ॥ फाडीत ॥ चल्ला जाऊ ॥ लांडग पाऊ ॥ लांडग वासर तोडल्याती ॥ तोडल्याती ॥ चल्ला जाऊ ॥ वासर पाऊ ॥ वासर पित्याती गयाला ॥ गयाला ॥ चल्ला जाऊ ॥ गयी पाऊ ॥ गईला धनी पिळीत ॥ पिळीत ॥ चल्ला जाऊ ॥ धनी पाऊ ॥ धनी दुदान दडवीत ॥ दडवीत ॥ चल्ला जाऊ ॥ दुदान पाऊ ॥ दुदान दडवीत कुंबार ॥ कुंबार ॥ चल्ला जाऊ ॥ कुंबार पाऊ ॥ कुंबार चाक दडवीत ॥ दडवीत ॥ चल्ला जाऊ ॥ चाक पाऊ ॥ चाक सुतार तासीत ॥ तासीत ॥ चल्ला जाऊ ॥ सुतार पाऊ॥ सुतार किकर दडवीत ॥ दडवीत ॥ चल्ला जाऊ ॥ किकर पाऊ ॥ किकर ल्व्हार घडवीत ॥ घडवीत ॥ चल्ला जाऊ ॥ ल्व्हार पाऊ ॥ ल्व्हार भाता दडवीत ॥ दडवीत ॥ चल्ला जाऊ ॥ भाता पाऊ ॥ भाता चांभार शीवीत ॥ शीवीत ॥ चल्ला जाऊ॥ चांभार पाऊ ॥ चांभार रापी दडवीत ॥ दडवीत ॥ चल्ला जाऊ ॥ रापी पाऊ ॥ रापी म्वाट शीवीती ॥ शीवीती ॥ चल्ला जाऊ ॥ म्वाट पाऊ ॥ म्वाट पोचली विहिरीला॥ विहिरीला ॥ चल्ला जाऊ ॥ विहीर पाऊ ॥ विहिर भरली पाण्यान ॥ पाण्यान ॥ चल्ला जाऊ ॥ पाणी पाऊ ॥ पाणी चाललय पाटान ॥ ॥पाटान ॥चल्ला जाऊ॥ पाट पाऊ ॥ पाट पोचला बागला ॥ बागला ॥ चल्ला जाऊ ॥ बाग पाऊ ॥ बाग भरली फुलान ॥ फुलान ॥ चल्ला जाऊ ॥ फुलं पाऊ ॥ फुलं गुरव तोडीतो ॥ तोडीतो॥ चल्ला जाऊ॥ गुरव पाऊ ॥ गुरव दुरान शीवीतो ॥ शीवीतो ॥ चल्ला जाऊ ॥ दुरान पाऊ ॥ दुरान गंगेला चडवीतो ॥ चडवीतो ॥

## गीत २ रें

चाड बांदिल काचाच ॥ काचाच ॥ बैल जुपिली तीसाची ॥ तीसाची ॥ आमच्या गांवचा लक्ष्मी पांड्या । लक्ष्मी पांड्या ॥ त्याला झाल्या सोळा खंड्या ॥ सोळा खंड्या॥ सोळा खंड्याच नव मण भूस ॥ नव मण भूस ॥ आटकर पटकर तेल्याला॥ तेल्याला। तेली म्हणतो॥ रचिन घाना॥ पाडिन मेना॥ गुरवाचा॥ गुरवाचा ॥ गुरव म्हणतो ॥ शिविन पत्रावळी ॥ देईन गंगला ॥ गंगला ॥ गंग म्हणती ॥ वडीन तोर ॥ पाडीन मोर ॥ मांगाचा ॥ मांगाचा ॥ मांग म्हणतो ॥ आटिन नाडा ॥ घालिन येडा ॥ नांगराला ॥ नांगराला ॥ नांगुर म्हनतो ॥ चडिन तास ॥ करीन नास ॥ जिम्नीचा ॥ जिम्नीचा ॥ जमिन म्हणती ॥ पिकविन खंड्या ॥ पाडिन लेंड्या ॥ कुणब्याच्या ॥ कुणब्याच्या ॥ कुणबी म्हणतो ॥ देईन चावडी ॥ करीन वावडी ॥ कुरकळण्याची ॥ कुरकळण्याची ॥ कुरकळणी म्हणतो ॥ लिविन चिटी ॥ घालिन भेटी ॥ सरकारला ॥ सरकारला ॥

## गीत ३ रें

'भ्रू' गे मोरी ॥ धार काड पोरी ॥ पोरीची बोट ॥ बाग लोट ॥ हंबू तंबूचा । ड पाला ॥ ड पाला ॥ डवरी गोसावी, र नाला ॥ र नाला ॥ जेटा झाडिल, र गेला ॥ र गेला ॥ ती जट पडली, र लवनी र लवनी ॥ लवनी तवनीचा, र तागू ॥ र तागू ॥ तागू पिल्याची, र जाळी ॥ र जाळी ॥ सीता कोंडली, र माळी ॥ र माळी ॥ माळा मुरडीचा, र काटा ॥ र काटा ॥ गया लागल्या, र वाटा ॥ र वाटा ॥ वाटतिटचा, र वाणी ॥ र वाणी ॥ गय्या परतल्या, र पाणी ॥ र पाणी ॥ पाणथडीचा, र मासा ॥ र मासा ॥ गय्या लागल्या, र देसा ॥ र देसा ॥ र र देसाचा, र याळू ॥ र याळू ॥ नंदी बैल, र खेळू ॥ र खेळू ॥ खेळ खेळ पुतळ्या, र चांद्या ॥ र चांद्या ॥ बैल डिराकला, र पांड्या ॥ र पांड्या ॥ पांड्याच्या गयांत, र अन्ना ॥ र अन्ना ॥ जानी गाई, र सुतळी ॥ र सुतळी ॥ जानी गाईच्या गळ्यांत, र पेंड ॥ र पेंड ॥ आज वर्सीन दह्या दुधाच चार लोंड ॥

## गीत ४ थें

करड्यांत करड काकाकू ॥ काकाकू ॥ असा बैल गुन्नाचा ॥ गुन्नाचा ॥ पाटिव शेंडा फुल्लाचा ॥ फुल्लाचा ॥ फूल गेल देवरशी ॥ देवरशी ॥ मलुबा मलुबा गुड संबाळ ॥ गुड संबाळ ॥ गुड गेला करवंदजाळी ॥ करवंदजाळी ॥ करवंदजाळीला आला राग ॥ आला राग ॥ राग। सरसा मारला ढाण्या वाग ॥

## गीत ५ वें

( सांगणारः—महादू विठोबा थोरात )

आगाड्याच मगाड ॥ गाड्याच रुमण ॥ गाडा गेला येशी ॥ तीन पाया ताशी॥ वाण्याची भांग ॥ चोरटा मांग ॥ उडाली मुंगी ॥ तुडला नाडा ॥ आमच्या ढोरांत, गणेश पाडा ॥ [ अमक्याच्या ] ढोरांत, लांडा रेडा ॥

## गीत ६ वें

( सांगणारः—रंगो गोविंदा लाटणे )

वाकडी तिकडी बाबळ ॥ त्यावर बसला व्हला ॥ व्हला न्हव गुजर ॥ वाळा बैल भुजर ॥ वाळ्या बैलाची येसन ॥ निळ्या घोडीवर बसन ॥ निळ्या घोडीचा सरारा ॥ आमच्या नागोबाला सोन्याचा फरारा ॥

## गीत ७ वें

( सांगणारः—पांडू लखू पाटील )

दुण दुण दिवाळी ॥ गाई म्हशी ओवाळी ॥ गाय म्हशी चौर ॥ बैल न्हवर ॥ न्हवर कुणाच ॥ किस्ण देवाच ॥ किस्ण देवाला बगुन गुन गुन डोळ ॥ अमाला बगून सायाच लोळ ॥ लोळता लोळता गेल टेका ॥ फट गौळीच्या लेका ॥ अंकर करचील ॥ निंकर करचील ॥ रिंगणीच्या झाडा खायन वाकून जाशील ॥ रिंगणीचा मोडला काटा ॥ काटा न्हव कोकळी ॥ जानी गाई पुतळी ॥ इंड भुंड रेशिम गोंड ॥ आज वर्सान दह्या दुधाच लोंड ॥

## गीत ८ वें

सडकावर होत बेल ॥ प्वारं पेल पाणी ॥ पोर पोर हाग्या ॥ सरावण देक्या ॥ काय लेका नांगऱ्या ॥ नांगऱ्याच ढोबळ ॥ काटा निगळ ॥ काटा सर ॥ गोटा भर ॥ गोचीड गोमाशी झड ॥ आमच्या नागोबाला शेर शेर तूप ॥

## गीत ९ वें

आटक मटक बाळू दादाच कलतीन कुटक ॥ बाळू दादान दावल चाक सुगाड ॥ नारू माळ्याच धरल कुवाड ॥ नारू माळ्यान दावल वांग ॥ हावालदाराला जाऊन सांग ॥ हावालदारान दावला दट्या ॥ बाळा गुरव झाला लट्या ॥ बाळा गुरवान दावल दानव ॥ म्हादू न्हाव्यावर आल वनव ॥ म्हादू न्हाव्यान दावला वस्तारा ॥ लिंगू परटाची मान कुसकरा ॥ लिंगू परटान दावली पडी ॥

जाऊन तारा तांबुळणीच्या घरी ।। तारा तांबुळणीन दावली पकाल ।। आंबाऱ्यां मांगाला जाऊन हकाल ।। आंबऱ्या मांगान दावली दोरी ।। नारू माळ्यावर आली फेरी ।। नारू माळ्यान दावला मुळा ।। रावजी बाळ्या झाला खुळा ।। रावजी बाळ्यान दावली लिकनी ।। कृष्णा पलुसकराला हाना फुकनी ।।

## गीत १० वें

( सांगणारः–दादू बाळा भोई )

कानोबा शेट्याला मोडला काटा ।।कानोबा शेट्याला मोडला काटा ।। गया लागल्या वाटा कानोबा ।। गया लागल्या वाटा कानोबा ।। वाटत हुता वाणी कानोबा ।। वाटतहुता वाणी कानोबा गया लागल्या पाणी कानोबा ।। गया लागल्या पाणी कानोबा।। पाण्यांत हुता मगर कानोबा ।। पाण्यांत हुता मगर कानोबा ।। गया लागल्या डोंगर कानोबा ।। गया लागल्या डोंगर कानोबा ।। डोंगरांत हुता येळू कानोबा ।। डोंगरांत हुता येळू कानोबा ।। गया लागल्या खेळू कानोबा ।। गया लागल्या खेळू कानोबा ।। खेळ खुट्याचा पंद्या कानोबा ।। खेळ खुट्याचा पंद्या कानोबा ।। बैल डिराकला नंद्या कानोबा ।। बैल डिराकला नंद्या कानोबा ।। नंद्या बैलाचा निळा खरारा ।। नंद्या बैलाचा निळा खरारा ।। आमच्या नागोबाला सोन्या रुप्याचा फरारा ।।

**शिकंदर लाल आतार**

# अफळापूर ऊर्फ सैदापूर ऊर्फ शिवापूर हा अग्रहार धारण करणाऱ्या कऱ्हाड क्षेत्रांतील ब्राह्मणांची यादी

कऱ्हाड क्षेत्र फार प्राचीन आहे. राजसूय यज्ञाच्या वेळीं पांडवांच्या दक्षिण-दिग्विजयांत कऱ्हाड प्रांताचें नांव आहे. येथील ब्राह्मणांचीं घराणीं हि फार जुनीं आहेत. त्यांस कऱ्हाड प्रांतांत व इतरत्र हि ठिकठिकाणीं इनामें आहेत; त्यामुळें हीं घराणीं कऱ्हाडाशिवाय इतर ठिकाणीं म्हणजे क्षेत्र माहुली, पाल, मसूर, कोल्हापूर वगैरे पुष्कळ ठिकाणीं पसरलीं आहेत

कऱ्हाड क्षेत्र प्रसिद्ध व प्राचीन असल्यामुळें प्राचीन ब्राह्मणांचीं घराणीं येथें असणें जसें संभवनीय आहे तसें च नवीं नवीं ब्राह्मणघराणीं येथें येऊन राहणें हि संभवनीय आहे.

आज आपणापुढें अफळापूर ऊर्फ सैदापूर ऊर्फ शिवापूर नांवाच्या अग्रहाराचें

धारण करणाऱ्या ब्राह्मणांची जी यादी ठेविली आहे, तींत २२८ ब्राह्मणांचीं नांवें आलीं आहेत. ही यादी सुहुर ( सुरू ) सन समान तिसैन अलफ छ २१ माहे मोहरम ह्या दिवशीं लिहिली आहे. इंग्रजी वर्ष इ. स. १६९७ हें येतें. म्हणजे यादी २२० वर्षांची जुनी आहे.

ही यादी अस्सल नसून नक्कल आहे. कारण हिच्यावर शिक्का–शिक्के नाहीत. ह्या च २२८ ब्राह्मणांस राजशक २४ मध्यें रामचंद्र पंडित अमात्य यांणी सनद करून देऊन सैदापूर गांवचें नांव शिवापूर ठेविलें. ह्या गांवाचें नांव पूर्वी अफळापूर होतें, असें राजशक २५ मधील श्री. राजारामछत्रपतींच्या सनदेवरून दिसतें. राजशक २४ ईश्वरनाम संवत्सर श्रावण बहुल अष्टमी म्हणजे गोकुळअष्टमी ह्या दिवशीं रामचंद्र पंडित अमात्य यांणी ब्राह्मणास अग्रहार करून दिला. व त्या च दिवशींची राजाराम छत्रपतींची ही सनद आहे. म्हणजे अमात्यांच्या देणगीस हें छत्रपतींचें दुमालपत्र किंवा संमतिपत्र आहे. अमात्यांची सनद अगर तिची नक्कल मला पहावयास मिळाली नाहीं. तथापि ही सनद सैदापूर येथील प्रतिनिधींच्या अमलांतील दिवाणी कोर्टांत दि. मु. नं. ६१ ( १९१०।१९११ ) ह्यांत साक्षीदार भगवंत बहिरव गिजरे यांनीं त्यांची जबानी गुदरल्यावरून पाहावयास मिळाली. व सदरहू यादीच्या डोक्यावर हि " बरहुकूम सनद राजेश्री रामचंद्र पंडित्य अमात्य " असा शेरा आहे. ह्या यादींत २२८ ब्राह्मणांचीं नांवें व त्यांस मिळणाऱ्या धान्याच्या नेमणुका हि दिल्या आहेत.

जो जो प्रांत शिवाजीराजाच्या हस्तगत झाला तेथील वतनदारांच्या व धर्मादाय देणगीच्या जमिनी सरकारांत अमानत करून त्या जमिनीच्या उत्पन्नाचा सुमार करून वतनदारास नक्त नेमणुका द्याव्या व धर्मादाय जमिनींतील धान्याच्या उत्पन्नाचा कयास करून ब्राह्मण वगैरेस धान्याच्या नेमणुका, ब्राह्मणाची योग्यता पाहून देत जाव्या असा परिपाठ त्यानें सुरू केला होता. ही चाल राजारामाच्या कारकीर्दीच्या अखेरपर्यंत चालू होती असें ह्या यादीवरून दिसतें. राजशक २५ बहुधान्य संवत्सरीं आषाढ शु॥ ८ रोजीं राजाराम छत्रपती यांनीं जी निराळी सनद करून दिली तींत ब्राह्मणांनीं विदित केलेला मजकूर जमेस धरला आहे; तो असाः––"तुह्मी स्वामीसमीप वसंतगडच्या मुकामीं... विदित केले कीं आपण ( आपणा ) ब्राह्मणसमुदायास आदलशाहाचे वेळेस इनामभूमी चालत होती या उपरी महाराज राजश्री कैलासवासी स्वामीस देश अर्जानी जाहला त्याही बरघाट कुली इनामती अमानत केल्या ते समयीं आपली इनामभूमी अमानत करून ब्राह्मण पाहून त्यास धर्मादायाची मोईन करून देऊन पाववीत होते तेणेकरून योगक्षेम चालवून क्षेत्री वास करून राहिलो होतो त्या उपरी आलीकडे देशामधे तांब्राची धामधूम जाहली होती तेणेकरून देश उद्वस केला" वगैरे वगैरे. यावरून शिवाजी राजाची धर्मादायांची व्यवस्था

कशी होती हें कळून येतें. ब्राह्मण पाहून नेमणूक चालू करावयाची म्हणजे त्यांच्या तहाहयात ती चालावयाची. परंतु संभाजीच्या वधानंतर देशांत पुन्हां मोंगलाची ( तांब्राची ) धामधूम झाली व ती हि व्यवस्था नाहींशी झाली. पुन्हां राजारामाच्या कारकीर्दीत स्थीरस्थावर झाल्यावर त्याभोंवतीं हे ब्राह्मण जमले व त्यांनीं हा गांव मिळविला. तथापि ह्या यादीवरून दिसतें कीं, शिवाजीची व्यवस्था कायम च ठेविली होती.

ही यादी अनेक दृष्टींनीं विचारणीय आहे. ह्यापैकीं कांहीं विचारांचें दिग्दर्शन करितों

यादीवरून दिसतें कीं, चांगल्या विद्वान् ब्राह्मणास गांवच्या उत्पन्नापैकीं २ खंडी धान्याची नेमणूक दिली आहे.

एका च घरांत बापलेक किंवा भाऊभाऊ जर चांगले विद्वान् असतील तर त्यास निरनिराळ्या नेमणुका दिल्या आहेत.

सामान्य ब्राह्मणास तीन मणाची नेमणूक दिलेली आहे म्हणजे रोज सुमारें अच्छेर धान्य पडलें.

अशा प्रकारच्या देणगींत तारतम्य नाहीं असें कोण म्हणेल ?

ह्यापुढें राज्याभिषेक शके ३४ ह्या वर्षी शाहूमहाराजांनीं सनद करून दिली. पुढें जमिनी वांटून घेऊन वंशपरंपरेनें धारा घेण्याची वहिवाट पडली. ब्राह्मण पाहून गांवचें उत्पन्न वांटून देण्याची चाल बुडाली.

ह्या यादीचे दोन भाग केले आहेत. एका भागांत स्मार्त ब्राह्मणांची व दुसऱ्यांत वैष्णव ब्राह्मणांचीं नांवें दिलीं आहेत. स्मार्त ब्राह्मणांची संख्या १५८ आहे. त्यांत एका त्रिलोचनगिरी नांवाच्या गोसाव्याची हि गणना केली आहे. वैष्णव ब्राह्मणांची संख्या ७० दिली आहे. ह्यावरून त्या काळीं महाराष्ट्रांतलि क्षेत्रांतून वैष्णव समाज निराळा लेखण्याइतकी त्यांची योग्यता व संख्या होती असें दिसतें. स्मार्त ब्राह्मणांच्या आडनावांची संख्या ३३ आहे व वैष्णव ब्राह्मणांच्या आडनावांची संख्या २१ आहे. तीं आडनांवें येणेंप्रमाणें:--

स्मार्तांचीं आडनांवें-- १ गिजरे, २ वैद ( वैद्य ), ३ खीरसागर ( क्षीरसागर ह्यांजकडे ग्रामोपाध्यायांचा अधिकार आहे ), ४ अरणके ( अराणके ), ५ पटवर्धन, ६ पुराणीक, ७ उवराणे ( उंबराणी ), ८ अयाचित, ९ डोईफोडे, १० पाठक, ११ मोने, १२ बुराडे, १३ अध्यापक, १४ जोसी, १५ धडके, १६ अटकेकर, १७ पळसवडे, १८ मारुलकर, १९ पाउसे ( पावशे ), २० सिराळकर, २१ भिडसगावकर, २२ वळवड ( डे ), २३ ढवळीकर, २४ सागणे, २५ अग्निहोत्री, २६ भिलवडीकर, २७ साळवेकर, २८ पुजारे, २९ जिरे, ३० दुरसे, ३१ गरुड, ३२ पंढरपुरकर, ३३ धोंडी.

वैष्णवांचीं आडनांवें—१ अष्टपुत्रे, २ अवधाने, ३ अयाचित, ४ घळसासे (सी), ५ काळे, ६ कुंभारे, ७ घडाळे, ८ केसादुरी, ९ कर्मीत, १० जांबळे, ११ जगरे, १२ क्षिजर्डे, १३ टोणपे, १४ टोके, १५ निरले (नेरलेकर), १६ मुंज्यामणी, १७ येरी, १८ रोटी, १९ वरखेडी, २० लुटुपुटु, २१ सरडे.

ह्याप्रमाणें २२८ सनद्-वाल्या ब्राह्मणांचीं आडनांवें आहेत. सनद्वाल्यांची नांवनिशी व नेमणुका दिल्यावर महालमजकूर खर्च ४ खंडी धान्य दिलें आहे. त्याबद्दल "बावती सादिलवार खर्च नि।। भट ब्राह्मण गल्ला केली ४" असें लिहून पोटी तपशील दिला आहे. त्यांत "तुकणभट बिन अंतभट विद्वास खंडी १ व येन खर्चाबद्दल खंडी ३" असें लिहिलें आहे. ह्याप्रमाणें विद्वास किंवा विद्वांस हें एक आडनांव आलें आहे.

ऐन खर्च भागून कांहीं शिल्लक राहिल्यास ती सनद्वाल्यांशिवाय, त्यांच्या निसबतीनें एखाद्या विद्वान् ब्राह्मणास देत असत असें दिसतें.

ह्या यादीवरून आपल्या महाराष्ट्र ब्राह्मणांतील भेदोपभेदाबद्दल २२० वर्षांपूर्वीची कांहीं माहिती मिळते कीं काय तें पाहूं:—वर लिहिलेल्या ५५ आडनांवांपैकीं पाठक व डोईफोडे हे दोन वाजसनी शाखेचे यजुर्वेदी ब्राह्मण आहेत व ते स्मार्त आहेत. शंकराचार्यांच्या अद्वैत मताचा आग्रहपूर्वक अभिमान धरणारे जर कोणी महाराष्ट्रांत असतील तर ते हे यजुर्वेदी ब्राह्मण आहेत.

जांबळे आणि सरडे हे सहवासी म्हणजे ज्यांस आपण 'सवाशे' ब्राह्मण म्हणतों त्यांपैकीं आहेत व हे वैष्णव आहेत. सवाशे ब्राह्मण सर्व वैष्णव च आहेत. वैष्णवामध्यें सुमारें ३०० वर्षांपूर्वी राघवेंद्रस्वामींचा म्हणून जो मठ स्थापन झाला त्या मठाचे हे शिष्य आहेत. मठांत सर्व ब्राह्मण त्यांस पंक्तीस घेऊन जेवतात; परंतु मठाबाहेर त्यांच्या पंक्तीस बसत नाहींत. हल्लीं दक्षिण महाराष्ट्र किंवा उत्तर कर्नाटक ह्या प्रांतांत ब्राह्मण लोकांत, सवाशे लोकांच्या पंक्ति-पावनत्वाबद्दल मोठा वाद माजून राहिला आहे. ह्या यादींत दानयोग्य ब्राह्मणांत त्यांची गणना केलेली आहे. कऱ्हाडास त्यांस षट्कर्माधिकारी सर्व ब्राह्मणांबरोबर निमंत्रण असतें, पंक्तिव्यवहार मात्र होत नाहीं. हल्लीं ह्यांच्यासंबंधानें पाहतां राघवेंद्रमठाचे श्रीस्वामी व त्यांचे शिष्य हा पक्ष ह्यांस अनुकूल आहे व उत्तरादिमठाचे श्रीस्वामी व त्यांचें शिष्यमंडळ हा दुसरा पक्ष त्यांस प्रतिकूल आहे. महाराष्ट्रांतील कोणी विद्वान् अशा कामांत पडून योग्य सुधारणा करील काय ? वर दिलेली दोन यजुर्वेदी घराणीं व दोन सहवासी ऊर्फ सवाशांचीं घराणीं खेरीज करून बाकी सर्व घराणीं ऋग्वेदी देशस्थांचीं आहेत. मराठी राज्याच्या काळाच्या पूर्वार्द्धांत सर्व कामांत हे च लोक पुढारी असत व उत्तरार्धांत चित्पावन लोकांच्या चलतीच्या कालांत त्यांच्या खांद्याशीं खांदा लावून काम करणारे हि हे च लोक होते. ह्या यादीवरून दुसरें असें हि दिसून येतें कीं, दक्षिणमहाराष्ट्रांत प्राचीन

काळापासून ऋग्वेदी लोकांचीच वस्ती असावा; यजुर्वेदी लोक महाराष्ट्रांत मागून आलेले असावेत.

ह्या यादींत पटवर्धन म्हणून एक आडनांव आहे. कोकणस्थांपैकीं सर्व विश्रुत असें पटवर्धन सरदारांचें घराणें असल्यामुळें हें घराणें कोकणस्थांचें असावें असें प्रथम वाटतें. परंतु, शोधा अंतीं हे पटवर्धन ऋग्वेदी देशस्थ आहेत असें समजलें. मी कऱ्हाडास तीन वर्षें होतों व ह्या घराण्यापैकीं एक गृहस्थ माझ्या शाळेंत तालीम मास्तर होते–ते अजून हि त्याच जागीं आहेत. मी हि त्यांस कोकणस्थ च समजत असे. परंतु दोन वर्षांपूर्वी कऱ्हाडास सदरहू यादी तेथील ग्रामोपाध्यांकडे मिळाली तेव्हां सहज शोध करीत असतां बोलण्यांत हे पटवर्धन देशस्थ असून काश्यप गोत्री आहेत असें समजलें. ह्यांच्या भाऊबंदांचीं घरें कोल्हापुराकडे व फलटणास आहेत. कोकणस्थ पटवर्धन कौंडण्य गोत्री आहेत. कोकणस्थ व कऱ्हाडे आणि ह्याहून हि अल्पसंख्याक ब्राह्मणांच्या पोटवर्गांतील लोकांचीं आडनांवें जरी ठरीव असल्यासारखीं दिसतात तरी त्यांवरून अमुक व्यक्ति अमुक पोटवर्गांतील आहे असें निश्चयानें सांगणें बरोबर होणार नाहीं. आपल्या महाराष्ट्रांतील जुने इतिहाससंशोधक विद्वद्वर्य डॉक्टर भांडारकर ह्यांच्या दक्षिणेच्या प्राचीन इतिहासाच्या इंग्रजी पुस्तकाचें नारायण विष्णु बापटकृत मराठी भाषांतर वाचीत असतां पृष्ठ २३५ वर दिलेला शोध ह्या यादीवरून डळमळूं पाहतो. सदर पृष्ठांत असें लिहिलें आहे कीं:—"बेळगांव तालुक्यांत सांपडलेले एक ताम्रपट्टावर कोरलेलें दानपत्र आहे. त्यावर शके ११७१ हि मिती आहे. त्यांत मजकूर आहे तो येणेंप्रमाणें–बीच ऊर्फ बीचणण म्हणून जो सिंघणाचा दक्षिणेकडील मुलुखाचा प्रतिनिधि होता त्याचा मल्ल ऊर्फ मल्लिसेट्टी नांवाचा एक वडील भाऊ होता; व तो स्वतः कुहुण्डि प्रांतावरचा अधिकारी होता. तो मल्लिसेट्टि मुद्गुगल ( म्हणजे बहुशः अलीकडील काळचे मुद्गुगल ) येथें राहत असे. त्यानें आपला यजमान कृष्णराजा ह्याची मंजुरी घेऊन बागेवाडी ह्या गांवीं निरनिराळ्या गोत्रांच्या बत्तीस ब्राह्मणांस जमिनी दान दिल्या. ह्या बत्तीस ब्राह्मणांचीं उपनामें सांगितलेलीं आहेत. त्यांत अर्वाचीन कालीन महाराष्ट्रीय ब्राह्मणांच्या उपनामांपैकीं कांहीं आहेत हें पाहून कौतुक वाटतें. उदाहरणार्थ, चित्पावन ब्राह्मणांच्या प्रसिद्ध उपनामांतील पटवर्धन व घैसास हीं आणि देशस्थ ब्राह्मणांच्या उपनामांतील घळिसास, घळिस, व पाठक हीं. ह्या च ११७१ तील ताम्रपटाच्या बाबतींत उहापोह, आपल्या मंडळाच्या शके १८३७ तील तृतीय संमेलनाच्या प्रसंगीं प्रसिद्ध संशोधक रा. रा. चांदोरकर वकीलसाहेब ह्यांनीं "शक ११८१ मधील चालुक्यांचा एक ताम्रपट" ह्या विषयावर निबंध वाचला त्या निबंधांत केला आहे. हे दोन्ही ताम्रपट व ११८२ तील एक ताम्रपट ह्यांतील ब्राह्मणांचीं आडनांवें व गोत्रें ह्यांचा एकत्र विचार त्यांनीं केला आहे. त्यांत पटवर्धन ह्यांचें कौंडिण्य गोत्र दिलेलें नाहीं. पटवर्धन उपनांवाच्या ब्राह्मणांचीं दहा गोत्रें त्यांनीं दिलीं आहेत. व हल्लीं काश्यप, कौंडिण्य व जामदग्नि ह्या तीन गोत्रांचे पटवर्धन आढळतात असें त्यांचें म्हणणें आहे. पैकीं काश्यप गोत्राचे

कऱ्हाडकर देशस्थ पटवर्धन आहेत. रा. चांदोरकर ह्यांचे पटवर्धन कोणत्या पोटभेदां-पैकीं आहेत कोण जाणे !

दक्षिणच्या इतिहासांतील पटवर्धन हें आडनांव देशस्थांत आढळल्यावर घैसास हें आडनांव देशस्थांत आहे काय, ह्याचा शोध केल्यानंतर सातान्यानजीक पाटखळ बोरखळ ह्या गांवचे जोशी कुळकरणी, घैसास उपनांवाचे भारद्वाज गोत्री आहेत, असें आढळलें. कोकणस्थ घैसास हि भारद्वाज गोत्री च आहेत तर मग ताम्रपटांतील घैसास कोण ! देशस्थ कीं कोंकणस्थ, असा संशय उत्पन्न होतो. घैसास ह्याचें दुसरें रूप घळीसास असें राजवाडे म्हणतात. परंतु ह्या यादींत 'घळसासे' दिले आहेत व ते घळसासी ह्या नांवानें कऱ्हाडास प्रसिद्ध असून त्यांचीं घरें हि तेथें वरीं च आहेत; व ते जामदग्नि गोत्री आहेत. तात्पर्य, ११७१ तील ताम्रपटांत आलेले ब्राह्मण पटवर्धन, घळीसास व पाठक हे ह्या कऱ्हाडच्या २२० वर्षांच्या यादींत हि आहेत. ह्या बत्तीस हि ब्राह्मणांचीं उपनामें ताम्रपटांत आहेत म्हणतात; पण तीं मला पहावयास मिळालीं नाहींत. तीं मिळवून त्यांशीं ही यादी ताडून पाहिल्यास ह्या यादींतील आणखी कांहीं आडनांवें हि त्यांत आढळतील. कऱ्हाडक्षेत्रस्थ ब्राह्मण कुळें अनेक राज्यक्रांत्यांतील सुखदुःखें अनुभवून टिकून राहिले आहेत. अशा प्रकारच्या शोधापासून आमचें अविनाशित्व किती टिकावूं आहे व तें कां ह्याचा इतिहास आपणांस कळूं लागेल.

मला असें वाटूं लागलें आहे कीं, शोधांतीं कोंकणस्थ, कऱ्हाडे यांतील आडनांवें देशस्थांत बहुतेक सांपडतील. देशस्थ हे फार प्राचीन वतनदार लोक असल्यामुळें देशमुख, देशपांडे, कुळकर्णी, पाटील, जोशी, सबनीस, दिवाण वगैरे अनेक प्रकारचीं हुद्यांचीं नांवें च आडनांवें म्हणून आपल्यापुढें जोडतात. आपलीं खरीं आडनांवें लावीत नाहींत. त्यांचा शोध झाला तर कोंकणांतील सर्व ब्राह्मणसमाज देशावरून कोंकणांत जाऊन वसाहती करून राहिले व कांहीं कारणांनीं निराळे समाज पोटसमाज बनले असें ठरेल. व ऐतिहासिक शोधांचें पर्यवसान—आम्ही सर्व एकच वृक्षाच्या शाखा कसे आहों हें—आपणांस कळून येईल.

आतां, मुख्य अग्रहार जो सैदापूर गांव त्याविषयीं दोन शब्द लिहून आटपतें घेतों. हा गांव कऱ्हाड क्षेत्राच्या उत्तरेस कृष्णा नदीच्या कांठीं आहे. कृष्णा व कोयना ह्या नद्यांच्या संगमावरील नाव उतरून पलीकडे गेलें कीं हा गांव लागतो. गांवांत पावकेश्वराचें मोठें देऊळ आहे. व ह्या यादींत लिहिलेलीं सर्व देवस्थानें तेथें आहेत. तेथें परशुरामाची आई जी रेणुकादेवी तिचें देऊळ आहे व नदीच्या पलीकडे खोडशी गांवाजवळ जमदग्नीचें देऊळ आहे. अशी आख्यायिका आहे कीं, जमदग्न आपल्या पत्नीसह कऱ्हाड क्षेत्राचें माहात्म्य वाराणसीतुल्य करण्यासाठीं आले. ते नदीपलीकडे पोंचले व रेणुकादेवी अस्पर्शा झाल्यामुळें पलीकडे राहिली, ह्याबद्दल कऱ्हाडास एक म्हण आहे " कऱ्हाड होणार होतें काशी, पण रेणुका झाली विटाळशी".

हा गांव श्री. पंतप्रतिनिधींच्या जहागिरींत मोडतो. त्यामुळें तो प्रतिनिधींनीं च ब्राह्मणांस दिला असावा असें पाहणारांस वाटतें. हल्लींचें कन्हाड क्षेत्र प्रतिनिधींनीं पुन्हां वसविलें असून, ह्या क्षेत्रावर त्यांची पूर्ण कृपा आहे. व हें च त्यांच्या जहागिरीचें मुख्य ठिकाण होतें.

~~~~~~~~

( पहिला बंद गहाळ झाला आहे व दुसऱ्या बंदाचा वरील
भाग डाव्या उजव्या बाजूस थोडथोडा फाटला
आहे बाकी सर्व शाबूद आहे. )

| ( फाटका भाग ) | केले ·।२५ बाकी करार बिघे ०५ | की सालसात चावर ·॥५ ( फाटले ) बाकी करार के (फाटले) ले बिघे ०५ |
|---|---|---|

माहार जमीन
·।२० पैकीं सा-
लसात केले बि-
घे ( फाटले ) बाकी
करार केले ०५
बरहुकूम सनद राजेश्री रामचंद्र
पंडित अमात्य

येकूण जमीन चावर २।१५ वजा केले बाकी
जमीन चावर १६॥१५ येकूण गला कैली द-
सेरी सोळूले खंडी
१६१॥१।

ता॥

| अवल जमीन चावर १४॥ दर चावरे रमारमी गहू कै- ली खंडी १० येकूण गला कैली दी॥ खंडी १४७॥· | दुम जमीन चावर १॥१५ दर चावरे रमारमी गहू कैली खंडी ७॥ येकूण गला कैली दी॥ खंडी १४०१। |
|---|---|
~~~~~~~~

यासी नावनिसी

देवस्थानें बेरीज

| गला कैली खंडी | तेल वजन |
|---|---|
| १।२ | ।२॥।५ |

| | गला | तेल वजन |
|---|---|---|
| श्री रेणुका देवी | ।२ | ०२। |
| श्री हणमंत | ०३॥। | ०१०५ |
| श्री पावकेस्वर | ०३॥। | ०१०५ |
| श्री नरसिंह जलदेवता | ०३॥। | ०१०५ |
| श्री येकवीरा | ०३॥। | ०१०५ |
| मसीद | ।० | ०१०५ |
| | १।२ | ।२॥।५ |

ब्राह्मण असामी २२८ येकूण गला

कैली खंडी

१५१॥२।०

स्मार्थ असामी १५८ येकूण गला

खंडी

१०९॥१

| कीता येक १ | असामी | गला | कीता येक २ | असामी | गला |
|---|---|---|---|---|---|
| मोरेस्वर भट बिन विस्वनाथभट गिजरे | १ | २ | नारायण भट बिन पोस भट ढवळीकर | १ | २ |

| | असामी | गला | | असामी | गला |
|---|---|---|---|---|---|
| बाळंभट बिन रामभट गिजरे | १ | १ | चंद्रभट बिन संभभट ढवळीकर | १ | १० |
| नीळकंठभट बिन हरभट गिजरे | १ | १० | रामभट बिन चंद्रभट ढवळीकर | १ | ।॥। |
| विस्वनाथभट बिन बाळंभट गिजरे | १ | १० | लक्ष्मणभट बिन माहादेवभट ढवळीकर | १ | १० |
| बापदेभट बिन | | | गोविंदभट बिन | १ | १० |

| असामी | | गला |
|---|---|---|
| निळंभट गिजरे | १ | १ऽ |
| नरसीहभट बिन | | |
| अपदेभट गिजरे | १ | १ऽ |
| माहदेभट बिन | | |
| अपदेभट गिजरे | १ | ॥। |
| केशवभट बिन | | |
| पंडरीभट गिजरे | १ | १० |
| माहदेभट बिन | | |
| पंडरीभट गिजरे | १ | ॥ |
| अंतभट बिन | | |
| रुस्णभट गिजरे | १ | १० |
| कासीभट बिन | | |
| नामराजभट गिजरे | १ | ॥ |
| हरभट बिन | | |
| सामराजभट गिजरे | १ | । |
| सिवरामभट बिन | | |
| नरसीभट गिजरे | १ | ॥। |
| भद्रभट बिन | | |
| हरभट गिजरे | १ | १० |
| लक्ष्मणभट बिन | २ | १ऽ |
| रुद्रभट व कासीभट बिन रुद्रभट गिजरे | | |
| गदाधरभट बिन | | |
| रुद्रभट गिजरे | १ | ॥ |
| वीरेस्वरभट बिन | | |
| विस्वनाथभट गिजरे | १ | १ |
| हरीभट बिन | | |
| मानभट वैद | १ | १० |
| लक्ष्मणभट बिन | | |
| हरभट वैद | १ | १० |

| असामी | | गला |
|---|---|---|
| पोसभट ठकळीकर | | |
| माहादे(व?)भट बिन | | |
| चंद्रभट ठकळीकर | १ | ॥। |
| बाळंभट बिन | | |
| हरभट पुराणीक | १ | १॥ |
| विठलभट बिन | | |
| लिंगणभट अग्नि-होत्री भिलवडीकर | १ | १ऽ |
| गोविंदजोसी बिन | | |
| हरजोसी | १ | १० |
| लक्ष्मण जोसी बिन | | |
| गोविंद जोसी | १ | ॥। |
| अंतभट बिन | | |
| रुद्रभट धडके | १ | १० |
| अपजोसी बिन | | |
| अंतजोसी | १ | ॥। |
| नरसीभट बिन | | |
| तुफणभट धोडी | १ | ॥। |
| अपदेभट बिन | | |
| रघुनाथभट दरसे | १ | ॥ |
| विठलभट बिन | | |
| नारायेणभट दरसे | १ | ॥। |
| अंतभट वैद बिन | | |
| लक्ष्मणभट अध्यापक पंढरपूरकर | १ | ॥। |
| विनायकभट बिन | | |
| सागरभट गरुड | १ | ॥ |
| आपदेभट बिन | | |
| सागरभट गरुड | १ | ॥ |
| रघुनाथभट बिन | | |
| नारायेणभट दरसे | १ | ॥ |
| रामभट बिन | | |
| | १ | १० |

| | असामी | गला |
|---|---|---|
| बाळंभट बिन | १ | ·।।।· |
| हरीभट वैद्य | | |
| नरहरीभट बिन | १ | १० |
| भानभट वैद्य | | |
| धोंडभट बिन | १ | ·।।।· |
| नरहरीभट वैद्य | | |
| जिऊभट बिन | १ | १ |
| भानभट वैद्य | | |
| चिंतामणभट बिन | १ | ·।।· |
| जिऊभट वैद्य | | |
| अपदेभट बिन | १ | १० |
| तिमणभट खीरसागर | | |
| गणेशभट बिन | १ | ·।।।· |
| आपदेभट खीरसागर | | |
| सिवरामभट बिन | १ | ·।।।· |
| बाळंभट खीरसागर | | |
| अनंतभट बिन | १ | १० |
| विनायेकभट अरणके | | |
| बहिरवभट | १ | १० |
| सिवरामभट बिन | | |
| विनायकभट अरणके | १ | ·।।· |
| लक्षमणभट बिल | १ | ·।· |
| अंतभट अरणके | | |
| त्रिबकभट बिन | १ | ·।।· |
| आमणभट खीरसागर | | |
| रघुनाथभट बिन | १ | १० |
| नरहरीभट पटवर्धन | | |
| माहादेवभट बिन | १ | १० |
| कृस्णभट पटवर्धन | | |
| हरभट बिन | १ | १० |

| | असामी | गला |
|---|---|---|
| त्रिंबक भट जिरे | | |
| मिरजकर | | |
| बाळंभट बिन | १ | ·।।· |
| नागदेभट वळवडे | | |
| नरसीभट बिन | १ | ·।।।· |
| नागदेभट वळवडे | | |
| सदासिवभट बिन | १ | ·।।।· |
| वैजभट सिराळेकर | | |
| अनभट बिन | १ | ·।।।· |
| माहदेभट अटकेकर | | |
| गिरीभट बिन | १ | ·।।· |
| लक्षमणभट पुजारे | | |
| गोवींद पाठक बिन | १ | ·।।।· |
| कृस्ण पाठक | | |
| रामभट बिन | १ | १० |
| कासीभट | | |
| सदासिवभट बिन | १ | १० |
| नारायेणभट अयाचित | | |
| रघुनाथभट बिन | १ | १० |
| माहादेभट अयाचित | | |
| गदाधरभट बिन- | १ | ·।= |
| नरसीभट साळवेकर | | |
| संकरभट बिन | १ | ·।· |
| तिमणभट मारुलकर | | |
| गणेश पाठक बिन | १ | १० |
| नरसिह पाठक | | |
| | ३२ | २६।२ |

किता ४

| | असामी | गला |
|---|---|---|
| सिवरामभट बिन नीलकंठभट आमहोत्री भि· लवळीकर | १ | १० |

| असामी | | गला |
|---|---|---|
| गोविंदभट पुराणीक | | |
| सिवरामभट बिन | १ | ·।।। · |
| हरभट पुराणीक | | |
| नागदेवभट बिन | १ | १८ |
| संभभट उंबराणे | | |
| रघुनाथभट बिन | १ | ·।।। · |
| विस्वनाथभट अयाचित | | |
| | ३९ | ३२।। |

किता ३

| असामी | | गला |
|---|---|---|
| रुस्णभट बिन | १ | १८ |
| नारायेणभट गिजरे | | |
| भानभट बिन रुस्ण-भट गिजरे | १ | १८ |
| निमणभट बिन | | |
| हरभट गिजरे | १ | १८ |
| गणेशभट बिन | | |
| रुस्णभट गिजरे | १ | ·।।८ |
| विस्वंभरभट बिन | | |
| भानभट गिजरे | १ | ·। · |
| दुतभट बिन | | |
| वहिरंभ-भट गिजरे | १ | १८ |
| गोपाळभट बिन | | |
| दुतभट गिजरे | १ | ·।। · |
| प्रल्हादभट बिन | | |
| नरहरभट पटवर्धण | १ | १८ |
| रुस्णभट बिन | | |
| नरहरभट पटवर्धन | १ | १८ |

| असामी | | गला |
|---|---|---|
| आपदेभट बिन | | |
| नीलकंठभट आग्नहोत्री भि-लवडीकर | १ | १८ |
| रुद्रभट बिन | | |
| नीलकंठभट आग्नहोत्री | १ | ·।। · |
| सर्वोत्तमभट बिन | | |
| सिवभट आग्नहोत्री | १ | ·।।। · |
| तोरंभट बिन | | |
| बावदेभट वळवड | १ | १८ |
| गंगाधरभट बिन | | |
| रघुनाथभट वळवड | १ | १८ |
| हरभट बिन तोरंभट वळवड | १ | ·।। · |
| रामभट बिन | | |
| विस्वनाथभट वळवड | १ | १८ |
| माहादेभट बिन | | |
| विस्वनाथभट ढवळीकर | १ | १८ |
| अंतो जोसी बिन | | |
| येळ जोसी | १ | ·।। · |
| रांमजोसी बिन | | |
| चिंतामण जोसी | १ | ·।। · |
| रुस्णभट बिन | | |
| नरसिंहभट सागने | १ | ·।। |
| माहदेभट बिन | | |
| रुस्णभट सागणे | १ | ·।। · |
| आंतभट बिन | | |
| सभुभट सागणे | १ | ·।। · |
| लक्षमणभट बिन | | |
| सभभट सागणे | १ | ·।। · |

| | असामी | गला |
|---|---|---|
| बहिरमभट बिन दंतभट गिजरे | १ | ·॥· |
| माहदेभट बिन सिवभट वैद | १ | १८ |
| रामभट बिन सिवभट वैद | १ | १८ |
| हरभट बिन तिमणभट गिजरे | १ | ·॥· |
| गदाधरभट बिन नारायणभट खीरसागर | १ | १८ |
| मनोहरभट बिन विनायकभट खीरसागर | १ | १८ |
| | १ | ·।· |
| गदाधरभट खीरसागर | | |
| हरीभट बिन विनायकभट खीरसागर | १ | ·॥· |
| कासीपाठक बिन आंतपाठक डोईफोडे | १ | ·॥· |
| कृस्णपाठक बिन आंतपठक डोईफोडे | १ | ·॥· |
| वासपाठक बिन आंतपाठक डोईफोडे | १ | ·॥· |
| अंतपाठक बिन विस्वनाथपाठक | १ | १८ |
| त्रिंबकभट बिन गोविंदभट पुराणिक | १ | ·॥· |
| चिलंभट बिन नीलकंठभट खीरसागर | १ | ·॥· |
| भगवतभट बिन | १ | ·॥· |

| | आसामी | गला |
|---|---|---|
| भटंभट बिन विस्वनाथ वळवड | १ | ·॥· |
| मानभट बिन विस्वनाथ वळवड | १ | ·॥· |
| सिवरामभट बिन आपदेभट वळवड | १ | ·॥· |
| नरसींहभट व आनभट व चवडभट ढवळीकर | ३ | १॥· |
| सिवरामभट बिन बाळंभट ढवळीकर | १ | १८ |
| कृस्णभट बिन नरसीभट वळवड | १ | ·॥· |
| नारायणभट बिन नरसीभट वळवड | १ | ·॥· |
| रेमणभट बिन हरभट वळवड | १ | ·॥· |
| माहाद जोशी बिन हिरजोसी | १ | १८ |
| मोरं जोसी बिन माहद जोशी | १ | ·॥· |
| मुकुंद जोशी बिन नारायेण जोसी | १ | ·॥· |
| | २८ | १८॥ |

किता ५

| | असामी | गला |
|---|---|---|
| कृस्णजोसी बिन येळ जोसी | १ | ·।।।· |
| माहदेव भट बिन खळभट भीडसगावकर | १ | १८ |
| धोंडभट बिन गोपाळभट सिराळेकर | १ | १८ |

| | असामी | गला |
|---|---|---|
| नरसीभट खीरसागर | | |
| नरसीभट बिन | १ | १८ |
| विस्वनाथभट खीरसागर | | |
| वासदेवभट बिन | १ | ·।।।· |
| नरसीहभट खीरसागर | | |
| विस्वनाथभट बिन | १ | ·।।· |
| त्रिंबकभट गिजरे | | |
| गोपाळभट बिन | १ | ·।।· |
| गोविंद्भट मोने | | |
| मेरूभट बिन | १ | ·।।· |
| हरभट मोने | | |
| मुकुंद्भट बिन | १ | ·।।।· |
| रामक्रुष्णभट खीरसागर | | |
| | ३० | २१ |

किता ६

| | आ | गळा |
|---|---|---|
| रामभट बिन | १ | ·।।· |
| नारायेणभट हऊराडे | | |
| त्रिविक्रमभट बिन | १ | ·।=।। |
| वामनभट अयाचित | | |
| दामोधरभट बिन | १ | ·।=।। |
| श्रीधरभट अध्यापक | | |
| गण जोसी बिन | १ | ·।· |
| गोविंद जोशी | | |
| माहदेवभट बिन | १ | σ३ |
| रामभट अरणके | | |
| नारायणभट बिन | १ | σ३ |
| रामभट वैद् | | |
| श्रीधरभट बिन | १ | σ३ |
| माहादेभट वैद् | | |
| क्रुस्णभट बिन | १ | ·।।· |
| केशवभट धडके | | |

| | असामी | गलें |
|---|---|---|
| बाळ जोसी बिन येळ जोसी | १ | ·।· |
| त्रिंबकभट बिन | १ | ·।· |
| सभुभट पाउसे | | |
| हरभट बिन | १ | ·।· |
| सोनभट पाउसे | | |
| मल्हारभट बिन | १ | ·।· |
| नागदेभट उबराने | | |
| त्रिंबकभट बिन | १ | ·।· |
| नागदेभट उबराने | | |
| दिनकरभट बिन | १ | σ४ |
| विठलभट खीरसागर | | |
| अंतभट बिन | १ | σ४ |
| नरसीहभट मारुलकर | | |
| रघुनाथभट बिन | १ | ·।।· |
| खंडभट अयाचीत | | |
| गणेशभट बिन | १ | σ३ |
| नीलकंठभट पळसवड | | |
| गोविंद्भ(ट) बिन | १ | σ४ |
| विठलभट पळसवड | | |
| हरभट बिन | १ | ·।।· |
| क्रुस्णभट अरणके | | |
| नारायणभट बिन | १ | ·।· |
| कासीभट अटकेकर | | |
| माहदेवभट बिन | १ | ·।· |
| नरसीहभट जिरे | | |

| | असामी | गला |
|---|---|---|
| चितामणभट बिन | १ | ·।· |
| तिमणभट गिजरे | | |
| गोविंद्भट बिन | १ | ·।· |
| विठलभट अयाचीत | | |
| | १८ | ६।।।· |

| असामी | गला |
|---|---|
| | १८ |
| त्रिलोचनगिरी १ | ·॥· |
| गोविंदगोसावी हरदास १ | १८ |
| वाळपाठक विन १ | |
| वहिर-पाठक | |
| ११ | ४॥४ |

तेरीज

| आ | | गला |
|---|---|---|
| | | ३२॥ |
| | ३६ | २६|२ |
| पत्रक १ | ३२ | २१ |
| पत्रक २ | ३० | १८। |
| पत्रक ३ | २८ | ६॥ |
| पत्रक ४ | १८ | ४॥४ |
| पत्रक ५ | ११ | |
| पत्रक ६ | | |
| | १५८ | १०६॥१ |

वैस्णव आसामी ७० यो गलां केली

खर्डी

४२८११०

किता १

| आ | | गलां |
|---|---|---|
| कृस्णभट विन | | १८ |
| गोविदभट टोनपे | १ | |
| वेकटभट विन | | ·॥· |
| तिमणभट टोनपे | १ | |
| श्रीनिवासभट विन | | ·॥· |
| आनंदभट टोनपे | १ | |
| माहादभट विन | | १८ |
| हरभट टोनपे | १ | |
| नारायेणभट विन | | १८ |
| भट्टभट जावळे | १ | |
| वाळंभट विन | | ·॥· |
| नारायणभट जावळे | १ | ·॥· |
| रामभट विन | १ | |
| तिमणभट टोनपे | | ·॥· |
| यादवभट विन | १ | |
| तिमणभट अयाचित | | १८ |
| नरसीहभट विन | १ | |
| कोनरभट जावळे | | |

किता २

| आ | | गलां |
|---|---|---|
| | १ | १८ |
| अस्वथाच्यार्य | | |
| विन माधवाच्यार्य | १ | १८ |
| केशवाच्यार्य विन | | |
| माधवाच्यार्य | १ | १८ |
| भिमाच्यार्य विन | | |
| कृस्णाच्यार्य | १ | ·॥· |
| कोनेरभट विन | | |
| कृस्णाच्यार्य | ० | |
| नारायेण | १ | ·॥· |
| नरहरीभट विन | | |
| कृष्णाच्यार्य | १ | ·॥· |
| नारायेणभट विन | | |
| कृस्णाच्यार्य | | |
| रगाच्यार्य विन | | |
| नारायणाच्यार्य अवधाने | १ | २ |
| शेशभट विन | | ·॥· |
| कृस्णभट अस्टपुत्रे | १ | १८ |
| नरसीहभट विन | १ | |
| शेशभट मुंज्यामणी | | |

| | असामी | गला |
|---|---|---|
| कृष्णभट बिन | १ | १० |
| नरसीभट चेरी | | |
| नारायेणभट बिन | १ | ॥ |
| माधवभट जगरे | | |
| बडभट बिन | १ | ॥ |
| श्री वेंक· | | |
| टेश-पुजारे | | |
| नारायेणभट बिन | १ | १० |
| कोनेरभट जिरले | | |
| | १३ | ११ |

किता ३

| ——आ | | गळा |
|---|---|---|
| रामभट बिन | १ | ॥ |
| माधवाच्यार्ये घळसासे | | |
| दासाच्यार्ये बिन | १ | ॥ |
| आस्वथाच्यार्ये | | |
| वेंकटभट बिन | १ | १० |
| नारायेणभट रोटी | | |
| गिरभट बिन | १ | १० |
| सिधभट काळे | | |
| शेशभट बिन | १ | ॥ |
| तिमणभट रोटी | | |
| तिमणाच्यार्ये | १ | १० |
| वरखेडी | | |
| नरसीवाच्यार्ये बिन | १ | १० |
| तिमणाच्यार्ये वरखेडी | | |
| रघुनाथाच्यार्ये बिन | १ | १ |
| तिमणाच्यार्ये वरखेडी | | |
| कोनेरभट बिन | १ | १ |
| त्रिंबकभट खीरडे | | |
| कृष्णभट बिन | १ | ॥ |

| | असामी | गळा |
|---|---|---|
| वेंकणभट बिन | १ | १० |
| शेशभट मुज्यामणी | | |
| हरभट बिन | १ | १० |
| शेशभट मुज्यामणी | | |
| तिमणभट बिन | १ | ॥ |
| मुद्गलभट चेरी | | |
| नरसीभट बिन | १ | १० |
| बाळंभट लटुपटु | | |
| नारायेणभट बिन | १ | ॥ |
| नरसीभट लटुपटु | | |
| तिमणभट बिन | १ | १० |
| वेंकनभट सरडे | | |
| अनंतभट बिन | १ | ४सा |
| भिमाच्यार्ये घळसासे | | |
| | १६ | १४०२ |

किता ४

| ——आ | | गळा |
|---|---|---|
| रामाच्यार्ये बिन | १ | ०४ |
| कृष्णाच्यार्ये | | |
| बाळंभट बिन | १ | ०४ |
| केशाच्यार्ये | | |
| माह्देभट बिन | १ | ०४ |
| नारायेणाच्यार्ये | | |
| नरसीभट बिन | १ | ०४ |
| कोनेराच्यार्ये | | |
| विठलभट बिन | १ | ०४ |
| कृष्णाच्यार्ये | | |
| श्रीनिवासभट | १ | ०४ |
| कर्मित | | |
| नारायेणभट बिन | १ | ०४ |
| दादंभट चेरी | | |
| केनेरभट घळसासी | १ | ०४ |

| | आ | गला |
|---|---|---|
| नरसीभट मुज्यामणी | | |
| माहदेभट बिन | १ | ०॥० |
| येकणभट मुज्यामणी | | |
| अणभट बिन | १ | ०॥० |
| बाजराजभट कुंभारे | | |
| शेशभट बिन | १ | ०॥० |
| बाजराजभट कुभारे | | |
| शेशभट बिन | १ | ०॥० |
| नारायेणभट येरी | | |
| अणभट बिन | १ | ०॥० |
| नरसीभट लुटपटु | | |
| रामभट बिन नारायणभट व अनतभट बिन विठलभट जावळे | २ | १ |
| | १७ | १२।० |

तेरीज

| | आ | गला |
|---|---|---|
| पत्रक १ | १३ | ११ |
| पत्रक २ | १६ | १४०२ |
| पत्रक ३ | १७ | १२\ |
| पत्रक ४ | २४ | ४॥४। |
| | ७० | ४२०१। |

| | आ | गला |
|---|---|---|
| केशवभट बिन | १ | ०४ |
| ......... आठु- पुत्रे | | |
| नारायणभट बिन | १ | ०४ |
| तिमणभट टोनपे | | |
| येकणभट बिन | १ | ०४ |
| ......... टोनपे | | |
| नारायेणभट बिन | १ | ०४ |
| बाबदेभट टोनपे | | |
| नारायणभट बिन | १ | ०४ |
| गिरीभट येरी | | |
| माधोभट बिन | १ | ०४ |
| नाराग्रणाच्यार्ये केसादुरी | | |
| अंतभट बिन | १ | ०४ |
| तिमणभट केसादुरी | | |
| अंतभट बिन | १ | ०॥० |
| नागदेभट टोके | | |
| नारायेणभट बिन | १ | ०३ |
| कृस्णाच्यार्ये घडाले | | |
| विठलभट बिन | १ | ०३ |
| रघुनाथाच्यार्ये वरखेडी | | |
| नरसीहभट बिन | १ | ०३ |
| तिमणभट मुज्यामणी | | |
| कृस्णभट बिन | १ | ०३ |
| गोविंदभट मुज्यामणी | | |
| तिमणभट बिन | १ | ०३ |
| गोविंदाच्यार्ये मुज्यामणी | | |
| रंगभट बिन | १ | ०३ |
| वेंकटभट वरखेडी | | |
| शेशभट बिन | १ | ०३ |
| गोविंदाच्यार्ये टोनपे | | |

| | | |
|---|---|---|
| रामभट बिन | १ | ८३ |
| वेंकणभट रोटी | | |
| | २४ | ४॥४। |

तेरीज ब्राह्मण

| | आसामी | गलां केली |
|---|---|---|
| स्मार्थ | १५८ | १०९॥१ |
| वैस्णव | ७० | ४२८१। |
| | २२८ | १५१॥२। |

| | |
|---|---|
| बाबती सादिलवार खर्च | तेलखरीदी गला |
| सादिलवार खर्च नि॥ | ४॥२ |
| भट ब्राह्मण गला केली | |
| ४ | |

ता।

| | |
|---|---|
| तुकणभट बिन | येन खर्चाबद्दल |
| अंतभट विद्वास खढी | खडी |
| १८ | ३ |

माहल मजकूर दरमाहा पातशाही होन
हुदेदार दरमाह होन पातशाही अफराप दरमाहे पातशाही
३होन १
यासी यैवज गला केली खडी
४

तेरीज येकदर गला
देवस्थाने १।२
ब्राम्हण १५१॥२।
सादिलवार खर्च ४॥२
व तेल
माहाल मजकूर खर्च ४
१६१॥

येणे प्रमाणे नेमून दिल्हे आहे यैसीयास मौजे मजकूर नख्त बाब घरटक्‍ वणी व तमाकू व मोहतर्फा बाजे बाब जे नख्त घडेल त्या पैकीं माहल मजकूर

वे देवस्थानाचें तेल वजा करून उरली बेरीज जे होईल ते व संदरहू जाबित्या मधे माहल मजकूर बाद गला खंडी ४ व देवस्थानचे तेल बाबद गला कैली ॥२ येकून यैवज नेमिला आहे तो गला सदरहू ब्राम्हणाचे असामी प्रमाणे ब्राम्हणानी विभाग करून द्यावा नरून बाब घडेना तरी जाबित्या मधे येन जिनस पैकी गला कैली खंडी ४॥२ व माहल मजकूरा कारणे व तेला कारणे यैवज नेमिला आहे तेणे प्रमाणे माहल मजकूर खर्च करावा देवास तेल पावावे सुहुरसन

समान तिसैन अलफ छ २१ माहे मोहरम

**कृ. वि. आचार्य कालगांवकर**

---

## श्रीसोपानदेव यांचें संस्थान

श्री सोपानदेव यांची समाधी सासवड येथें किंचित् गांवाबाहेर चांबळीचे ओढ्या-कांठीं आहे. सोपानदेवांचा जन्म शके ११९९, ईश्वर, कार्तिक शु. १५, शुक्रवारीं (ता. १२ नवंबर १२७७) झाल्याचें भिंगारकरांनीं ठरविलें आहे; व त्यांची समाधी मार्गशीर्ष वद्य १३ स असल्याची चरित्रांतून माहिती मिळते. परंतु मृत्युशक १२१८ कां १२१९ याबद्दल स्पष्ट निर्णय अद्याप झालेला नाहीं. या मठांत सालोसाल उत्सव होत असतो तो मात्र वैशाख शुद्ध ११ स होतो. याचें कारण समजत नाहीं* या मठांतून च रा. गो. का. चांदोरकर यांस ज्ञानेश्वरकृत योगवासिष्ठ, सिद्धांचें चरित्र वगैरे अत्यंत दुर्मिळ ग्रंथ मिळाले आहेत. सोपानदेवांचे नांवावर प्राकृत गीता, पंचीकरण व किरकोळ थोडे अभंग प्रसिद्ध आहेत. रा. आवटे यांनीं शक १८३६ मध्यें श्रीसोपानदेवी या नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध केला आहे, त्याची पोथी या देवळांतून च त्यांस मिळाल्याचें ते लिहितात. उत्तरोक्त ग्रंथ ज्ञानेश्वरांचे बंधु सोपानदेव यांचा च असावा. कारण त्यांत ९,१०,१३व १५ या अध्यायांत सोपान या नांवाचा उल्लेख आहे. शिवाय नामदेवानें " सोपानदेवें ग्रंथ केला होता सार। ठेविला समोर निवृत्तीच्या " (आवटे—नामदेवगाथा अ. ८६३) निर्देशिलेला सोपानकृत 'सारग्रंथ' हा 'सोपान-देवी' च असावा. सोपानदेवी हा ग्रंथ श्रीमद्भगवद्गीतेची सारग्राही टीका आहे.

विद्यमान वहिवाटदार ह. भ. प. रा. ज्ञानोबा हे आपस्तंबशाखी, श्रीवत्स गोत्री यजुर्वेदी ब्राह्मण आहेत. यांचे पासून आठवे पिढींतील रामानंद हे शिवाजीमहाराज यांचे समकालीन होत. रा. ज्ञानोबांच्या वाडवडिलांचें कसब ऊर्फ धंदा पूजा व कीर्तन करणें हा असे. सोपानदेव हे सद्गुरुसंप्रदायान्तर्गत आदिनाथपंथी शैव असतां आनंदसंप्रदायी वहिवाटदार या देवळाचे कसे नेमले, याचा उलगडा मला झाला नाहीं.

---

* कदाचित् " संती वाटे माझे मनीं इ. " या जनाबाईचे अभंगांत ती व तिचे गुरु सोपानदेव यांची भेट वैशाख शुद्ध ११ स झाली या उल्लेखाशीं या दिवशींच्या उत्सवाचा संबंध असण्याचा संभव आहे.

लेखांक १

## वंशावळ

**पुरुषोत्तमानंद** — **सिद्धानंद** — **रामानंद** ( को सासवड येथील थळ भाडळे पैकीं बिघे ८४॥ जमीन संपादक ) — **यादोबा गोसावी** ऊर्फ **सिद्धानंद** ( को सासवड येथील थळ भाडळे पैा जमीन बिघे ८५ संपादक व वर्षासन गावगनाचें संपादक ) — **विठ्ठल गोसावी** ( को सासवड येथील थळ राउत पौा मुबदला बिघे ८७ व इनाम ८५ बिघे संपादक )

**मनोहर गोसावी**

- श्रीधर गोसावी — ०
- विठ्ठल गोसावी — ०
- रामचंद्र गोसावी — ०
- रावजीबोवा गोसावी (मृ. इ. स. १८४३)
  - विष्णुबावा
  - चिंतोबाबावा
    - वामन
      - ज्ञानोबा ( विद्यमान )
    - विनायक
- महादेव गोसावी
  - कृष्णाजीबावा
- राघोबा — ०

## लेखांक २

श्रीसोपानदेवांचे समाधीकडे सरकारांतून व परभारा जें उत्पन्न मिळतें त्याचा व खर्चाचा तपशील—

**जमा**

| रुपये | |
|---|---|
| १३-०-० | चिरे ८१५॥ इनाम जमिनीचे सरकत वांटणी जातां उत्पन्न |
| १९२८१२८४ | सरकारांतून नक्त मिळत आहेत ते |
| १५१६८ | मामलेदारकचेरींतुन मिळतात |
| ३४५८ | सासवड मामलेदार कचेरींतुन मिळतात |
| २६८१३८३ | गांवगना वर्षासनाबा नक्त |
| ७८१०८९ | जकातीवरील हकाबद्दल ठराव होऊन व्याजाबा येणेचे |
| ३४८८ | |
| १६८१२८४ | सुपे महालकरी कचेरींतुन गांवगना वर्षासनाबा नक्त |
| १९२८१२८४ | |
| २३८३८६ | परभारें गांवगना उत्पन्न मिळत आहे तें |
| २०८३८६ | दुमाले गांवगना वर्षासन मिळत असतें ते रुपये |
| १ | मौजे दिवे येथील इनाम जमिनीचा आकार |

**खर्च**

| रुपये | |
|---|---|
| २२८८१५८१० | समाधीस खर्च होत आहेत ते |
| १५० | नित्य नैवेद्य व पुजेचा जिनस वगैरे मिळोन खर्च |
| ३० | तेल नंदादिपास व कथाकीर्तनास वगैरेबदल दरसाल सरासरी |
| ३६ | देवास वस्त्राबदल |
| १२८१५८१० | वैशाख शुा ११ उछवाबदल |
| २२८८१५८१० | |
| ० | जातां बाकी आम्हास ऐन नफा कांहीं मिळत नाहीं परंतु सदरहु देवास आम्ही नैवेद्य दाखवितो तो आम्ही खाऊन देवाची पूजा वगैरे सेवा करीत आहों. |
| २२८८१५८१० | |

२ मौजे सोनोरी इ-
नामगांव येथील
जमिनीचा आकार

२३६३६६

२२८६१५६१०

कार्तिक शुा ३ श. १५९३ **लेखांक ३**

सोपानदेव श्री नकल

अजरख्तखाने राजश्री सिवाजी राजे साहेब दाम दौलत हु बजानेब कारकुन वानावे दिमत देशमुखानी व देशपांडे व मोकदमानी व रयानी

सिक कसबे सासवड कर्यात मजकूर सु॥ इसने सबैन अलफ

श्री याची समाधी कसबेमजकुरी सालाबाद आहे

बीतपसीलवार

नि॥ जमीन मुंजरी देवा मोवताली थळ भाइळे पैकी कास मण ०४॥ आहे ते देवाचे देवास दिल्ही आसे कुल बाब कुल कानु दुमाला केले असे दुमाला कर्णे यास काडीची तोशीस न लावणे थळकरी आगर हर कोण्ही हिसकीहि न कर्णे थळ पौ ०४॥· साडे चार मण बाद देणे देवाचे देवास चालवणे

निसबत जकातीवर व बागाग पौ दर-रोजिना मोईन सालाबाद प्रौ चालवणे जोरी नैवियाकारणे केली मापी आधोली ००॥· व तेला बदल दिवाबतीस वजन टकबंदी ००॥· आछेर

सदरहु देवास दिल्हे आसे दर हर साल चालवणे ताजा खुर्दखताचा उजुर न करणे हिंदु होऊन इसकील करील त्यास गायीची आण आसे व मुसलमान होऊन इस्कील करील त्यास सोराची आण आसे येणेप्रौ चालवणे तालीक घेऊन आसल पत्र गोसावी रामानंद याजपासी परतोन देणे परवानगी हुजुर

मोर्तब

छ १ माहे रजब रुजु सुरनवीस

माघ शु॥ १२ श. १६३० **लेखांक ४** नकल

श्री सोपानदेव

॥ छ मा॥ अनाम देशमुख व मोकदम व देशपांडे को॥ सासवड यास नारो शंकर सचीव सुहुरसन समान मया अलफ राजश्री स्वामीचे शेवेसी तुम्ही अर्दास पाठविली की श्री याची समाधी को॥ मजकुरी आहे त्यास

नैवेद्य नंदादीपाची मोईन व इनाम सेत कास मण ०४॥• साडेचार मण आहे त्या खेरीज जाजती इनाम कास मण पाच द्यावयाची आज्ञा केली पाहिजे म्हणून आर्दास पाठविली त्याजवरून राजश्री स्वामीनी सनद सादर केली असे बीता।

| | | |
|---|---|---|
| मुजेरी पैकी जमीन देवाभोवताली थळ भाडळे पैकी कुलकानु कुलबाव गोसावी याचे दुमाला करणे कास | | जकाती व बाजार पैकी दररोज मोईन सालाबादप्रमाणे तेल दिवाबत्तीस जोरी केली नैवेद्यास |
| ०४॥ | कदीम पूर्वील सनदप्रमाणे | वजन टाक ००॥• |
| •।• | जाजती इनाम हल्ली करून दिल्हे भागीरथी पावेतो कास | ००॥• |
| •।४॥ | | |

बेणेप्रमाणे थळ कास साडे नव मंण व दररोज तेल नंदादीपा आदसेर व जोरी केली नैवेद्यास आधोली रास करार करून सनद आलाहिदा दिल्ही आहे त्या प्रमाणे का॥मजकूरपैकी चालवीत जाणे छ १० जिलकाद पा॥ हुजुर

पत्रा
वधिरयं
भाति

सुरु सुद

शके १६२९ ( १७ जानेवारी १७०८ ) **लेखांक ५**

नकल

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ३४ सर्वजित नाम सवछर माघ शुध षष्ठी मंदवासरे क्षेत्रियेकुलावतंस श्री राजा शाहु छत्रपती स्वामी याणी देशमुख व देशपाडीयानी व मोकदमानी व रयानी कसबे सासवड कर्यात मजकूर यांस आज्ञा केली येसाजे + + लपश्वी सिधानद हे हुजूर येउनु विक्नि केले की का॥ मजकुरी श्री सोपानदेव याची समाधी आहे त्यास पूर्वी राजश्री थोरले कैलासवाशी यानी इनाम दिधले आहे ते चालत आले आहे परंतु नैव्यद्यास पुरत नाही आणि अधिक + + + पाच मण व पुरातन जे चालत आहे त्याची नूतन सनद करून दिल्ही पाहिजे म्हणउनु विदित केले त्या-वरून पूर्वील पत्र मनास आणून + + + + पूर्वील व नूतन भूमि इनाम करून दिल्हे आसे

॥ श्री ॥
शिवनरपति हा-
र्षनिधान मोरेश्वर
सुतभैरव मुख्य
+ प्रधान +

नि॥मुजेरी जमीन देवाभोवताली थळ भाडळे पैकी कुलकानु कुलबाब गोसावी यास दुमाला करणे कास

८४॥ कदीम पूर्वील सनदप्रमाणे मण कास ·:· जाजती हल्ली करून दिल्ही भागीर्थी

पैकी + + +

·।४॥·

निसबती जकाती बाजारपैकी दररोजीना पके मोईन सालाबाद++चालत आले++ तेलबदल दिवाबती जोरी केली८८॥· वजन आछेर नैवेद्याबदल केली मापे ८८॥· आधोली ८८॥·

सदरहुप्रमाणे थळ कास व तेल आदसेर व जोरी आधोली चालत आहे तेण-प्रमाणे व नूतन येसे चालवणे साल दरसाल नूतन पत्राचा आक्षेप न करणे याची प्रती घेउनु आसल पत्र भोगवटियास सिधानद गोसावी याजवळी परतुनु देणे पूर्वीपासून चालत असेल तेणप्रमाणे चालवणे आणि जे नूतन इनाम दिला आहे तो अबिछिन चालवणे पा. हुजूर

---

## लेखांक ६

श्रीजयति

फाल्गुन वद्य १० शके १६५१
२३ फेब्रुवारी १७२८

रा. रा. नारो जनार्दन गोसावी यांसि

सेवक चिमणाजी बलाल नमस्कार सु॥ समान आशरीन मया व आलफ... ... हे पत्र तुम्हांस व दुसरे गावकरी यांस सादर केले असे ... ... ... ... ... ... ... ... प्रती लेहून घेऊन असल पत्र परतोन देणें छ २३ रजब पा॥ हुजूर

चिमणाजी बलाल यांचें पत्र—

छ मा॥ अनाम देशमुख मोकदम व देशकुलकर्णी व कुलकर्णी कसबे सासवड कमाविसदार क॥ मजकूर प्रांत यांस—

( वरील मतलबाचें व सदर मितीचें पत्र )

पा.-इ, ३१

लेखांक ७

श्रीदत्तात्रेय

सोपानदेव

माघ शुा ५ श. १६६३

३० जानेवारी १७४२

श्री वास्तव्य हरिभकपरायण राजश्री सिध्धानंद गोसावीपरंपरा का सासवड स्वामीचे शेवेसी

सेवक देवराव मेघःशाम नमस्कार विनंति उपरी सुा इसने आर्बैन मया अलफ तुह्मी हुजुर येऊन पूर्वील राजपत्रे व राजश्री नारो शंकर सचिव याचे पत्र इनामाचे दाखविलें की श्री याची समाधी का मजकुरी आहे त्यास नैवद्य व नंदादीपाची मोइन सेत कास मण ।४॥ साडे नव मण पुरातन आहे त्याप्रमाणे चालत आहे त्यास राजश्री पंत सचिव याचे निसबतीस कसबे मजकूर मुकासा होता हाली कसबे मजकूर खासगीकडे होऊन आपले निसबतीस आमल आहे तरी आपली पत्रे पूर्ववतप्रमाणे करून दिल्ही पाहिजेत म्हणून हुजूर यऊन विदित केलेत त्यावरून मनास आणून सनद सादर केली आसे

बीतपसील

मुजेरीपैकी जमीन देवाभोवताली

८४॥ थळ भाडल

।। किता जमीन भागीरथी

पवेतो कास

।४॥

जकात व बाजारपैकी दररोज मोईन

सालाबादप्रो जोरी कैली नैवेद्य

८८॥

तेल दिवाबतीस

वजन टकबंदी

८८॥

येणेप्रो थळ कास साडे नव मण व दररोज तेल नंदादीपास आदसर व जोरी नैवेद्यास अधोली रास करार करून का मजकूरचे कमाविसदारास व जमीदारास आलाहि (दा!) सनद सादर केली असे तरी परंपरेनें येणेप्रमाणे कसबे मजकूरचे येवजपैकीं घेऊन श्री ची पूजाउर्जा करून सुखरूप राहणे रा छ ४ माहे जिल्हेज **बहुत काय लिहिणे**

लेखन सीमा

(वरील मजकुराचा व मितीचा हुकूम) छ

मा अनाम देशमुख व मोकदम व देशगडे का सासवड यास इनाम व मोईन चालवण्याबद्दल प्रती लेहून घेऊन असल पत्र भोगवट्यास गोसावी याजवळ परतोन देणे जाणिजे

लेखन सीमा

॰ श्री ॰
राजा शाहु छ-
त्रपति स्वामीचर-
णी तत्पर देवराव
मेघशाम नी
रंतर

फाल्गुन वा। ९ श. १६७१ श्री लेखांक ८

२१ मार्च १७५०

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री नारो
आपाजी गोसावी यांसि

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार सु॥ खमसेन मया व अलफ राजश्री विठोबा गोसावी परंपरा श्री वास्तव्य का। सासवड याणी हुजूर येऊन विदित केले की का। मजकुरी श्रीची समाधी आहे. त्यास नैवेद्य व नंदादीपाची मोईन व इनाम सेत कास मण ०१४॥० साडे नव मण वगैरे पुरातन पासून आहे त्याची राजपत्रे सादर आहेत बी॥

| मुजरी पैकी जमीन देवा भोवताली | जकात व बाजारपैकी दररोज मोईन सालाबाद | जोरी केली नैवेद्य |
|---|---|---|
| ०४॥० थथ भाडले | तेल दिवाबत्तीस वजन टकबंदी | ००॥० |
| ०।० किता जमीन भागीरथी पावेतो | ००॥० | |
| ०१४॥० | | |

येणे प्रो थळ कास साडे नव मण व दररोज तेल नंदादीपास अदसर व जोरी नैवद्यास अधोली व या खेरीज श्रीच्या मोहछवाकारणे दरसाल नक्त रुपये २ व सेरी पैकी जोरी बारुले केली ०२ दोन मण याप्रो चालत आले आहे त्यास का। मजकूरचा अमल खासगीकडे होता तो हली सरकारात जाला आहे या करिता सरकारचे पत्र करून यावे म्हणोन विदित केले त्याजवरून राजपत्र व राजश्री देवराव मेघशाम याचे पत्रावरून मनास अणून हे पत्र सादर केले असे तरी सदरहुप्रमाणे इनाम व मोईन राजपत्री व देवराव मेघशाम यांचे पत्राप्रमाणे श्री कडे चालत अल्याप्रमाणे सुरळीत चालवणे या पत्राची प्रती लिहून घेऊन मुख्य पत्र याजवळ भोगवटियास परतोन देणे जाणिजे छ २३ रबिलाखर **बहुत काय लिहिणे**

लेखन
सीमा

~~~~~~
~~~~~~

३० जुलई १७५६ लेखांक ९

श्री सोपान

शेतपत्र शके १६७८ धाता नाम संवछरे श्रावण शुद्ध त्रितीया भृगुवासर ते दिवसी हरिभक्त विठल सदानंद गोसावी गोत्र श्रीवछ सूत्र आपस्तंब वास्तव का। सासवड सन्नीध श्री

यासी दशमुख व मोकदम व पुरंधरे देशपांडे का। मजकूर सु॥ सबा खमसेन मया आलफ कारणे शेतपत्र लेहून दिधले येसेजे श्रीच्या पश्चम भागी जागा वावर श्रीच्या नवेद्याची होती ती जागा घरे बांधावयासि तुम्हा जवळून घेऊन मोबदला जमीन इनाम थळ रावताचे नजीक तालामाया मण ।॥~ बारा श्रीच्या नेवेद्यास दिल्हे असेत तर तुम्ही आपले वंशपरंपरागत श्रीचा नैवेद्य चालवून इनाम सेत आनभवणे आमचे वंसीचा कोणी शेता विसी तुम्हासी कज्या करील त्यास श्री ची शफत आसे हे इनामपत्र लेहून दिल्हे सही जांणीजे छ ३ जिलकाद

मोर्त
बसुद

पि॥ त्रिंबक सदासीव पुरंधरे देशपांडे कुलकर्णी का। मजकूर

खं. चिं. मेहेंदळे

# हेमाडपंती मेस्तक

हेमाडपंतकृत मेस्तक म्हणजे जमाखर्च–लेखन–पद्धतीचें प्रकरण हें एका फार जुन्या बाडांत सांपडलें. हें मेस्तक अनेक कारणांनीं महत्त्वाचें आहे. त्यावरून तत्कालिन राजकीय व सामाजिक व्यवहार–पद्धतीची सूक्ष्म छटा दृग्गोचर होते. व त्या वेळच्या भाषेचा एक मासला दृष्टीस पडतो. या मेस्तकाच्या निरूपणांत पुष्कळ फारसी व आरबी शब्दांची पारिभाषिक शब्दांच्या ठायीं योजना केली असून निरूपणाच्या ओघांत त्यांच्या अर्थाची परिस्फुटता हि करण्यांत आली आहे. त्यामुळें भाषेच्या दृष्टीनें हि हें मेस्तक प्रकरण महत्त्वाचें आहे. या मेस्तकाची अस्सल प्रत धापूजी आपाजी शेखदार आथणीकर यांच्याजवळ होती, त्यावरून आपण नक्कल केली असें मजजवळच्या बाडाचा लेखक भीमासुत गंगाधर प्रकरणाच्या आरंभीं म्हणतो. हें बाड शके १७०० हेमलंबी नाम संवत्सरांत पौष कृष्ण १० स तयार झाल्याचा उल्लेख आहे. मेस्तकाच्या शेवटीं——

" या मेस्तकाचे विवरण ॥ विशेष केले निरोपण ॥
**शंकरात्मज नारायेण** ॥ करी नमन गुरुसी ॥ १४९ ॥

ही ओवी आहे. यातील "**शंकरात्मज नारायण** हा कोण? मेस्तक-प्रकरणाचा रचयिता हेमाडपंत यांचे च हें नामाभिधान आहे कीं काय?

मला उपलब्ध झालेल्या मेस्तकाची १४२ वी ओंवी अशी आहे—

नेणवेपणाचे ग्रंथी ॥ होती मेस्तकाची स्थिती ॥
संकृत् म्हणोन प्राकृती ॥ वीस्तार लिहीजे ॥

यावरून असें उघड दिसतें कीं, मेस्तकाची हेमाडपंतांची मूळकृति संस्कृतांत होती. त्याविषयीं लोकांना पूर्ण अज्ञान होतें म्हणून "शंकरात्मज नारायण" यानें ती कृति प्राकृतांत स्वबुद्धीप्रमाणें रचिली. आणि ती विस्तृतपणें कथन केली. त्या च प्रमाणें अन्य लोकांनीं हि ती प्राकृतांत रचली. तशा दोन तीन कृति पुढें मंडळापुढें आहेत च.

श्री

हेमाडपंती मेस्तक प्रत बापूजी आपाजी शेखदार आथणीकर ॥

प्रारंभ

॥ श्री गुरुभ्यो नमः ॥ श्री मार्तंड भैरव प्रसन्न ॥
॥ प्रारंभ कार्ये नीर्वीघ्नमस्तु ॥
ॐ नमोजी विघ्नहरा ॥ सकळ बुद्धीच्या सागरा ॥
त्याचीया विचारा ॥ पैल पारा जावया ॥ १ ॥
आतां नमूं पद्मज दुहिता ॥ चतुर्दश विद्या वाग्देवता ॥
हृदयींच वसोनी सर्वदा ॥ स्फुर्ति वीपुळ मज द्यावी ॥ २ ॥
सकळा विश्रांतीचे माहेर ॥ श्री गुरुसेवा मुख्य भांडार ॥
जेणे पाविजेल पैल पार ॥ या भव-नदीचा ॥ ३ ॥
जमा खर्चाचे मेस्तक ॥ प्रांज्वल लेखन तवताक? ॥
व्यापार कृत्यादिक सकळीक ॥ चतुरीं परसीजे ॥ ४ ॥
कागद् नेमस्त कापावे ॥ चत्वार कोन पाडावे ॥
सीकस्त ऐसे जाणावे ॥ नाम त्याचे ॥ ५ ॥
कागद् नेमस्त जाहलिया वरी ॥ श्रीकार ल्याहावा प्रथम पत्रावरी ॥
मस्तकप्रकार या उपरी ॥ चतुरी लीहीजे ॥ ६ ॥
तीन रकाने रेखजि ॥ मशुदर या नामे बोलीजे ॥
जमा तेथे लीहीजे ॥ प्रथम सद्र ॥ ७ ॥
त्या मशोदराचे हर्फ दोन्ही ॥ चतुरी नाम ठेविले जाणोनी ॥
ते युक्ती द्यावी वोळखोनी ॥ हृदयामाजी ॥ ८ ॥
येका अक्षराचा ठाव सोडावा ॥ हर्फ आमल्ल जमे ल्याहावा ॥
र्‍हर्फे हसील जमा जाणावा ॥ दुसरी जमा ॥ ९ ॥

गांवात प्रजा जमा आधी ॥ यस वातलात दृशाची ॥
नात नीधल बाकी ॥ ४४ ॥
जमाबंदिस आधार ॥ गांव झाडा पे निवारं ॥
हाक दार ग्राम सादिल वार ॥ तपसील लीहीले पाहीजे ॥ ४५ ॥
गांव निसबतीचा विस्तार ॥ हाकदार ग्राम सादिलवार ॥
ल्जु दिवाण ईनामदार ॥ खालेसोति गावगन्नासी पाहा ४६ ॥
खालसा विमुजेरे यांनीं ॥ मोहतफी वलुते वाणी
मुजेरीस जिरायित जाणोनी ॥ दुजे बागाईत ॥ ४७ ॥
मुजरी याचा अर्थ ॥ मोहतर्फा वाणी जात ॥
समजोनी लिहीजे ॥ ४८ ॥
जीराईत म्हणजे काय ॥ धान्याचें पेरित आहे ॥
बागाईत मला पाहे ॥ समजोन लीहीजे ॥ ४९ ॥
या दो सदराची स्थिति ॥ नीसीम लिहीणार आसना ॥
त्यासीच कळल्याची गती ॥ ईतरासी कळेना ॥ ५० ॥
मशोदरी तपसील ल्याहावा ॥ सकळ वृतांती पाहावा ॥
झाडा अवघा घ्यावा ॥ बाजे माहलीचा ॥ ५१ ॥
प्रथम जकाती माहल ॥ विस्तार ऐसा सांगिजेल ॥
उभा बहुचाल ॥ थोडा आड मार्ग ॥ ५२ ॥
पैसाद्द म्हणे गेले ॥ निकाळू म्हणे गेले ॥
थल भरीत भरले ॥ गांवामध्ये ॥ ५३ ॥
गुराची जातीसी गोटी ॥ कारक म्हणजे मोईन गाटी ॥
बाजार बैस कपाटी ॥ उचलीती आठा दिवसी ॥ ५४ ॥
दिवाण वगैरे घेईजे फसकी ॥ भाजी पाला उचलीजे पळधि ॥
छापाछापीजे वेगी ॥ कामड बोलि या नाम ॥ ५५ ॥
गाडा घोडा बंदी गुलाम ॥ याचे वेईजे दाम ॥
ईतके ज्याचे हावाला काम ॥ तो निधर्नास बोलीजे ॥ ५६ ॥
हे आमानत कमावीसी ॥ गुतक्या दिधल्या गुतक्यासी ॥
नाम ठेविले त्यासी ॥ ईजारा ऐसा ॥ ५७ ॥
जराईव माहल तो कैसा ॥ पाहिला पाहिजे बहुवसा ॥
सांगिजेल धरा वीश्वासा ॥ जराब माहालासी ॥ ५८ ॥
गांज्यांत बाकू हासीलासी ॥ गुडार यात्रा मुडदार स्वर्सा ॥
सरा पाडिपत्र कोणयासी ॥ जराब जाणीजे ॥ ५९ ॥
नाना जिनस पेरीजे झाड ॥ फळ होती मुक्त गोड
नांव ठेविले सुसांड ॥ बागाईत ॥ ६० ॥

दिवाण सेन्या आसती ॥ तेली हिल्यां पाहीजेती ॥
नदीतीरी हसील घेती ॥ तो पाहावा येगी ॥ ६१ ॥
टाकरे, होड, सांगसोया ॥ ताफे, नावा, आसालिया ॥
हसिल घ्यावा पाहोनिया ॥ लीहीजे संपूर्ण ॥ ६२ ॥
तेथवरी बाजे माहलचा विचार ॥ सांगितला विस्तार ॥
पुढें आमानत सेरणी वतनदार ॥ भेटीसी पहावे ॥ ६३ ॥
वृत्ति साधुनी घेणे आहे ॥ त्यापासुनी द्रव्य आले पाहे ॥
त्यासी नाव ठेविले हे ॥ शेरणी ऐसें ॥ ६४ ॥
इनामदाराचे हक वतन ॥ अमानत करीती दिवाण ॥
ते कमावीस पैदास्तीसी जाण ॥ लीहीजे ॥ ६५ ॥
खंड गुन्हेगारी घेती ॥ गेल मामुल करिती ॥
लुटी चुकारू खुदमसाला घेती ॥ ते येक पैदास्ती ॥ ६६ ॥
पुत्र संतान नाहि लेकरू ॥ दफिना सापडवित विचारू ॥
पाडाव करूनी आणीती वारू ॥ ते येक पैदास्ती ॥ ६७ ॥
दुत कर्म खेळत आसती ॥ कचक लावा म्हणती ॥
अजगे बिजेलवर सांपडती ॥ ते येक पैदास्ती ॥ ६८ ॥
या सेरीज जे राहीले ॥ त्यासी आहे नाव ठेविले ॥
पाहीजे पैदास्ती ॥ ६९ ॥
साधुणुक म्हणोनी नाम ॥ ऐश्या या पैदास्ती ॥
लीहोल्या पाहीजेती ॥ तेथुनी हर्फेची पद्धति संपूर्ण ॥ ७० ॥
हे हर्फे येसी ल्याहवी ॥ विस्तार सांगितला बरवी ॥
आतां येकंदर सांगतो ऐकावी ॥ सदरे चढविणे ॥ ७१ ॥
दोन्ही हर्फे मुशोदर ॥ दोनी दफाते हर्फे येक ॥
दोमी दफाते एक ॥ जमेसी जाण ॥ ७२ ॥
कर्ते बीत्त दोनी ॥ तालुक विलायती जाणोनी ॥
मजमू बाकी समजोनी । लीहीजे बरवी ॥ ७३ ॥
मजमू बीत्तासी जाणावे ॥ दोनी किरदार आणावे ॥
कायम ऐन जिनस पाहावे ॥ विस्तार जाणा ॥ ७४ ॥
गावगन्ना नफर नीसबती ॥ दोनी मशोदरे येती ॥
तालुक विलायती ॥ लीहीजे किलेक ॥ ७५ ॥
येक जाणा विलायती ॥ दुजा जाणा नफर नीसबती ॥
दोनी मिळोनी पधति ॥ निसबतवर बाकी ॥ ७६ ॥
एकून बाकी व काया वडली ॥ दुजी कर्ते सांगितली
सालमजकूर जाणीजे ॥ ७७ ॥

येथूनी जमेची मर्यादा ॥ विचारलीयां पाहीं सर्वदा ॥
तरीच पावेल सौख्यपदा ॥ आनंदरासी होत असे ॥ ७८ ॥
गांवगन्ना बेरीज एक ॥ दूजी गावगन्ना खेरीज येक ॥
हे मिळुनी साल मजकुर ॥ जाणीजे ॥ ७९ ॥
घटाई गावगन्ना जमे नक्त ॥ जमे धरीती जिनस्त ॥
वजा करुनी वसुलांत ॥ काढिजे बाकी ॥ ८० ॥
जिनस्त उरले ते करि जे बाहा ॥ जिनस्त उरले ते करबाहा ॥
दोनी मिळोनी ल्याहावा ॥ जापा वसुलात ॥ ८१ ॥
वसुल वजा करोन काडीजे बाकी ॥ नक्त जाणा विवेकी ॥
ऐक हे पधति आवलोकी ॥ जाणा सुबुद्धि साचार ॥ ८२ ॥
हा वीचार पुसावा श्रेष्ठा ॥ हृदयीं साईला साटा ॥
विचार करूनि चतुष्टा ॥ विवेकाचा ॥ ८३ ॥
येथे आलस न करावा ॥ पुसीलीयाचा अर्थ पुसावा ॥
स्मरण करोनि देवाधिदेवा ॥ मंगल मूर्ति मोरयासी ॥ ८४ ॥
आतां खर्चाचे लक्षण ॥ ते सांगिजेल जाण ॥
चतुरी होवोनि सावधान ॥ मेस्तक लेखन परीसीजे ॥ ८५ ॥
तीन रकाने मुशोदर ॥ खर्च लिहीजे सुंदर ॥
बेरीज करिजे बार ॥ आवघी मिळोनी ॥ ८६ ॥
हर्फेसी लीहीजे ऐन खर्चीत ॥ दुजे हर्फे सर्फ आमलात ॥
मिनकच जाणा निरुत ॥ मुशोदरासी रुजु ॥ ८७ ॥
सर्फ आमल खर्चाचा ॥ आभीप्राय सांगेन याचा ॥
चित्त देवोन साचा ॥ पहावा अर्थ ॥ ८८ ॥
जिनस घेतला खरेदी ॥ विकीला ना प्रोक्त सांधी ॥
वजन सुमारादि करुनी आदि ॥ कैलीत सैर वेगळे ॥ ८९ ॥
जमेसी आला जिनसाना ॥ लीहीजे खर्ची धना ॥
पोटीं जिनस्त लिहोन जाणा ॥ नक्त बेरजेस आणिजे ॥ ९० ॥
कर्णीक तांदूळ जमेसी आले ॥ साल्ली गहू खर्ची लिहीले ॥
बेरजेस धन आले ॥ जाणा ॥ ९१ ॥
ऐसेचि अवघे जीनस ॥ पाहोन लिहीणे चौकस ॥
वीस्तार सर्फेच्या आमलास ॥ सांगितला ऐसा ॥ ९२ ॥
हासील आमली लीहीजे जिनस्त ॥ रुजु आलास ॥
लिहीता कळेल चातुरासी ॥ येरासी ना कळे ॥ ९३ ॥

हर्फे हर्फ ऐन खर्चासी जाणा ॥ दफातेरख्तखानाटाणा ॥
दफाते मुजाफति वगैरे अणणे ॥ ऐन खर्चासी ॥ ९४ ॥
जमेसी आली ईंजाफत ॥ ते पर माहली खर्चीत ॥
त्या नांव कर्ते ईंजाफत ॥ खर्ची लिहणे ॥ ९५ ॥
कर्ते वगेरेचे तपसील ऐसे ॥ कर्ज हसना घेतले जिनस ॥
खर्ची रद कर्ज वितास ॥ ल्याहावे जाणा ॥ ९६ ॥
कर्ज वसुल ते लिरिसुन ॥ जमेसी लीहीजे आपण ॥
खर्चि कर्ज दाद न जाण ॥ लीहीजे चातुरी ॥९७ ॥
व्याज महालीच्या कर्जासी ॥ पडले असले कारकुनासी ॥
धर्णा मजुरा देती त्यासी ॥ लीहीजे आक्रम ॥ ९८ ॥
लागवड खर्च काये ॥ तुमकुम कास्तान एक पाहे ॥
दुजी मजूरीस देत आहे ॥ ते लागवड जाणीजे ॥ ९९ ॥
बाजे लागवड ते काय ॥ बोलीजे घडणावळीस ॥
विस्तार ऐसा ॥ लागवड संपूर्ण जाणा ॥ १०० ॥
ऐसे लागवड नित्य ॥ खास बाकसेरी निमत्य ॥
लागवड आहर्निसी लागत ॥ ईमारतीसी ॥ १०१ ॥
ईमारतीसी विस्तार काय ॥ गड किल्ले वाडा बांधिताहे ॥
बांधणावळ ऐसे नांव पाहे ॥ ईमारती ॥ १०२ ॥
सीलकावणी आली जमेसी ॥ बंदेवान लिहिजे खर्चासी ॥
रुजु आले दफातेसी ॥ बंदेवान खर्ची ॥ १०३ ॥
दफाते मुजाफती वगैरे ॥ संपूर्ण जाला विस्तार ॥
दुजी दफातेसी रुजु विचार ॥ पाहीला पाहीजे ॥ १०४ ॥
दोनी कर्ते मिळोनी ॥ दफाते मुजाफती जाणोनी ॥
दुजे दफातेचा विस्तारुनी ॥ सांगेन पाहा ॥ १०५ ॥
दुजे दफातिस कर्ते दोनी पाहे ॥ मिळोन दफाते घडताहे ॥
कर्त्ते रक्तखाना हे काये ॥ सांगन सोय त्याची ॥ १०६ ॥
कर्त्ते जाणा दोनी मत्ते ॥ तह वेळी शाहिर मुशारियात ॥
याचा सांगेन विस्तार यांत ॥ प्रांज्वळ करोनी ॥ १०७ ॥
हुजुर पाठविला जिनस ॥ ईरसाल म्हणती त्यास ॥
माहाली कारकुनाही खर्चास ॥ ल्यावे जाणा ॥ १०८॥
माहल धरती कळावे ॥ पागा पीलखाना जाणावें ॥
उष्ट्रेसी कारखाना ल्याहवे ॥ तपसील जाणा ॥ १०९ ॥
महाल अनुक्रमे आणा ॥ कोठी थटी हे जाणा ॥
मुदपाक पालखीखाना ॥ विस्तार संपूर्ण लिहीजे ॥ ११० ॥

धण्याच्या सुहृद लोकांसी ॥ देवविले खर्चासी ॥
आमरत्का जाहलीवरी ॥ तव्हेल जाणिजे ॥ १११ ॥
धण्याचे फर्ज फारीक केले ॥ आणीकाकडून देवविले ॥
मे पाहिजे लीहीले ॥ तव्हेलेसी ॥ ११२ ॥
ऐन शाहीरूचा विस्तार ॥ जमाव येती सिलेदार ॥
कारकून हुजराती वार ॥ ऐन शाहीरूसी ॥ ११३ ॥
आले नामजाद लोक ॥ हे जाणावे सकळीक ॥
ऐन शाहीरूसी देख ॥ ल्याहवे चतुरी ॥ ११४ ॥
बाजे शाहीरूची नांवें ॥ खैरात देहनगी जाणावे ॥
बदर खाउ फाल ताथीफा ल्याहावे ॥ तपसील चातुरी ॥ ११५ ॥
कुमके बदल ते जे आले ॥ ते पाहिजे लिहीले ॥
बाजे शाहेरु ॥ ११६ ॥
तपसील कर्ते खाना ॥ कर्ते माहाल मजकुरी आणा ॥
भीत लीहीजे ॥ ११७ ॥
पान सुपारी नेवजास ॥ तेल दिवटी गस्त गोटास ॥
सदर बिछानीयास ॥ लीहीजे बाजे खर्च ॥ ११८ ॥
कागद बाहा शाई सीर ॥ देवावती देव पीर ॥
हा तपसील विचार ॥ समजोन लीहीजे ॥ ११९ ॥
दोनी कर्ते च्यारी बीत ॥ जाणोनी आवघीया तपसीलात ॥
निश्चयेसीं ॥ १२० ॥
ऐसे खर्चाचे विवरण ॥ सांगितले संपूर्ण ॥
श्रोते व्हावे सावधान ॥ ग्रंथ निरोपणी ॥ १२१ ॥
येक मुशोदर जमेचे ॥ दुजे जाणा खर्चाचे ॥
तिसरे बाकीचे ॥ तपसील तीन मशोदर ॥ १२२ ॥
मुशोदरी तपशील बाकीसी ॥ सनवात बाकी बहु दिवसी ॥
सीसाला जाणती उवर्शी ॥ बाकी सनवात ॥ १२३ ॥
गुदस्ता नांव गतवर्षी ॥ सनतळ नांव हसीलासी ॥
याही जाणावे खुणेसी ॥ चातुर लोकी ॥ १२४ ॥
वसुलास सुस्ती करू नये ॥ सुस्ती करीता बाकी राहे ॥
वसूल झाडा न करिता पाहे ॥ आनर्थ मोटा ॥ १२५ ॥
यत्न करीता बाकी राहीली ॥ तपसीली पाहिजे लीहीली ॥
तपसील नसता जाहली ॥ देशधडी ॥ १२६ ॥
सनद मोझ्या असो द्यावा ॥ येथे आळस न करावा ॥
आळस करीता गोवा ॥ होईल नेमस्त ॥ १२७ ॥

जे जेवीलेच की ॥ सनद्‌मोज्या लीहोन य की ॥
तोची सुख पावे लोकी ॥ राज्य–द्वारी ॥ १२८ ॥
ऐसा बाकीचा विचार ॥ सांगितला पै साचार ॥
आगीक त्यावा विस्तार ॥ सांगन पाही ॥ १२९ ॥
पावणे तीन रकाने रेखीजे ॥ दक्षण वाम त्यजुनी लीहीजे॥
पीछा नाम बोलीजे ॥ रेखा प्रथम ॥ १३० ॥
पीछा जवलुनी उत्तरे रेखीजे ॥ दक्षण कोनासी जाणीजे ॥
नांव ठेविले सहजे ॥ कोना ऐसे ॥ १३१ ॥
दोहीकडे स्थळ सोडावे ॥ मध्य दोनी रकाने ल्याहावे ॥
बीत ऐसे जाणावे ॥ त्यासी ॥ १३२ ॥
बीत्तामध्ये रेखीजे ॥ तेही किर्दार बोलीजे ॥
मुशोदरामध्ये लिहिजे ॥ तेहि कीर्दार जाणावें ॥ १३३ ॥
दोन रकानेत जीलूह ॥ त्यामध्ये जरि लिहीजे ॥
जीलबीत ऐसे नांव ॥ आले त्यासी ॥ १३४ ॥
प्रथम एक रकाना सोडीजे ॥ पुढे येक रकाना रेखीजे ॥
कान्हाना ऐसे जाणीजे ॥ नाव त्यासी ॥ १३५ ॥
रकाना लिहीजे चौगुणा ॥ दक्षण भागी तोभींगाना ॥
वामभागी तो सीसाना ॥ नाव जाणीजे ॥ १३६ ॥
वाम भागाहून अर्ध रेखा ॥ ते ईस लाख जाणा का ॥
उत्तर रेखीजे ऐका ॥ ईरफ ऐसे ॥ १३७ ॥
मुशोद्र हर्फ दफाते ॥ कर्ते बित हे प्रथम बोलिलो त्वरित ॥
परी एकंदर सांगन पुरते ॥ नावा रेखीजे ॥ १३८ ॥
पीछा कोन हर्फे दफाते ॥ कर्ते बित्तर काना येत ॥
ईरेफ ईसालाखकीर्दारजीलेबीत ॥ लीहीजे नांव जाणा ॥ १३९ ॥
कहना चौगुण बिगाना ॥ सांगन नांव पद्धती सुजाणा ॥
मेस्तक विचार मनासी आणा ॥ संपुर्ण तुम्ही ॥ १४० ॥
नेणवे पणाचे ग्रंथी ॥ होती मेस्तकाची स्थिती ॥
संकृतू म्हणोन प्राकृती ॥ विस्तार लिहीजे ॥ १४१
येथे पष्ट लीहीले आहे ॥ आज्ञानासी सुलभ होये ॥
सादर वाचिताची पाहे ॥ लिहीणार शाहाणा ॥ १४२ ॥
लेखनपठणासी करी आळस ॥ ते जाणावी भ्रांती अति मुर्खास ॥
आभाग्य आज्ञान विशेष ॥ आविद्यापुत्र ॥ १४३ ॥

सेत पेरोनी करी निद्रा ॥ तरी तो जाईल भंगा ॥
मूर्ख भ्रमेल असंगा ॥ पिकिल म्हणोनी ॥ १४४ ॥
सेती जरी वाहे हते ॥ आखंड आहे जपत ॥
भूमिका देईल हात ॥ मग दरिद्र कैचे ॥ १४५ ॥
तैसा पाहे नरदेह लोकी ॥ आखंड पाहावे विलोकी ॥
तरीच धन्य ईह लोकी ॥ वंसी कुळदीपकू ॥ १४६ ॥
अंती पाहावे सावधान ॥ आळसा ते दूर करोन ॥
कामक्रोधाते दमून ॥ ध्यानी सरस्वती बैस ॥ १४७ ॥
या मेस्तकाचे विवरण ॥ विशेष केले निरोपण ॥
शंकरात्मज नारायेण ॥ करी नमन गुरूसी ॥ १४८ ॥
॥ शके १७०० हेमलंबी नाम ॥ संवत्सरे पौष कृष्ण १० ॥
॥ भोम वारे चतुर्थ प्रहरे मु॥ अथणी ॥
॥ हस्ताक्षर भीमासुत गंगाधरे ॥
॥ लिखितं ॥

शिकंदरलाल आतार

~~~~~~~~~~~~

## कृष्णाजी नाईक जोशी यांची असल सनद व त्यांचे घराण्यासंबंधीं माहिती

—oo—

कृष्णाजी नाईक बिन केसोबा नाईक जोशी हे सातारकर जोशांचे पूर्वज व वावडेकर, बारामतकर, व मेडदकर या घराण्याकडे फेरमोबदल्यानें आलेल्या पिंपरी गांवचे मूळ संपादक होत. शाहूमहाराज उत्तरेंतून साताऱ्यास आल्यानंतर ज्यांस पोतदारी दिल्याचा चिटणिसांनीं आपल्या 'शाहूमहाराजांचे चरित्रांत उल्लेख केला आहे ते च हे कृष्णाजी नाईक, जोशी. रा. लक्ष्मणराव पांगारकर यांनीं आपल्या 'मोरोपंतांच्या चरित्रा' पृ० ५३ वर सदाशिव नाईक ( कृष्णाजीचे बंधू ) यास पोतदारी मिळाली, असें एक गैरवाका विधान केलें होतें. त्याविरुद्ध रा. ब. का. ना. साने यांनीं आक्षेप घेऊन, कृष्णाजी नाईकासंबंधानें झालेला अन्याय दूर करावा, असें 'कृष्णाजी नाईक जोशी व रा. पांगारकर' या मथळ्यावरील शके १८३४ चे आपले लेखांत दाखविण्याचा प्रयत्न केला. त्या वेळीं त्यांस राजशक ४७ शार्वरी संवत्सर, पौष शु. पंचमी गुरुवारची असल सनद मिळाली
~~~~~~~~~~~~

नव्हती. मला ती श्री. महादेव गणेश बावडेकर, शनवार पेठ घर नं. १२, पुणें यांचे संग्रहांतून नुक्ती च मिळाली. त्यावरून पिंपरी गांवचा मूळ संपादक कृष्णाजी नाईक हा होय, हें निःसंशय ठरतें,

कृष्णाजी बिन केसोवा जोशी हा कोंकणस्थ ब्राह्मण. गोत्र शांडिल्य. यांचे घराण्याकडे केळशी येथील जोशी-वृत्ती परंपरया अद्यापि हि चालते. सातारकर जोशी घराण्याचा, व बावडेकर वगैरे घराण्यांचा उदय शाहूछत्रपतींचे कारकीर्दीत झाला. शाहूमहाराज सातान्यास येईपर्यंत त्यांचा खर्च नाईक मंडळींनीं पुरविला, व त्याबद्दल त्यांचे उतराई व्हावें म्हणून शाहूराजानें त्यांस मराठी राज्याची पोतदारी दिली, वगैरे कथा यांचे घराण्यांत ऐकूं येतात. परंतु असल पुरावा पुढें येईपर्यंत, त्या दंतकथांच्या सदरांत पडतात.

कृष्णाजी नाईकांचे वडील केसोवा नाईक. केसोवास तीन चिरंजीव होतेः—कृष्णाजी नाईक, सदाशिव नाईक, व अंतोबा नाईक. पैकीं अंतोबाचे शाखेची माहिती मिळत नाहीं. कृष्णाजी नाईकास नारायणराव ऊर्फ नानासाहेब ( दत्तक ), व विश्वनाथ ( औरस ) असे दोन पुत्र होते. विश्वनाथजी सातान्यास सावकारी करून राहत; व नानासाहेब हे भोंसल्यांच्या दरबारीं वकील असत. ते तिकडे च मृत्यू पावले. नानासाहेब यांचे चिरंजीव कृष्णराव ऊर्फ तात्यासाहेब हे श्रीमंत पेशवेसरकारांकडून हैदर व टिपू यांचे दरबारीं वकील होते. यांचा बरा च पत्रव्यवहार इतिहाससंग्रहांत छापून प्रसिद्ध झाला आहे. हे इ. स० १८२५ मध्यें सातान्यास वारले. यांचे दत्तकपुत्र केशवराव ऊर्फ नानासाहेब यांस १८७९ पर्यंत पोलिटिकल पेन्शन सुरू होतें. ते १८७९ त वारले. त्यांचे विद्यमान वंशज काका जोशी हे सातान्यास शनवारांत, कृष्णराव ऊर्फ तात्यासाहेब जोशी यांनीं शके १७०७ मध्यें बांधिलेल्या वाड्यांत, राहतात. कृष्णाजी नाईकांचे औरस चिरंजीव विश्वनाथजी यांचा वंश हि सातारा जिल्ह्यांत नांदत आहे. या दोन्ही शाखांकडे वांई प्रांतांतील कडेगांव हा गांव इनाम चालत आहे. रा. काका जोशी—सातारा, यांचे कांहीं कागद नुकते च सातान्यास पाहिले. त्यांवरून यांचे घराण्याकडे शनवार पेठे ( सातारा ) चा चौधरीपणाचा हक्क होता, एवढें बरीक आधारपूर्वक म्हणतां येतें. पोतदारी वगैरेंचे कागद अद्याप मिळाले नाहींत. ही कृष्णाजी नाईकाचे घराण्याची हकीकत होय.

केसोवा नाईकांचे दुसरे चिरंजीव सदाशिव नाईक. यांचे शाखेसंबंधीं बरी च माहिती अन्यत्र दिलेली आढळते. या सदाशिव नाईकास तीन मुलगे; गोविंदराव, महादबा ऊर्फ बापूराव, व आबूजी ऊर्फ आबाजी नाईक हे. गोविंदरावांचें घराणें सागरकर या नांवानें प्रसिद्ध असून, त्यांचा विद्यमान

पुरुष गजानन रघुनाथ हा बडोदे येथें राहतो. त्यांनीं आपले शाखेचा वंश-वृक्ष नुकता च मजकडे पाठविला. तो मंडळाचे संग्रहीं ठेविला आहे.

सदाशिव नाईकाचे बाकीच्या दोघा चिरंजिवांपैकीं आबूजी ऊर्फ आबाजी नाईक यांस श्रीमंत बाळाजी विश्वनाथ पेशवे यांनीं आपली कन्या भिऊबाई ही दिली. सदाशिव ऊर्फ बाबूजी नाईक हा कर्नाटकाचा सुभेदार व पेशव्यांचा प्रतिस्पर्धी म्हणून प्रसिद्ध आहे. बाबूजी नाईकांस पांडुरंग-राव व कृष्णराव असे दोन मुलगे होते. व आबाजी नाईकास नीळकंठराव नांवाचा मुलगा होता. पांडुरंग नाईक हे श्री. रघुनाथरावदादा पेशवे यांचे जांवई. बाबूजी नाईक व आबाजी नाईक यांचे निधनानंतर, कृष्णराव, पांडु-रंगराव व नीळकंठराव असे विभक्त झाले; व तेव्हांपासून च या त्रिवर्गांचे घराण्यांस बावडेकर, बारामतकर व मेडदकर अशीं नांवें मिळालीं, व तीं च चालू आहेत.

परशुरामभाऊ पटवर्धन यांची कन्या बयाबाई ही बाबूजी नाइकाचे मुलास दिली होती. जिचा पुनर्विवाह करण्याविषयीं परशुराम भाऊंनीं राम-शास्त्र्यांची संमति मिळविली, असें पुनर्विवाहवाद्यांकडून अट्टहासानें सांग-ण्यांत येतें, ती च ही बयाताई. हिचा जन्म इ. स. १७६१ त होऊन, सन १७६८ त तिचें लग्न झालें, व त्या च वर्षीं तिचा नवरा वारला, एवढ्या गोष्टी कागदपत्रांवरून सिद्ध आहेत. पुनर्विवाहासंबंधीच्या गोष्टीस कागदपत्रांतुन बिलकुल आधार नाहीं.

बावडेकर, बारामतकर व मेडदकर या तीन शाखांच्या उत्पत्तीसंबंधीं वर हकीकत आली च आहे. ही गोष्ट दुसरे रावबाजींचे कारकीर्दींत झाली.

कृष्णराव बावडेकर यांच्या रमाबाई व सगुणाबाई अशा दोन वि-धवा राहिल्या. त्यांस इ. स. १८१८ पर्यंत श्रीमंतांकडून कांहीं वेतन मिळत असे. पुढें इ. स. १८१९ त त्यांस 'पोलिटिकल पेन्शन' सुरू झालें. जून १८४० मध्यें रमाबाई वारली, पुढें सगुणाबाईस १८६३ चे जून महि-न्यांत देवाज्ञा होईपर्यंत तिचें हिश्शाचें पेन्शन मिळत असे. सगुणाबाईनें आपले मृत्युपूर्वीं मेडदकर घराण्यांपैकीं गणपतराव यांस दत्तक घेतलें. ते पुण्यास वकिली करीत. ते नुकते च वारले. त्यांचे पाठीमागें श्री. माधवराव वगैरे त्यांचीं मुलें असून, तीं शनवारांत आपले घरीं राहतात.

**पांडुरंगराव बारामतकर** यांस सदाशिवराव नांवाचा मुलगा होता. तो बाजीरावसाहेबांबरोबर ब्रह्मावर्तास गेला. त्यांचा मुलगा सिद्धेश्वर. हा बनारस येथें निपुत्रिक वारला. याचे मृत्यूनंतर बारामतकर घराणें नामशेष झालें.

निळकंठराव मेडदकर यास नारायणराव नांवाचा मुलगा होता. परशुरामभाऊ पटवर्धन यांच्या मुलीच्या मुलीशीं यांचें लग्न झालें. नारायणराव पुढें नागपुरास गेले. ते १८३२ त वारले. त्यांचे चिरंजीव रघुनाथराव यांस श्री. रावसाहेब जमखिंडीकर यांचा आश्रय असे. रघुनाथराव १८७० त वारले. यांस सदाशिव, गणपत व नारायण असे तीन मुलगे. पैकीं गणपतराव वर सांगितल्याप्रमाणें बावडेकरांकडे दत्तक गेले. सदाशिवराव यांचे चिरंजीव दत्तात्रय व चिंतामण हे विद्यमान आहेत.

सोबत राजशक ४७ मधील अस्सल सनद व या घराण्याचा मिळाला तेवढा वंशवेल दिला आहे.

बावडें व मेडद यांपैकीं बावडें गांव इंदापुरापासून ११ मैल असून, मेडद बारामती नजीक आहे. बारामती येथील बारामतकरांचा वाडा हल्लीं इंग्रजसरकारकडे असून, त्या वाड्यांत सरकारी कचेऱ्या आहेत. बारामतीचें सिद्धेश्वराचें देऊळ प्रेक्षणीय असून, तेथील नंदी सुबक आहे. हल्लीं बारामतीस बारामतीकर जोशांचें कांहीं एक उरलें नाहीं. बावडें व मेडद येथील वाड्यांपैकीं मेडदचा वाडा मोठा असून, बरा च शाबूत आहे.

जोशांचे कुलदैवत सिद्धेश्वर, कोठील तें समजत नाहीं. सिद्धेश्वर अमृतेश्वर वगैरे देवालयें या जोशांनीं बांधिल्याचा आढळ होतो. पुणें येथील अमृतेश्वराचें देवालय आबूजी नाईकांच्या पत्नी सौ. भिऊबाईसाहेब ( बाळाजी विश्वनाथ पेशवे यांची कन्या ) यांनीं बांधिलें. या अमृतेश्वरास त्यांनीं दिलेलें इनाम अद्यापि चालू आहे.

याप्रमाणें केसोवा नाईकाचे घराण्याची त्रुटित माहिती आहे. ती कृष्णाजी नाईकाचे राजशक ४७ ( ता. २२।१२।१७२० ) चे अस्सल सनदेचे प्रसंगानें येथें मुद्दाम नमूद करून ठेवीत आहे. हेतु हा कीं, या इतिहासप्रसिद्ध घराण्याची हकीकत एके ठिकाणीं मिळावी.

---

ले. १ श्री २२ डिसेंबर १७२०

5432

वर्धिष्णु

Inam

सामाज्य

× ×

वामनी शंभु

A

रसो मुद्राशिव

Commission

राजन

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४७ शार्वरी संवछरे पौष शुध पंचमी गुरुवासरे क्षत्रीयकुलावतंस राजश्री राजा शाहु छत्रपती स्वामी याणी

श्री
राजा शाहु नरप
ति हर्षनिधान बा
जीराव बल्लाळ
मुख्य प्रधा
न

श्री
श्री आई आदि पुरु
ष राजा शाहु छत्रप
ति स्वामिकृपानिधि त
स्य श्रीनिवास परशु
राम प्रतिनिधी

रा. कृष्णाजी नाईक बिन केसोवा नाईक उपनाम जोतिषी यांसी दिल्हे इनामपत्र ऐसा जे तुम्ही स्वामीसंनीध किले साताराचे मुकामी विनंति केली जे आपण स्वामीची शेवा निष्ठेने करीत असो आपणास एक गांव इनाम करून देऊन वंशपरंपरेनें चालविले पाहिजे म्हणून त्यावरून मनास आणून तुम्ही स्वामीची शेवा निष्ठेने करीत आहां तुमचे चालवणे स्वांमीस अवश्यक जाणोन स्वामी तुम्हावरी कृपाळु होऊन मौजे पिंपरी ताा हवेली, प्राा पुणें हा गांव पेशजीच्या मुकाशियाकडून दूर करून हाली कुलबाब कुलकानू देखील हली पटी व पेस्तरपटी जल तरु तृण पाषाण निधिनिक्षेप खेरीज इनामदार व हकदार तुम्हास व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरेने इनाम करून दिल्हा असे तरी तुम्ही मौजे मजकूर च :सीमापूर्वमर्यादेप्रमाणें आपले दुमाले करून घेऊन तुम्ही व तुमचे वशपरन इनाम अनभवून सुखरूप राहाणे लेखनालंकार

5432

रुजु सुरू सां॥
निविस मंत्री

तेरीख ३

रविलावल सुरु इहिदे अशरीन

वार सुद सुरू सुद . वार वार

---

ले.

## वंशावळ

१ केसोवा नाईक—१ कृष्णाजी नाईक, २ सदाशिव नाईक, ३ अंतोबा नाईक *
२

२ कृष्णाजी नाईक—१ विश्वनाथ, २ नारायणराव ऊर्फ नानासाहेब ( दत्तक )
३ ४

३ विश्वनाथ.. ................( कडेगांवांतील कांहीं हिसा या शाखेकडे असून, यांपैकीं नरहर दत्तात्रय जोशी वांईस शिक्षक आहेत. यांस विचारणा केली असतां, त्यांजकडून त्यांचे शाखेची माहिति, व वंशवेल न आल्यामुळें नाइलाज झाला. )

४ नारायणराव ऊर्फ नानासाहेब—कृष्णराव ( हे टिपू सुलतानचे दरबारीं पेशव्यांचे वकील होते )—केशवराव—१ शंकरराव २ बाबूराव ३ काशिनाथ
५

५ काशिनाथ—१ गणपतराव, २ कृष्णराव ऊर्फ काकाराव ( कृष्णराव
६
ऊर्फ काकाराव यांचे शाखेकडे कडेगांवचें उत्पन्न चालू आहे. कृष्णराव साताऱ्यास राहतात )

६ गणपतराव—नारायण

७ सदाशिवराव—१ महादबा ऊर्फ बाबूराव २ अबूजी नाईक ३ गोविंदराव
८ ११
१३

८ बाबूराव ऊर्फ बाबूजी नाईक बारामतीकर—१ कृष्णराव, २ पांडुरंगराव
९ १०

९ कृष्णराव बावडेकर—गणपतराव ( दत्तक )—१ माधव, २ केशव, ३ गोपाळ, ४ वासुदेव ( पुण्यास राहतात. )

१० पांडुरंगराव बारामतीकर—सदाशिवराव—सिद्धेश्वर*

११ अबूजी नाईक—नीळकंठराव ( मेडदकर )—नारायणराव—रघुनाथराव, १ सदाशिव, २ गणपत, ३ नारायण
१२

१२ सदाशिव—१ गंगाधर× २ गोविंद× ३ दत्तात्रय ४ चिंतामण

१३ गोविंदराव सागरकर—बाळाजी—रघुनाथराव—सदाशिव—रघुनाथ—सदाशिव—रघुनाथ—गजानन ( हे बडोद्यास असतात )

**पां. न. पटवर्धन.**

# शहाशरीफ

श्रीशिवछत्रपतीच्या बखरींतून शहाशरीफ नामक अवलियाचा उल्लेख आढळतो. राजे मालोजी यांस या च अवलियाच्या अनुग्रहानें मुलगे झाल्यामुळें, मालोजीनें, शहा शरीफनें नवस पुरविला म्हणून आपल्या पुत्रांचीं नांवें शहाजी व शरीफजी अशीं ठेविलीं. शहाशरीफचा हा दर्गा अहमदनगर नजीक भिंगारचे हद्दींत नगर किल्याशेजारीं असून, त्यास 'दायरे दर्गा' असें म्हणतात. या दरग्यास उत्पन्न चालू असून, दरग्याची वहिवाट शेख पीरजादे यांजकडे आहे. या दरग्याचा उरूस जमादिलाखरचे १७ वे तारखेस होत असतो.

सोबत एकंदर १० लेखांक जोडले आहेत; पैकीं ले० १।२ च्या सनदा रा. पां. न. पटवर्धन यांच्या संग्रहांतील आहेत. बाकीच्या लेखांकांपैकीं अनुक्रमांक ८।९।१० हे फार महत्वाचे आहेत. या कागदांवरून शहाशरीफ ही काल्पनिक व्यक्ति नव्हती, हें निर्विवाद होतें.

लाड महंमद व॥ सयदशरीफ
|
|
|
|
|
बुऱ्हाणमिया
|
बाबामिया ( मृ. फसली १२३३ )
|
वलीमिया
|
इमाममिया ( हयात १८५२ मध्यें )

ले.-१

२८ नोवेंबर १७१८ ( शके १६४० )

श्री नकल

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४५ विलंबी सवत्सरे मार्गशीर्ष बहुल द्वितीया भृगुवासरे क्षत्रियेकुलावतंस श्री राजा शाहु छत्रपती स्वामी याणी समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री बालाजी पंडित प्रधान यासि

आज्ञा केली ऐसी जे दरगाह हजरत शाहा शरीफ पीर मु॥ अहमदनगर यांस इनाम मौजे कोनोसी प॥ सेवगाऊ मौजे येकलारे प॥ सगमनेर हे दोन गाव इनाम दिल्हे आहेत तरी तुम्ही बिलाकुसुर पीराकडे चालवणे कोण्ही उपसर्ग देईल त्यास ताकीद करणें बहुत लिहिणें तरी सुज्ञ असा,

---

**लेखांक २**

श्री

नकल

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४५ विलबी सवत्सरे मार्गशीर्ष बहुल द्वितीया भृगुवासरे क्षत्रियेकुलावतंस श्रीराजा शाहु छत्रपती स्वामी याणी देशमुख व देशपांडे प॥ सगमेनर यांसि आज्ञा केली ऐसीजे मौजे येकलारे हा गांव हजरत शाहा शरीफ पीर याच्या दरगाहास इनाम दिल्हा आहे तरी तुम्ही मौजे मजकुरचा ऐवज बिलाकुसुर दरगाहाकडे पावता करणे लेखनालंकार

॰ श्री ॰
राजा शाहु छ
त्रपति हर्षनीधा
न बाळाजी वि
श्वनाथ प्रधान

॰ श्री ॰
श्री आई आदिपुरु
ष श्रीराजाशाहु छत्रप
ति स्वामिकृपानिधि त
स्य श्रीनिवास परशु
राम प्रतिनिधि

रुजु सुरु निवीस — सं॥ मंत्री

मर्या
देयंरा
जते

बार सुद — सुरुसुद — बार — बार

---

टीपः—( १ ) वरील प्रमाणें च मोर्तबशिक्यांसहित "सरदारानी पागा व शिलेदार यांसि" वरील इनाम गांवास कांहीं आजार न देणेंबदल ताकीद दिली असे. मिति सदर.

असें च आज्ञापत्र मोकदमानी मौजे येकलारे त॥ बेलापूर प॥ संगमनेर यांस छत्रपतीचें आहे कीं, मौजे मजकुरची सरदेशमुखी दरगाहमजकुरास इनाम दिली आहे–मिति पौष शुद्ध तृतीया मंदवासर शके ४५.

---

लेखांक ३

मार्गशीर्ष व॥ ११ शके १६६६ श्री नकल

मंगळवार १८ डिसेंबर १७४४

राजश्री खंडेराव बरगे गोसावी

यांसि

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य

स्ने॥ बालाजी बाजीराव प्रधान आसीर्वाद सु॥ खमस आर्बैन मया व अलफ दरगाहा शाहाशरीफ पीर आमदनगर यास मौजे येकलारे प॥ संगमनेर हा गाव मोगलाईतर्फेने इनाम आहे व स्वराज्यातर्फेने हि राजपत्रे सादर आहेत त्यास तुम्हाकडील येसाजी बरगा मौजे मजकुरास उपसर्ग देतो तरी त्यास ताकीद करून सुदामत गाव पीराकडे चालतो त्याप्रो चालो देणे तुम्ही मौजे मजकुरास उपसर्ग न देणे : ाणीजे छ २४ जिलकाद बहुत काय लिहिणें

---

लेखांक ४

मार्गशीर्ष शु॥ ११ शके १६४१ श्री नकल

डिसेंबर ११ इ. स. १७१९

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री अंताजी मल्हार गुमास्ते सर-देशमुख सा॥ संगमनेर वगैरे वर्तमान व भावी यास

सेवक चिमणाजी दामोदर राजाज्ञा नमस्कार सु॥ अशरीन मया अलफ शाहा शरीफ पीर मु॥ आमदानगर याच्या दरगाहास मोजे येकलारे प॥

मजकूर हुजरून राजश्री स्वामीनी कुलबाब कुलकानु इनाम दिल्हे तर मौजे मजकूरचे सरदेशमुखीचा ऐवज होईल तो पीरजादे याकडे पावल तुम्ही मौजे मजकुरास एकदर तगादा न लावणे प्रतिव्‍ ताजे सनदेचा उजूर न करणे छ ९ सफर आज्ञा प्रमाण

सुरुसुद

---

ले. ५

६ नोवेंबर १७२७ श्री नकल
शके १६४९

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५४ प्लवंग नाम सवत्सरे मार्गशीर्ष शुध चतुर्थी इंदुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी राजश्री सुभेदारानी व कारकुनानी सुभे लष्कर व कमावीसदारान व बाजे यांसि

श्री
राजा शंभु छ
त्रपति हर्षनिदान
रघुनाथसुत तिमा
जी पडीत मुख्य
प्रधान

श्री आइ आ
दि पुरुष श्री राजा
शिव छत्रपती स्वामि
रुपानिधि तस्य प
रशुराम त्र्यबक
प्रतिनिधि

अज्ञा केली असीजे मौजे यकलार परगणे संगमनेर हा गाव दरगाह हजरत शाहा शरीफ पीर मुकाम आमदानगर यासी इनाम आहे तेणेप्रा। स्वामी करार केले असे तरी तुम्ही मौजे मजकुरास मुजाहीम न होता कोणे विसी उपसर्ग न देणे ताकीद असे जाणीजे निदेश समक्ष

मर्यादेयं
विराजते

रुजुसुरनवीस

सुरुसुद बार

---

३ नोव्हेंबर १७२७ श्री नकल लें. ६
शके १६४९

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५४ प्लवंग नाम संवत्छरे मार्गशीर्ष सुध प्रतिपदा भृगुवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी मोकदमानी मौजे येकलारे ता। बेलापूर प्रा सगमनेर यासी आज्ञा केली ऐसी

०श्री
राजा शभु छ
त्रपति हर्षनिदान
रघुनाथसुत निमा
जी पंडीत मुख्य
प्रधान

श्री आई आ
दि पुरुषश्री राजा
शिव छत्रपती स्वामि
कृपानिधि नरय प
रघुराम त्र्यंबक
प्रतिनिधि

जे मौजे मजकुर दरगा हजरत शाहा शरीफ पीर मुकाम आमदानगर यास इनाम देखील सरदेशमुखी राजश्री शाहु राजे याणी दिल्हा आहे त्याप्रमाणें स्वामीनी इनाम सरदेश-मुखी देखील दिल्हा आहे तुह्मी यासी रुजु राहोन सरदेशमुखीचा ऐवज पीरजादे याकडे वसूल देणे या सनदेची तालीक लेहोन घेऊन असल सनद भोगवटियास पीरजादे याजवळी परतोन देणें निदेश समक्ष

मर्यादेयं
विराजते

रुजु सुरनवीस
सुरु सुद बार

---

लेखांक ७
श्री नकल

कपतान हनरि
पाटंजर साहब
बाहादर कलक
टर आमदानगर

इजत असार देवराव आपाजी का।दार ता। राहुरी व बेलापूर वगैरे सलम हू

अजतर्फ कपतान हनरी पाटंजर साहेब बहादूर कलकटर तालुके किले आहमदनगर सलाम आंकी बाबामियां व मदूमियां व महमूदामियां पीरजादे दरगा दायरा पीरहजरत शाहा शरीफ नजीक शहर मजकूर यांणी हुजूर येऊन जाहीर केले की मौजे चकलहरे ता॥ बेलापूर प॥ संगमनेर हा गांव स्वराज्य व मोगलाई दुतर्फा कुलबाब कुलकानु इनाम मर्तुजा निजामशाहा पादशाहा दखनी याणी पीर हजरत शाहाशरीफ यांजकडेस ऊर्दफूल चिराख रोशनाई फकीर फुकरा उरुस वगैरे याचे खर्चाचे बेगमीस करार करून देऊन फर्माना करून दिल्हा पुढे वालाशान शाहाजाहा पातशहा याणी चालत आल्याप्र॥ चालते करून सन १०८० हिजरी छ ९ जिल्हेज फर्माना करून दिल्हा तो हा कालपरियंत निर्वेध चालत आहे त्याप्र॥ साहेबी मेहरबां होऊन चालविले पाहिजे म्हणोन वालाशान शाहाजाहा यांचा फर्माना व राजा शाहू छत्रपती याचे पत्र शके ४५ विलंबी नाम संवत्छरे मार्गशीर्ष बहुल द्वितियेचे बाळाजी बाजीराव (?) पंतप्रधान यांस की मौजेमजकूर हा गांव पिराकडे बिलाकसूर चालवणे म्हणोन असल होते ते दाखविले त्याजवरून मनास आणिता मशारनिल्हे पीर-जादे मौजेमजकूर येथील ऐवज पिराकडेस ऊद फूल चिराख रोशनाई फकीर फुकरा उरूस वगैरेस खर्च करितात पातशाई देणे बहुत दिवस चालत आहे तो पिराकडेस चालवणे अवश्यक जाणोन हुकूम सादर केला असे तरी मौजेमजकूर हा गांव दरोबस्त दुतर्फा पीरहजरत शाहाशरीफ याजकडेस ऊद फूल चिराख रोशनाई वगैरेस मामूलपासून चालत आल्याप्र॥ साबकदस्तूर चालवणे या पत्राची प्रती घेऊन असल सनद पीरजादे याजवळ भोगवटीयास परतोन देणे रवाना तारीख २४ माहे आगष्ट सन १८१८ इसवी

सही इंग्रजी

बार

---

## लेखांक ८

तुगरा (फार्सीचा तर्जमा मराठींत)

फर्मान आबदुल मुजफर
मोहीयत दीन महंमद औरंग
ज्येब आलमगीर बादशाहे
गाजी यांचे हुकमावरून
दिल्हेला निशाण आलिशानपात
शाहाज्यादा महंमद मो आजम

महंमद मोआजम
बीन आलमगीर
बादशाहे गाजी
सन १०७३

ह्या दिवसात दर्गा व फर्जदांन सैद शरीफ साहेब याचे बाबतीत पाठीवर लिहिले तपसीलबरहुकुम हुजुरास अर्ज पावला त्याजवरून बादशाहा यांचा हुकूम सादर जाला की मौजे येकलाहारे दरोबस्त आमले प॥ संगमनेर कबज्यात व वहिवाटीस असले वरून व खिजमत दर्गामजकूरची पूर्वील दस्तुरप्रो पाठीवर लिहिल्याप्रो यांस बाहाल व कायम केला असे की उत्पन्न तेथील निर्वाहास खर्च करून दर्गाची खिजमत करीत जाणे यास्तव पाहिजे की मुतसद्दी लोक काम करणार हालचे व पुढे होतील ते तेथील याणी उत्पन्न मौजेमजकूरच खर्चास यास देणे व चालवणे व मुकरर करणेविसी या हुकुमास मान्य करून कोणत्या हि तऱ्हेने तगीर व बादल यास न करून सर्व हारकती दिवाणी व बादशाही कामाव॥ कतलगा व नजराणा व जरीबाना व महसीना व जाबताना व मोहोराना व दारोगाना व बेगार व सिकार व मोकदमी व कानुनगोइ व तक्रार जिराइती व हरसाल जप्त करणे बदल माफ जाणून दरसाल नवीन सनद व परवाना तलब न करणे व हासील न घेण्याबदल यास मुजाहीम न होणे व जर या सिवाय दुसरे माहाली काही असल्यास त्याचा इतबार न करणे या बाबतीत ताकीद जाणावी त॥ १६ माहे साबान सन १४

मुकरर शेरा पाठीवरील यादीप्रो जालेला त॥ ११ रोज शुक्रवार माहे जा॥खर सन १४ जुलुस मुताबीक सन १०८२ हिजरी ऐसा जे रिसाल्यात सजाबार इनायत व आतिफत शायस्ता लितर्फ बल मरहामत हाजीयासीन सदर व वाक्यानवीस कंम तरी न बददांहा गुलाम महंमद यांची कलमी होतो की त॥ २८ माहे जाावल सनमजकूर दर्गा व फर्जदान मगफीरत पन्हा सैद शरीफ यांचे बाबतीत अर्ज पावला की फर्मान हाजरत यांचा करार जालेला त॥ ७ माहे शहर युरइलाही सन ९ बरहुकूम दोन मौजे दरोबस्त त्यातून मौजे कोनवर्सी आपलेप्रो शेवगाव व मौजे येकलाहारे आपलेप्र॥ संगमनेर सैद शरीफ साहेब यांस व यांचे कुटुंबाचे नावे मुकरर होते ते मैत जाल्यानंतर फर्मान कजाजीर यान पूर्वील जुलुसचा करार जालेला त॥ १७ माहे जा॥खर सन १२ बरहुकुम मौजे येकलाहारे बनाम दर्गा व फर्जदान की आपल्या बहिणीचा मुलगा घेऊन त्याला आपला चिरंजीव म्हणत होते त्यास पूर्वील दस्तुरप्रो यांस तनखा जाला त्याबरहुकुम सनद मोहोरेनिसी इसलामखान यांचा करार जालेला ता। १७ माहे जिल्हेज सन ७ व सनद मोहोरेनिसी उमदतुल मुलुक आमीरुल उमराव यांचा करार जालेला ता। २७ माहे राखर सन १०५९ ची व सनद मोहोरेनिसी सरकारचे मुतसदी लोक यांचा मिळून हजरी यांचे यादीप्रो मोहोरेनिसी आबदूस सलांम मुतवली यांचा जिवंत व कायम व कबज्यांत व वहिवाटीस आहेत म्हणोन दरीविला अर्ज करितो की निशाण आलिशान मरहामत

व्हावा त्याजवरून हुकुम बादशहा यांचा सादर जाला की मौजेमजकूर कबज्यात व वहिवाटीस असल्यावरून पूर्वील दस्तुरप्रो मरहामत केला असे यास्तव पाहिजे की मुतसद्दी लोक काम करणार हालचे व पुढे होतील ते माहालमजकूरचे याणी उत्पन्न मौजेमजकूरचे जिवंत व कायम व खिजमत दर्गाची करीत असल्यावरून कदीम माहालातील पूर्वील दस्तुरप्रो यांस देणे व त्याचे हासिलाबदल मुजाहीम न होणे की उत्पन्न तेथील निर्वाहास खर्च करून असिर्वाद हामेषा दौलतीस देण्याची काळजी करीत जातील व दुसरे माहाली यासिवाय काही उत्पन्न असल्यास त्याचा इतबार न करणे व फर्दविरील हाकीकत खरी लिहिली आहे व त्याजवरहुकुम खरी यादी लिहिली आहे शेरा खताने साहेब रिसाला यांचा ऐसा जे दाखल वाक्यात करावा शेरा खताने वाकेनवीस यांचा ऐसा जे वाकेप्रो आहे शेरा खताने विजारतपन्हा मदारुलमोहामी यांचा ऐसा जे दुबार अर्ज पोचवावा शेरा खताने अर्जाचा दुबार ऐसा जे ता।। २७ माहे जा।।खर सन १०८२ हिजरी मुताबीक सन १४ जुलुस यात दुबार अर्ज पावला शेरा दुसरा खताने विजारतपन्हा किफायत दस्तगाहा लायकुल इनायत वल यहेसान काबुली तर्फे वल इमतीनांन मदारुल मोहामी शफीखान याचा ऐसा जे निशाण आलिशान कलमी रखाम ( ला ? )

दोन मौजे दरोबस्त

येक मौजे कोनवसी आमले पा। शेवगाव

येक मौजे येकलाहारे दरोबस्त पूर्वील दस्तुरप्रो

रिसाल्यात सजावार इनायत व आतिफत शायस्तालीतर्फे व मरहामत हाजीया सीन सदर यांचा

ता।। ९ माहे जिल्काद सन १०१५ जुलुस नकल सदरचे दफ्तरांत पोचली

+ + +

म

+ + + + नकल दिवाणाचे दफ्तरात पोचली

द

निशाणवाला शान कलमी जाला

यादीप्रो कलमी जाला

ता + + + + माहे जिल्काद सन + + + +
दाखल साह्यात हुजुरचे केला आहे

+ + +

ता १८ माहे जिल्काद यात मोहोर केली असे

ता ९ माहे जिल्काद
सन १५
स

+ + +

ता २६ माहे रमजान सन १५ जुलुस

म

---

लेखांक ९

फार्सीचा तर्जमा मराठींत

हे आयात म्हणजे श्लोक पुरातीन त्याचा
सिका असे.

> हे सर्व लोक हो आपण
> सर्व गरीब लोक व जीव जंतु
> याचे सर्वांचे पालन करणार
> श्रीमंत निरंकार हे आहेत सर्वास
> अनपाणी वगैरे देणार
> आम्ही आहो

ह्या समई फर्मान वालाशान सादर जाला की दोन चाहूर जमीन पडित पो कडेवळित सरकार आहमदनगर सुभे खुजरत्तेबुनीयाद पो निर्वाहानाा आबदूल रसूल मुतवली वाा जैनु आवेदींन याच्या किहाभाचा वतमालियत करणार दर्गा गुफरान पन्हा सैद शरीफ यांचा व दर्गामजकूर पो हवेली

मजकूर येथील आहे व सिवाय दोन मौजे दर्गाचे खर्चाकरितां मुकरर आहे तर बाफर्जंदान पाठीवर लिहिल्यावरहुकुम मुकरर व्हावा की उत्पन्न तेथील निर्वाहास खर्च करून असिर्वाद हमेषा दौलतीस देण्याची काळजी करीत जातील यास्तव पाहिजे की हाकीम व आमलदार व जाहगीरदार व करोडी हालचे व पुढे होतील ते याणी जमीन वर लिहिलेली मोजून व चक बाधून वहिवाटीस यांस देणे व कोणत्या हि तऱ्हेने तगीर व बादल न करणे व सायर बाबती व खर्चापाौ कनलगा व नजराणा व जरीबना व आवताना व मोहोराना व दारोगाना व बेगार व सिकार व मोकदमी व कानुनगोई बाा व जप्त करणे हरसाल चकनामा पाहिल्यानंतर व तक्रार जिराइयी बदल व सर्व प्रकारे हरकती बादशाई व दिवाणी कामाबदल मुजाहींम न होणे व या बाबतीत दरसाल नवीन सनदेची तलब न करणे व जर दुसरे माहाली काही इनाम असल्यास त्याचा इतबार न करणे ताा ९ माहे जाोवल सन ३ जुलुसवाला यांत लिहिला असे.

शेरा जालेले यादीचा ताा ३ रोज शुक्रवार माहे रमजान सन ५१ जुलुसवाला मुताबीक सन १११८ हिजरी माफीक १८ अजूर माहे इलाहीचीरी साल यात सियाखत व नज्याबत पन्हा सुज्याआत व शाहामत सजावार इनायत पातशाइ काबीळील मरहमत जिले इलाही सदर रफीउल कदर महंमद आमीन बाहादूर याची व नौबत वाक्या निंगार बंदे दर्गा ख्वाज्या आवदुला याचे कलमी होतात की बादशाहा याचा हुकूम सादर जाला की दोन चावर जमीन पाौ कडेवळित सरकार आहंमदनगर सुभे खुजस्तेबुनियाद पाौ निर्वाहाकरिता आवदूल रसूल मुनवली वाा जैनुल आवेदींन किहाभाचा व तमलियत करणार दर्गा गुफरान पन्हा सैद शरीफ याचा की दर्गा मजकूर पाौ हवेली मजकूर येथील आहे व सिवाय दोन मौजे दर्गाचे खर्चाकरिता मुकरर आहेत तर माारनिल्हे यांचे नावे बाफर्जंदान मरहामत केला असे जर दुसरे माहाली काही इनाम असल्यास त्याचा इतबार न करणे ताा २ माहे जाोवल सन ५ खरे यादीप्रमाणे कलमी जाला शेरा दस्तखताने सियादत पन्हा खानाजाद लायकुल मरहामत व ल्येहसाल मतलबखान यांचा व हेनायब सियादत व नकाबत पन्हा शराफत व नज्याबत दस्तगाहा मोते मनुत दौलतुल आलि या मोतमेदुस सलतनत इलाही या उमद्ये फिदवीयान सुज्या आत निशान ज्युबदेन व इनान रफीउशान ताजींम मनाजींम मुलकुमालवाहेज मनाहेज दौलत व येकबाल आ आजींम उजतजमदेउलमुलुक मदारुल मोहाम आमिरुल उमराव यांचा जौसा जे दाखल वाक्यातकतम शेरा दस्तखताने सियादत व नज्याबत पन्हा सुज्याआत शाहामत दस्तगाहा सजावार इनायत पातशाही काबीळे मरहामत जिले इलाही सदर रफीउल कदर महंमद आमीनखा बाहादूर यांचा ऐसा जे दाखल वाक्यात कराम शेरा दस्तखताने वाके-

नवीस यांचा ऐसा जे वाकेप्रो आहे शेरा दस्तखताने उलीहे आ आजींम उजराजमदेतुलमुलुक मदारुलमोहांम आमिरुल उमराव यांचा ऐसा जे हुजार अर्जास पोचविला शेरा दस्तखताने फजीलत पन्हा कावुलीलयेहेसान फाजल-खान यांचा ऐसा जे ता। १५ माहे जिल्काद सन ५१ जुलुसवाला यांत अर्ज पावला शेरा दस्तखताने आकारत व आयालत पन्हा रिसाल्यात व शाहामत दस्तगाहा उमद्ये फिदवीयान मुखलीसखान वायेतकादमे जुरं नजर पातशाही मौरदें आलताफनामत नाही मावते आताफ वेकिरान खाना मादसूज्याआत निशान सामसा मुददौला नाफीयुलमुलुक बक्षी युलमुमालिक आमिरुल उम-राव वाहादूर नुसरतजंग सिपा सरदार नायेव यकतिजाद खिलाफत व फर्मा रवाये येतिमात सलतनत व किशवर कुशाये मुमाहिदे कवाइदे मादिलत मोआजम उमौरे खिलाफतउकद कुशायेमो आकीददी दौलत सिपे आराये माआरी केफत हो नसरत गुजुर इसरार पातशाही दानाय जमीर जिले इलाही आर्जीम पैराये मय फिलखलीफये मयमनतहु सदे दानष वमलाई साहेब इलाही आलंम आराये दस्तुर उजराममालिके मदार वुन्हान व कुलाले जलिल येलातीदार साहेब शौकत व आजमत व लयेलातीदार हतेशाम व आजवुलईजे व शरीफ व लयेहेतीरांम किदवे खवानीन वुलदे मकान उमदये उजराय अजीमुशान रुकनुस सलतनतुल आलिया निजाम मुलमुलुक अस-फदौला यांचा ऐसा जे फर्मान आलिशान कलमी जाला

खालीं लिहिलेला फर्मान वरहुकुम दर्गामजकूरचे खर्चाकरितां दोन मौजे मुकरर दरोवस्त आहेत

फर्मान आलिशान लिहिलेला ता। १८ माहे शहरयुर सन ९ वरहुकुम येक मौजा कोनसी आमले पा। शेवगाव सरकार आहंमदनगर व मौजे येक-लाहारे आमले पा। हवेली सरकार संगमनेर सुभे मजकूर मुकरर दरीविला मरहामत जाला.

अर्जाची याद हुजुरास गुजराविली की फर्मान पूर्वील जुलुसचा वरहुकुम दोन मौजे सर्व उत्पन्न रुपये ७३५ दर्गामजकूरचे खर्चाकरितां पूर्वापासून मुकरर आहेत की असीर्वाद करणार फार उमेदवार आहे कीं दोन मौजे सिवाय येक मौजा मरहामत व्हावा दस्तखताने खास मुजयंन होऊन मारानिल्हे याचे नावे वाफर्जदान दोन चाहूर

दोन चावर जमीन पडित जमा

खेरीज लायक जिराइत

रिसाल्यात सियादत व नज्यावत पन्हा सुज्या आत व शाहामत दस्त-गाहासजावा इनायत पादशाही काविले मरहामत जिले इलाही सद्र रफी-उलकदर महंमद आमीनखान वाहादूर व नौबत वाक्यानवीस ख्वाज्या आ-बदुला याचा

ता १८ माहे रजब सन ३ जुलुस माफीक सन ११२१ हिजरी मुताबीक १७ तिरमाहे इलाही नकल साह्यात तवजुचे दफ्तरात शाहा महंमद याचे मार्फतीनें पोचली

२५ जिलकाद सन ५१

ता ११ माहे रोवल सन ३ जुलसवाला नकल दफ्तरात इस्तिफा व आवुवाबलमानचे शाहामहंमद याचे मार्फतीने पोचली
ता ३ माहे जिलकाद सन ३ नकल वकीलाचे दफ्तरात पोचली

द

ता १६ माहे रमजान सन ३ जुलुस नकल तवजूचे दफ्तरात शाहा महंमद याचे मार्फतीनें पोचली

ता १६ माहे रमजान सन ३ जुलसवाला माफीक सन ११२१ हिजरी नकल ऐमाचे दफ्तरात शाहा महंमद यांचे मार्फतीने पोचली

वाक्यानिशी मोकाबीक केला आहे

दाखल रोजनाम्यास जाला ता ३ माहे रमजान सन ५१

ता २९ जाखर सन ३ शाहा महंमद याचे मार्फतीने इंतिखाबाद दाखल जाला

असफददौला
बंदा शाहे आलम
बादशाह गाजी

द

मोअजमखान
खानाजफरजंग बहादूर
वफादार फिदवी शाहे
आलमबादशाहेगाजी
सन ११२०

ता १६ माहे रमजान सन ३ यांत
मोहोर केली असे

सैद आमजदखान
सर ज्याहानफीदवी
शाहे आलम बादशाहे
गाजी

ता माहे
जिलकाद
सन ३ यात
मोहोर के-
ली

द

ता ९ माहे साबान सन ३
यात मोहोर केली असे

आमरसिंग बीन
राज्यां रघुनाथ बंदा
शाहे आलंम बा द-
शाहे

ता। १८ माहे रजब सन ३
लिहिला असे

म

ता। ११ माहे रमजान सन ३
यात इतला जाला

---

लेखांक १०

( फार्सीचा तर्जमा मराठींत )

जिल्हे सुभानी साहेब

किराने सानी

फर्मान आलिशान क(ला?) जाजिरयान हजरत यांचा करार जालेला तारिख १७ माहे शहरयुर इलाही सन ९ बरहुकुम दोन मौजे प॥ शेवगाव वगैरे सरकार अहंमदनगर सुभे दक्षण येथील निर्वाहाकरितां व खर्चाकरितां दर्गा सैद शरीफ साहेब राहणार आहंमदनगर येथील यांस व यांचे मुलेलेकरे यांस मुकरर होते म्हणोन दरीविला ता। १२ माहे जिलहेज सन १४ यांत हकीकत नवाबखा(?)मुस्तताब(?) मौला आलकान ममालिक मदार गर्दिन इ का(ला?)-तेदार खुरसींद इस्तीहार याचे हुजूरास पोचली, त्याजवरून हुकुम

++++
आबदुस सलाना
इसलामखान

इबने +++ साजेनआज
सिदिक शुद्दर बंदगी
शाहेज्याहा

जेलीतर्फे
शाहेजाहा ++
++++

दिल्हा की बाहाल ठेवावे यास्तवं पाहिजे की मुत्सद्दी लोक काम करणार वर्तमान व भावी माहाल मजकूरचे याणी मौजेमजकूर पाठीवर लिहि-

त्याप्रमाणे (+++ +++) कदीम माहालातील पूर्वील ।। दस्तुर प्रो। वहिवाटीस मा।रानिल्हे याचे देणे कीं दर्गामजकूरास पूर्ववत प्रो खर्च करून व मुलेलेकरे सैदशरीफ साहेब यांची याणी तसीच खिजमत करून आसिर्वाद हमेषा दौलतीस दररोज बंदगाने हजरत सुलेमान मकानी खलिफी तुर रहीमानी यास देण्याची काळजी करीत जातील या बाबतीत ताकीद जाणून लबाडी न करणे ता। १७ माहे जिल्हेज सन ९++++

मुकरर शेरा पाठीवरील यादीप्रमाणे मोहोरेनिसी सदारतपन्हा निजामुदीन आहंमद यांचा ऐसा जे निर्वाहाकरिता दर्गासैद शरीफ साहेब राहाणार आहंमदनगर यांस वगैरे यांचे फर्जदानास फर्मान आलिशान कजाजीरयान हजरत यांचा करार जालेला ता। १७ माहे शहरयुर इलाही सन ९ बरहुकुम मौजे दोन दरोबस्त पा। शेवगाव वगैरे सरकार आहंमदनगर सुभे दक्षण येथील मुकरर आहे म्हणोन दरीविला ता। १२ माहे जिल्हेज सन १९ ची हाकीकत नवाब मुस्तताब मौला आलकाबममाली मदार गर्दुन ईलातेदार खुरसीद इस्तीहार यांचे हुजुरास अर्ज पोचल्यावरून हुकूम दिल्हा की बाहाल ठेवावे यास्तव पाहिजे की मुतसदी लोक काम करणार हालचे व पुढे होतील ते याणी माहालमजकुरात मौजेमजकूर कदीम माहालातील पूर्वील दस्तूरप्रो वहिवाटीस मारानिल्हे यांस देणे

शेरा दस्तखताने नवाब मुस्तताब मौला आलकाबममालिक मदार गर्दून इलातेदार खुरसीद इस्तीहार यांचा ऐसाजे बाहाल ठेवावे

शेरा दस्तखताने बिजारतपन्हा मदारुल माहा मिदयानंत खांन यांचा ऐसा जे परवाना कलमी व्हावा

दोन मौजे दरोबस्त

| देहे | देहे |
|---|---|
| कोनसी पा। शेवगाव सरकार<br>आहंमदनगर सुभे दक्षण<br>येथील येक मौजा दराबस्त | मौजे येकलाहारे पा। संगमनेर<br>सरकार दौलताबाद सुभे दक्षण<br>येथील येक मौजा दरोबस्त |

ता। १९ माहे जिल्हेज सन १९ नकल इस्तिफाचे दफ्तरात पोचली
१८ ता। लिहिले असे ———— १७ माहे जिल्हेज सन १९ जुलुस

१९ माहे जिल्हेज यात इतल्ला जाला

खं. चिं. मेहेंदळे

भा. इ.–२५

# सातारा येथील श्रीकृष्णेश्वर

वरील नांवाचें शिवालय सातारा शहराचे पश्चिम टोकास म्हणजे युवतेश्वर टेंकडीचे पायथ्याजवळ आहे. या शिवालयांतील गाभाऱ्यापुढें असलेल्या तीन खणी दगडी इमारतींत एका खांबावर एक चौरस फूट लांबीरुंदीचा शिलालेख आहे. त्याचा तरजुमा खालीं दिल्याप्रमाणें बरोबर आहे.

श्रीकृष्णेश्वरनामकं पशुप
तेर्लिंगं शिवं नार्मदं ज्योति
र्वित्कुलदीप कृष्णजम
हा देवेन संस्थापितं ॥ स
श्रीशाहुनृपात्सदाशिव
इति प्राप्याभिधानं नवं
लिंगाग्रां कृतवान् सदाशि
व पुरी मित्यूचिवान्चास्क
रः ॥ शके १६४५ शोभकृत संवे
त्सरे माघ शुध त्रयोदसी सोमः ॥
कृष्णाजी जनार्दन पंत

वरील शिलालेखापैकीं शेवटची ओळ निराळ्या वळणाची आहे. यावरून ती माघाहून कोरली असावी असें वाटतें. या नव्या ओळीवरून कृष्णाजीच्या बापाचें नांव जनार्दन पंत होतें असें दिसतें. पहिले बाजीराव यांची पत्नी काशीबाई इचे बंधूचें नांव कृष्णराव जोशी चासकर असें होतें. त्या च कृष्णरावाचा मुलगा महादेव यानें हें देवालय बांधून त्यास कृष्णेश्वर असें नांव दिलें. रा० ब० पारसनीस यांनीं मासिक मनोरंजनाच्या (फे०१९१०) अंकांत कृष्णरावाच्या बापाचें नांव महादेव असें दिलें आहे. कृष्णराव हे शाहूचे कारकीर्दींत सातारा येथें मामलेदार असून ते इ०स०१७५४ सालीं वारले. अशी माहिती रा० शंकरराव हतवळणेकृत सातारा वर्णनावरून मिळते. शिलालेखांत “ कृष्णज महादेवेन संस्थापितं ” असें म्हटलें होतें. शिवालयाची स्थापना ‘ सदाशिवपूरींत ’ केली असें शिलालेखांत म्हटलें आहे. यावरून त्या कालीं ज्या भागांत ‘ श्रीकृष्णेश्वरा ’ चें देवालय आहे त्या भागास सदाशिवपूरी हें नांव होतें असें दिसतें. परंतु हल्लीं तो भाग ‘ व्यंकटपुरा ’ या भागांत मोडतो. शिवालय बांधिलें त्या सालीं सातारा येथें ‘ व्यंकटपुरा ’ ही पेठ नव्हती. शके १६५२ ( इ० स० १७३० ) सालीं कोल्हापूरचे संभाजी महाराज व शाहु छत्रपती यांचे दरम्यान वारणेची लढाई झाली. त्या लढाईंत व्यंकटराव नारायण जोशी—घोरपडे इचलकरंजीकर

हे पाडाव होऊन साताऱ्यास आले. परंतु ते बाळाजी विश्वनाथ यांचे जामात असल्यामुळे शाहूनें त्यांना साताऱ्यास ठेऊन घेऊन त्यांचा इतमाम वाढविला व त्यांना वाडा बांधून दिला* ज्या भागांत त्यांचा वाडा बांधिला त्या भागास तेव्हांपासून व्यंकटपुरा हें नांव मिळालें. कांहीं कालपर्यंत व्यंकटपुरा व सदाशिवपुरी हे स्वतंत्र भाग असून एकाचा दुसऱ्यांत समावेश झाला असावा.

सातारा शहरांतील सर्व अक्षती हल्लींप्रमाणें माचीच्या ढोल्या गणपतीस+ न जातां श्रीकृष्णेश्वरास जात असत. प्रतापसिंह महाराज यांचे सर सुभेदार रामचंद्र गंगाधर उर्फ दाजीबा दादा जोशी यांचे मुलाचें लग्न सातारा येथें शके १७४६ सालीं झालें. त्या लग्नाचे ताळेबंदांत माचीच्या ढोल्या गणपतीचा उल्लेख नसून लग्नाची अक्षत मंगळवारांतील गणपतीस* ( घिसाड्याचे पाराजवळील ) व श्रीकृष्णेश्वरास गेल्याचा उल्लेख आहे. हल्लीं एका व्यंकटपुरा भागांतील च अक्षती कृष्णेश्वरास जातात.

वा. वि. जोशी

---

## सातारा येथील बाजीराव पेठ

सातारा शहरांत सात हि वारांच्या नांवाच्या पेठा असून त्यांपैकीं एक 'शुक्रवार पेठ' व 'बाजीरावाची पेठ' अशा दोन हि नांवांनीं, विशेषत: दुसऱ्या नांवानें फार प्रसिद्ध आहे. या पेठेंत 'जलमंदिरा' चे पिछाडीस एक फार मोठी व दगडी बांधीव विहीर असून तिला 'बाजिरावाची विहीर' असें म्हणतात. इतिहासांत बाजीराव या नांवाच्या दोन व्यक्ति प्रसिद्ध असल्यामुळें सदर पेठेस मिळालेलें नांव पहिल्या बाजीरावाचे नांवावरून मिळालें किंवा दुसऱ्या बाजीरावाचे नांवावरून मिळालें हा प्रश्न आहे. सातारा

---

* व्यंकटपुऱ्यांत बापुसाहेब अभ्यंकर यांचें गणपतीचें देवालय आहे, त्या देवालयाजवळ हा वाडा होता अशी माहिती मिळते.

+ अष्ट प्रधानांतील मंत्री यांनीं या गणपतीची आराधना केली व त्यांचा या गणपतीजवळ फार मोठा वाडा होता अशी माहिती मिळते. हा वाडा कांहीं कालपर्यंत दिवाण असलेल्या पराडकरांचा होता, तो भिडे यांना सावकारींत मिळाला. पराडकर व भिडे हीं घराणीं सातारा येथून नष्ट झालीं आहेत. आतां या वाड्याचे मालक कात्रे आहेत.

* सुमारें पन्नास वर्षांपूर्वी या गणपतीस पराडकरांचा गणपती असें म्हणत असत.

शहरांतील एका वाण्याचे दुकानांत असलेली रद्दी चाळून पहात असतां एक अमाखर्ची बंद मला मिळाला; त्यांत खालील उल्लेख आहे.

२८५॥।=। पहिले बंदावरील रूा ईा शके १७०२ मार्गेश्वर सुध त्रीतीया ताा शके १७०३ आश्विन वद्य नवमी गुरूवार येकून एकंदर रुपये

२ मार्गस्वर शुद्ध दशमी रविवार सातारा रहिमतपुरे वस्ती पेठ बाजीरायाची खरीदी उडीदसबब दिले ते हस्ते काशीबा

वरील उल्लेख शके १७०३ सालचा असून त्या वेळीं दुसरे बाजीरावाचें वय केवळ सात वर्षांचें होतें. व राघोबादादा आणि आनंदीबाई हे कुटिल-नीतीनिपुणद्वय चौऱ्यायशीच्या फेऱ्यानें पुरें ग्रासलेलें होतें. अशा वेळीं दुसरे बाजीरावाचे नांवानें सातारा येथें किंवा इतर कोठें हि पेठ वसली जाणें शक्य नव्हतें. परंतु पेशवाई कालांत पेशव्यांचा मुकाम ज्या वाड्यांत होत असे त्या 'पेशव्यांच्या वाड्यां' त पूर्वी छत्रपति रहात असून शाहू महा-राजांनीं रंगमहाल वाडा बांधिल्यावर हा जुना वाडा ( अदालत ) पेशव्यांचे दिमतीस दिला असावा. व ही इमारत पहिले बाजीरावचे ताब्यांत येण्या-पूर्वी ज्या ठिकाणीं त्यांचें वास्तव्य होत असे त्या ठिकाणास 'बाजीराव पेठ' हें नांव मिळालें असावें.

वा. वि. जोशी

---

## ऐनेकर गोळ्यांची सनद

सोबतचे सनदेचा फोटो रा. श्रीधर महादेव ऊर्फ बाबुराव गोरे पुणे दि॥ शास्त्री पटवर्धन पुणें यांचे मार्फत मिळाला. गोविंदराव गायकवाड यांस राजकारणा-च्या पेंचामुळें पंचवीस वर्षें दौलत हस्तगत झाली नाहीं. तेव्हां दौलत हस्तगत होईल तो दिवस व त्यासंबंधानें नक्की भविष्य चिंतो महादेव गोळे यांनीं एक वर्ष अगोदर वर्तविलें होतें. त्याप्रमाणें तंतोतंत घडून आल्यावरून 'आयना' हा पांच हजारांचा गांव चिंतो महादेव यांस गोविंदराव गायकवाड यांनीं बक्षीस दिला. तो अद्याप या घराण्याकडे चालू आहे. ज्योतिषावर कोणाचा विश्वास असो वा नसो, चिंतो महादेव यांनीं वर्तविल्याप्रमाणें, गोविंदराव गायकवाड यांस शके १७१४, मार्गशीर्ष वद्य ८ मीस अधि-काराचीं वस्त्रें मिळालीं, हें अवांतर पुराव्यावरून हि सिद्ध आहे. ज्योतिष-विषयक एक सनद या दृष्टीनें हिचा संग्रह केला आहे.

श्री म्हाळसाकांत

शके १७१५, मार्गशीर्ष शु० १ अस्सल–मोडी

वेदशास्त्रसंपन्न चिंतो महादेव उपनाम गोळे गोत्र भारद्वाज सूत्र आश्व-लायन माहाजन मौजे वेळदूर तरफ गुहागर तालुके आंज्यनवेल सुभा दाभोळ प्रांत राजापूर स्वामीचे सेवेसी

ॐ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य सेवक गोविंदराव गायकवाड सेना खासखेल समशेर बाहादर दंडवत विनंति ऐसी जे तुम्ही जोतिषी सिध्धांतवाले सतपात्र थोर अैशास आम्हास बडोदे सोडून पंचवीस वर्षे जाहाली पुन्हा बडोद्यास जाणे होऊन दौलत हस्तगत होत नाही त्यास आमचे दौलतीचा पूर्ववत बंदोबस्त होऊन बडोद्यास जाणे कधी होईल ए-विसीचे भविष्य वर्तऊन आम्हास लिहून द्यावे लिहिल्याप्रमाणे आमचे आनु-भवास आले म्हणजे पाच हजार रुपयाचा गाव धर्मार्थ कृष्णार्पण करून आपणास द्यावयाचा करार केला त्याजवरून आपण शास्त्रविचारे करून तुम्ही आपले निजदैवत प्रसादे आम्हास आसीर्वाद दिल्हा जे तुमची दौलत तुम्हास स्वल्प कालीच पूर्ववत प्राप्त होईल याचे नेमोतराचा प्रतिज्ञापूर्वक प्रासादिक लाखोटा एक वर्ष पूर्वीच आम्हास लिहून दिल्हा होता की शके १७१४ परिधावी संवछरे मार्गसीर्ष वद्य आस्टमी शुक्रवारी प्रथम प्रहरी धनलग्नी च्यार घटिका नंतर तुम्हास सरकारात पुण्याचे मुकामी बोलाऊन काही द्रव्य व मुलुक तुम्हापासून सरकारात घ्यावयाचा करार करून तुमचे अधिकाराची वस्त्रे तुम्हास देतील व बहुमानार्थ सिरपेच तीन त्याची माणके पंचेतालीस व हिरे चवदा त्यात थोर तीन व लाहाण आकारा व मोत्याचा तुरा एक त्याची मोते सुमारी च्यारसे शाहानव व हत्ती एक व निळा घोडा एक एणेप्रमाणे तेच समई देऊन बडोद्यास जावयाची आज्ञा होईल तदनंतर आकरा माहिणे पुणि-याचे मुकामी राहाणे होऊन त्यात आतीसंकटे आठ महिने प्राप्त होतील तदोतर सर्व संकटे निवारण होऊन सरकारात मुलुक काही घ्यावयाचा करार केला आसेल तो माघारा पुन्हा तुम्हास देऊन तुमचे जाणे बडोद्यास माघ मासी आविलंबे होईल ऐसे तुम्ही पूर्वी लिहून दिल्हे त्याप्रमाणेच सर्व भविष्ये घडोन आनुभवास आली त्याजवरून विचार पाहाता तुम्हावर ईश्वरी कृपा पूर्ण तेणेकरून तुम्हास देवता साक्षातकार निरंतर तुम्ही थोर सतपात्र स्नानसंध्यासीळ परमयोग्य सत्पुरुष तुम्हासी पूर्वी वचन करार केल्याप्रमाणे तुमचे चालवणे आवशक येणेकरून राज्यास श्रेयस्कर व आम्हास आभिष्ट हे जाणून तुम्हास मौजे आयना प्रगणे बेलसर हा गाव कमाल रुपये पाच हजाराचा दरोबस्त आमल स्वराज्य देखील कुल-(येथें शिक्का आहे) बाब कुलकाणु हाली पटी व पेस्तरपटी खेरीज हकदार व कदीम इनामदार करून वेठ बेगार व फरफर्मास वगैरे बाबतीसुध्धां जलतरुतृण-कास्टपाषाणनिधिनिक्षेप आदि आपली स्वसता निवरती करून चतुसीमापूर्वक

मौजे मजकूर हा गाव कृष्णार्पण तुम्हास दान देऊन तुमचे दुमाला करून दिल्हे आसे तरी यावतचंद्रदिवाकरपर्यंत तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरपरेणे आनुभऊन स्वामीनी राज्याचे आभिष्ट चिंतून सुखरूप राहावे सु॥ आर्बा तिसेन मया आलफ सन १२०३ सवत १८५० शके १७१५ प्रमादी नाम सवछरे मार्गशीर्ष शुद्ध १ रा छ २९ माहे राखर + हे विनंति

स्वदत्तं द्विगुण्यं पुण्यं परदत्तानुपालनं ॥ परदत्ताप
हारस्य स्वदत्तं निष्फलं भवेत् ॥ १ ॥ स्वदत्ता दुहिता भू
मी पितृदत्तासहोदरी ॥ अन्यदत्ता भवेन्माता यो
हरे त्रिषुसंगमः ॥ २ ॥ स्वदत्ता परदत्ता वा यो ह
रेच्च वसुंधरा ॥ स्वविष्ठायां क्रिमिर्भूत्वा पितृभि
स्सह मज्जति ॥ ३ ॥ या अन्वये शफत असे ॥

मोर्तब
सुद

बार

श्री राजाराम
छत्रपती अखिल प्रौ
ढप्रताप पुरंदर गोविं
दराव गायकवाड से
ना खासखेल सम
सेर बहादर

पां. न. पटवर्धन

# व्युत्पत्ति

—:०:—

( शि. म. परांजपे )

१ पिटणें:–मारणें, बडवणें, या अर्थी हा शब्द येतो. तो संस्कृतांतील ' पीड् ' या धातूपासून निघालेला असावा. सरस्वतीकंठाभरणांत पुढील एक आर्या आलेली आहे.

प्रा. आउज्जअ पिट्टिअए जह कुक्कुलिणाममज् भत्ताले ।
पेक्कंतहलाउलकलणिआ हहाकस्स कंदेमि ॥

सं. आवर्ज्य पीड्यते ( ताड्यते ) यथा कुकरोनाम मम भर्ता ।
प्रेक्षतराजकुलकर्मकराः अहह कस्य क्रंदामि ॥

यांत पीड्यते ' याचें ' पिट्टिअए ' असें रूप झालें आहे. व त्यावरून च मराठींतील ' पिटणें ' हा शब्द आलेला असावा.

२ कुळकर्णीः–वरील प्राकृत आर्येंत च ' लाउलकलणिअ ' असें पद आलें आहे. तें संस्कृतांतील ' ' राजकुलकर्मकर ' याबद्दल आहे. व त्यावरून च मराठींतील ' कुळकर्णी ' हा शब्द आलेला दिसतो.

३ बडवणें:–वडवणें = वाढवणें हीं रूपें ' वृध् ' धातूपासून निघालेलीं आहेत. लोखंड वगैरे धातु ठोकून ठोकून वाढविल्या जातात, हें सर्वांना माहित च आहे. त्यावरून ' वाढवणें ' याच्या अर्थांत ' मारणें, ठोकणें ' या अर्थाचा समावेश झालेला असल्यामुळें ' बडवणें ' याचा अर्थ ' मारणें ' असा झालेला असावा, असें दिसतें. ' वाढवणें ' या अर्थीं च ' लांब करणें ' हा जो प्रयोग येतो, त्याचा हि लाक्षणिक अर्थ ' ठोकणें, ' असा जो होतो त्याचें हि याच्याशीं साम्य आहे.

४ गोमटीः–सरस्वतीकंठाभरण ( पान ५८ ) मध्यें पुढील प्राकृत श्लोक आलेला आहे.

अकट गुमटी चंदज्योत्स्ना कलं किल कोइलो
लवइ अमुहुर्याम्यो वायुर्निवारय वाइ अ ।
अवि सखि अला रक्ताशोकस्तवापि मनोमुदे

यांत ' गुमटी ' हा जो शब्द आला आहे, त्याचा अर्थ टीकाकारांनीं ' मनोज्ञ ' असा दिला आहे. व त्याच अर्थीं ' गुमटी ' या प्राकृत शब्दावरून मराठींतील ' गोमटी ' हा शब्द आलेला असला पाहिजे.

५ अकट:--तसें च वरील श्लोकांत ‘ अकट’ हा शब्द आहे. त्याचा अर्थ ‘ आश्चर्य ’ असा दिलेला आहे. ‘ अकटो विकट ’ किंवा ‘ अकटश्च विकट: ’ असा जो मराठींत प्रयोग येतो, त्याचा यावरून ‘ आश्चर्यकारक रीतीचा --विकट ’ असा अर्थ होतो.

६ आला:--वरील श्लोकांत च ‘ अला ’ असें एक पद आलें असून त्याचा अर्थ ‘ आगत: ’ असा दिला आहे. मराठींत ‘ येणें ’ या धातूच्या भूतकाळाचीं रूपें ‘ आला ’ वगैरेसारखीं होतात. तीं भूतकाळ करण्याच्या कोणत्या हि नियमाप्रमाणें साधलीं न जातां अनियमित होतात. त्या रूपांचें मूळ प्राकृतांतील ‘ अला ’ यासारख्या रूपाशीं संबद्ध असावें असें यावरून दिसतें. किंवा ‘ आ + इ ’ अगर ‘ आ + या ’ या संस्कृत धातूंपासून हि कदाचित् ‘ ला ’ हा भूतकाळाचा प्रत्यय लागून ‘ आला ’ हें रूप होण्याचा संभव आहे. आणि ही च व्युत्पत्ति जास्त सयुक्तिक दिसते. कारण ‘ येणें ’ या धातूचें भूतकालवाचक ‘ आला ’ हें रूप अनियंत्रित दिसतें खरें. पण याचें खरें कारण निराळें च आहे. भूतकाळाचें ‘ आला ’ हें रूप अनियमित नसून वर्तमानकाळाचें ‘ येणें ’ हें रूप च अशुद्ध आहे. ‘ येणें ’ यांतील मूळ संस्कृत धातु ‘ या ’ हा उघड आहे. पण ‘ येणें ’ याचा अर्थ मात्र मराठींत ‘ आगमन करणें ’ असा आहे. तेव्हां संस्कृतांतील ‘ या ’ जाणें ह्या अर्थीच्या धातूला ‘ आगमन करणें ’ हा अर्थ आला कोठून ? तेव्हां अर्थात् ‘या’ ह्या धातूच्या पाठीमागें ‘ आ ’ हा उपसर्ग मूळचा असला पाहिजे, व पुढें तो लुप्त होऊन नुसता ‘ या ’ च उरून त्यापासून ‘ येणें ’ हा धातू मराठींत प्रचलित झाला असला पाहिजे. ‘ आयिये ’ ‘ आइये ’ ‘ आवो ’ इत्यादि हिंदी, गुजराथी भाषेंतील एतत्समानार्थक प्रयोगांत हि ‘ आ ’ हा उपसर्ग असल्याचें स्पष्ट दिसून येतें. त्याप्रमाणें च तो मराठींत हि ‘ येणें ’ या धातूच्या मागें मूळ एकदां असला पाहिजे. आणि त्यावरून च ‘ आला ’ हें भूतकाळाचें रूप साधित झालेलें असलें पाहिजे असें दिसतें.

# सूची

## थ



## द



## ध



## न

## भ

## म

## श

## स

सदरहू सूची रा. पांडुरंग नरसिंह पटवर्धन यांनीं तयार केली. याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहों.

चिटणीस.